१०६७. विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन । विठ्ठल स्मरण प्रेमपान्हा । १ ।
विठ्ठलचि ध्यावों विठ्ठलचि गावों । विठ्ठलचि पाहों सर्वांभूतीं । २ ।
विठ्ठला परतें न दिसे सर्वथा । कल्प येतां जातां गर्भवास । ३ ।
नाम म्हणे चित्तीं आहे सुखरूप । संकल्प विकल्प मावळती । ४ ।

१०६८. अ. साठी घडीमाजी । एक वेचीं देवकाजीं । १ ।
आराणूक सारूनि कार्जी । सर्वभावें केशव पूजी । २ ।
हेंचि भक्तींचे लक्षण । संतोषला नारायण । ३ ।
कोटिकुळें पावन तुझीं । नामा म्हणे भाक माझी । ४ ।

❀ श्री तुळसी विवाह, कार्तिक शुद्ध द्वादशी श्री तुळसी माहात्म्य ❀

१०६९. तुळसीविण ज्याचें घर । तें तंव जाणावें अघोर ।
तेथें वसती यम किंकर । आज्ञा आहे म्हणोनि । १ ।
तुळसीवृंदावन ज्याचे घरी । त्यासी प्रसन्न श्रीहरी ।
जें वर्जिलें यमकिंकरीं । आज्ञा आहे म्हणोनि । २ ।
तुळसीवृंदावना । जे करिती प्रदक्षणा ।
अंतकाळी होतां स्मरण । जन्ममरण नाहीं नामा म्हणे । ३ ।

१०७०. तुळशीवृंदावन दर्शन । त्यासी वैकुंठीं गमन ।
लटिकें म्हणे कोण । त्यासी आण केशवाची । १ ।
तुळसीमाळा घाली गळां । त्या भेटे घनसांवळा ।
चतुर्भुज सहित कमळा । केशिराज प्रत्यक्ष । २ ।
तुळसीरोपा घाली उदक । त्याचे हरती महादोष ।
ब्रह्मादिकां न कळे नि:शेष । जन्ममरण त्या नाहीं । ३ ।
तुळसीची देवा बहु प्रीती । आणिक पुष्पें न लागती ।
नामा म्हणे जी श्रीपति । हेचि भक्ति द्यावी मज । ४ ।

१०७१. तुळसी पुष्पांहुनि आगळी। वृंदावनीं ते मिरवली।
देवें मस्तकीं वंदिली । वंद्य झाली तिहीं लोकां। १ ।
तुळसी वंदावी माउली । अरे हे संतांची साउली।
तुळसीपासीं वनमाळी। सदा रहात असे। २ ।
तुळसी दळ भूमीवरी पडिलें। तें जरी मस्तकीं वंदिलें।
कोटी तीर्थस्नान केलें। एवढें फळ नामा म्हणे । ३ ।

१०७२. उभें वृंदावन जयाचिये द्वारीं । होय तो श्रीहरि प्रसन्न त्या । १ ।
तुळसीचें रोप लावील जो आणोनि। तया चक्रपाणि न विसंबे। २ ।
तुळसीचें काष्ठ जपमाळ करी। तयासि श्रीहरि प्रसन्न तो । ३ ।
तुळसीची कीर्ति अगाध पैं आहे। पंढरीसि पाहे म्हणे नामा । ४ ।

१०७३. विष्णूचें सेवन जये गांवी पूजा। नित्य तया द्विजा समारंभु। १ ।
घरीं वृंदावन नित्य अन्नदान। श्रीकृष्ण आपण तेथें असे । २ ।
ऐसी ध्यानगती विष्णूचें पूजन । तयासि पतन नाहीं नाहीं। ३ ।
नामा म्हणे करा विष्णुकथा नित्य । रामनाम सत्य वचन धरा । ४ ।

१०७४. उठोनियां प्रात:काळीं । तुळस वंदावी माउली।
तुळस संतांची साउली । मुगुटीं वाहिली विष्णूनें। १ ।
तुळस असे ज्याचे द्वारीं। लक्ष्मी वसे त्याचे घरीं ।
येवोनि श्रीहरि। क्रिडा करी स्वानंदें । २ ।
तुळसीसी मंजुरा येतां । पळ सुटे यमदूतां।
अद्वैत तुळस कृष्ण स्मरतां । नासे दुरित चित्ताचें। ३ ।
जे जे तुळसी घालिती उदक । ते नर पावती ब्रह्मसुख।
नामा म्हणे पंढरिनायक । तुळसी जवळी उभा असे। ४ ।

१०७५. तुळसीची सेवा घडे । रंगमाळा घालूं सडे । १ ।
दूत न येती तयाकडे । हरिनामाची घरटी पडे। २ ।
नामा म्हणे हरि एवढें । ब्रह्म वृंदावनीं सांपडे। ३ ।

१०७६. फुकाचिया तुळसी वहारे। ध्रुवासारिखें पद मागारे। १।
एका विठ्ठला शरण जारे। जन्म वांयां कां दवडारे। २।
नामा म्हणे हा देवो पहा रे। विठ्ठल भक्तांचा ऋणियारे। ३।

१०७७. तुळसीचें हत्यार। वृंदावन दुर्ग थोर। १।
तुळसीच्या दळीं। यम जिंकिला महाबळी। २।
नामा म्हणे बळि रे बळी। विठ्ठल आमुचा भुजबळी। ३।

१०७८. एक वाहूं तुळसीपत्र। तें देवासी प्रीय होत। १।
रखुमाईनें देव। सोडविला कृष्णराव। २।
नामा म्हणे पूर्ण होती। प्राप्त राधिकेचा पती। ३।

'युगे अठ्ठावीसे' 'जन्मता पांडुरंगे' आरती म्हणावी.

तुळसी महात्म्याचे आद्य उद्गाते संत नामदेव आहेत.

## श्री गीता जयंती मार्गशीर्ष शुद्ध एकादशी

१०७९. गीता हेचि गंगा गुह्यभाव पैं गा। नाम हेंचि जगा सोडवण। १।
सर्व ब्रह्म हरी सांगतसे मुरारी। विश्वरूप श्रीहरी आपण झाला। २।
उपदेश अर्जुना जनीं जनार्दना। अखंड भावना भूतदया। ३।
नामा म्हणे सर्व आहे हाचि देव। उदार माधव सर्वांभूतीं। ४।

१०८०. गीता गीता म्हणतां पापा होय नाश। कैवल्यही त्यास प्राप्त होय। १।
गीतेचीं अक्षरें पडतां श्रवणीं। जाय तत्क्षणी भवभय। २।
एक एका श्लोकीं कोटी अश्वमेध। पुण्यही अगाध म्हणतां गीता। ३।
नामा म्हणे गीता नित्य जो वाचिता। तयाच्या सुकृता पार नाहीं। ४।

१०८१. गीता गीता गीता त्रिवार बोलतां। पाप जाय तत्वता मोक्ष जोडे। १।
गीतेचा महिमा बोलवेना वाचे। बंधने जीवाची दूर होती। २।
एक एक अक्षर कोटी अश्वमेध। फळ हें प्रसिद्ध पुराणोक्त। ३।

एकची तो श्लोक वाचिलिया नेमें। अंतीं परमधाम प्राप्त होय। ४।
नामा म्हणे गीता संपूर्ण वाचितां। लाभ त्याचे आर्ता बोलवेना। ५।

१०८२. ज्ञानराज माझी योग्यांची माउली। जेणें निगमवल्लि प्रगट केली। १।
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी। ब्रह्मानंदलहरी प्रगट केली। २।
अध्यात्म विद्येचें दाविलेंसें रूप। चैतन्याचा दीप उजळिला। ३।
छपन्न भाषेचा केलासे गौरव। भवार्णवीं नांव उभारिली। ४।
श्रवणाचे मिषें बैसावें येऊनि। साम्राज्य भुवनीं सुखी नांदे। ५।
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। एक तरी ओंवी अनुभवावी। ६।

१०८३. वेदाचे जे सार ते हे भगवद्गीता। त्याचा अर्थ चित्ता असो द्यावा। १।
संस्कृत भाषण जगासी कळेना। म्हणोनि नारायणा संकट पडले। २।
देवाजीने तेव्हां धरिला अवतार। म्हणती ज्ञानेश्वर तया लागी। ३।
गीता शोधोनिया अर्थ जो काढिला। ग्रंथ आरंभिला ज्ञानेश्वरी। ४।
ज्ञानेश्वरी ग्रंथ साराचेही सार। फोडिले भांडार वैकुंठीचे। ५।
नामा म्हणे माझा ज्ञानराज प्राण। तयाचे चरण वंदीन मी। ६।

'युगे अठ्ठावीसे' 'जन्मता पांडुरंगे' या आरत्या म्हणाव्या व उपसंहार करावा.

## श्री महाशिवरात्र कथा व हरिहर ऐक्य, माघ वद्य त्रयोदशी

१०८४. कैलासींचा देव भोळा चक्रवर्ती। पार्वतीचा पति योगिराज। १।
तयाचिया पाया माझे दंडवत। घडो आणि प्रीत जडो नामीं। २।
जटाजूट गंगा अर्धचंद्र भाळीं। तिजा नेत्रज्वाळी जात वेद। ३।
कंठीं काळकूट डौर त्रिशूळ हातीं। सर्वांगीं विभूति शोभतसे। ४।
गळां रूंडमाळा खापर हस्तकीं। रामनाम मुखीं सर्वकाळ। ५।
व्याघ्रचर्मधारी स्मशानीं राहिला। संगें भूतमेळा विराजित। ६।
नामा म्हणे नामें नासोनियां पाप। करीं सुखरूप भक्तांलागीं। ७।

१०८५. डंवरला गिरी कैलास ढवळा। सिंहासन ज्याला ढवळेची। १।
पाहतां पाहतां निवाले लोचन। भव्य ज्याचें ध्यान एकरूप। २।
ढवळा सर्वांगीं देव तो आपण। लेइला भूषण तेंहि तैसे। ३।
पर्वताची बाळा पार्वती ढवळी। अर्धांगीं शोभली एकरूप। ४।
सर्वांगीं लाविली ढवळी विभूती। माळा विराजती स्फटिकाच्या। ५।
पांढरिया जटेमध्यें गंगा आहे श्वेत। गळ्यांत शोभत श्वेत सर्प। ६।
शंखपाळ श्रवणें कुंडलें ढवळीं। देखतां भूतळीं दुजा नाहीं। ७।
नामा म्हणे ऐसें दाऊनियां ध्यान। भाविकाचें मन तोषवित। ८।

१०८६. एके दिनीं रत्नसिंहासनावरी। कैसा त्रिपुरारी शोभतसे। १।
सांगों जातां चाऱ्ही वाचा विसांवती। तेथें माझी मति काय सांगों। २।
वामभागीं साजे सुंदरी भवानी। सिद्ध ऋषि मुनि करिती सेवा। ३।
नारद तुंबर गर्जती गायन। तेथें कर जोडोन उभे देव। ४।
गणेश शण्मुख ढाळिती चामरें। रिद्धिसिद्धि द्वार राखिताती। ५।
नामाचा गजर मृदंगाची घाई। पाहाती नवाई ब्रह्मादिक। ६।
नामा हाडपें करीं देतसे विडिया। लागोनियां पायां वारंवार। ७।

१०८७. शिव ऐसा शब्द कल्याणदायक। जाणती भाविक साधुजन। १।
तारक हें नाम भोळ्याभाविकांसी। नेणते जाणत्यांसी लाभ एक। २।
उपमन्यु बाळक दूध मागों गेला। क्षिराब्धि दिधला उचितासी। ३।
दुष्टदुराचारी पतित तारिले। नाहीं आव्हेरिलें दीनानाथें। ४।
नामा म्हणे शिव विष्णु एकरूप। ताराया अमूप अवतार। ५।

१०८८. एक गोक्षीर धाम ढवळा। एक जो सहज मेघ सांवळा।
एक कंठीं रूंडमाळा। एक गळां वैजयंती। १।
एक तो वृषभारूढ जाण। एका साजे गरूडवाहन।
एक स्मशानीं भस्मोद्‌ धुळण। एका शयन क्षीरसागरीं। २।

एक तो भोळा कैलासीं चक्रवर्ती। एक तो वैकुंठाधिपती।
एक सुरवर मुगुटीं वंदिती। एका अंगुष्ठी गंगा वाहे। ३।
एकाचे चरणीं नेपुरें झणत्कारू। एका पायीं रूळे तोडरू।
एका परिधान व्याघ्रांबरू। एका पीतांबरू कसियला। ४।
एका नरकपाल खट्वांग डमरू त्रिशूळ। एका शंख चक्र गदा कमळ।
एका अर्धांगीं हैमवती बाळ। एका कमळा वामभागीं। ५।
एक त्रिपुर संधानीं लक्ष न चुके। एकबाणें वाळि वधिला कौतुकें।
विष्णुदास नामा एक रूप देखे। हरिहर कौतुकें वर्णितसे। ६।

१०८९. भजन करा हरिहरा। नारायण शिवशंकरा।
माझें बोलणें अवधारा। भेद न करा दोघांचा। १।
तुम्हां सांगेन सत्य वृत्तांत। पाहें पां तेथींचा दृष्टांत।
नारायणें सेविलें अमृत। झाला श्वेत महादेव। २।
शंभूनें गिळिलें हलाहला। म्हणोनि विष्णु झाला निळा।
देखत देखत आंधळा। झणीं होसी गव्हारा। ३।
लक्ष्मी रूपें आपण हरू। देवें वरिला शारंगधरू।
गरूडरूपें महेश्वरू। वाहन झाला विष्णुचे। ४।
शान्तिरूपे शारंगपाणी। नारायण झाला भवानी।
शारंगधर नंदी होऊनि। सन्मुखासनीं बैसला। ५।
एक तो एका वेगळा नाहीं। दृष्टांत तूं आगमीं पाहीं।
नामा म्हणे एक केशव ध्यायीं। हरिहर पाहीं ज्याचे अवतार। ६।

१०९०. भेदवादी जन वदतसे भिन्न। नव्हें तें लक्षण भजनाचें। १।
विश्वीं विश्वंभर कोंदलासे एक। भेदाचें कौतुक कैसें सांगा। २।
ब्रह्मीं नाहीं ठाव एकपणाचाही। तेथें दुजें कांहीं सामावतें। ३।
आदि मध्यें अंतीं खेळूनियां खेळ। उरलें तें निखळ अविनाश। ४।

हेमीं जैसे केले तैसे होती नग। तरी ते अव्यंग सोनेपणीं। ५ ।
केली जैसी भक्ति शैव कां वैष्णव। पाहतां तो देव नाहीं दुजा । ६ ।
शिवविष्णु दोघे एकचि अवतार। वेदांनीं निर्धार हाचि केला। ७ ।
नामा म्हणे येथें दुजा नको भाव। विष्णु तोचि शिव शिव विष्णु। ८ ।

१०९१. तेव्हां प्रश्न करी पार्वती आदरें। शिवाप्रती कर जोडोनियां। १ ।
सांगा वाजी स्वामी ऐसा इतिहास। गातां जोडे वास तुझे पायीं। २ ।
जाळोनियां पापें सुखाची उन्नती। विश्व सुखी होती जेणें योगें। ३ ।
नामा म्हणे सुटे काळासी दरारा। विश्वासिया नरा मुक्ति जोडे। ४ ।

१०९२. ऐकोनियां वाणी। संतोषला शूळपाणी। १ ।
देवी चांगलें पुसिलें। तुझ्या बोलें चित्त धालें। २ ।
बोल नव्हती साचार। जड जीवाचा उद्धार। ३ ।
बोल तुझे गोडावले। जगीं सुदिन पाहिले। ४ ।
शिवरात्रीचें महिमान। नामा म्हणे ऐका जन। ५ ।

१०९३. ऐका सावधान कथा शिवरात्र। पावन पवित्र तिहीं लोकीं। १ ।
भाव धरोनियां आचरती जरी। वास शिवपुरीं घडे त्यासी। २ ।
उपवास आणि शिवाचें पूजन। रात्रीं जागरण विधि त्याचा। ३ ।
एक पसा पाणी एक बिल्वदळ। पूजन केवळ सोपें बहु। ४ ।
नामा म्हणे करा नामाचा गजर। मुखीं हरहर शब्दमात्रें। ५ ।

१०९४. कांचीपुरीं राजा नामें सोमदत्ती। तयाचे संपत्ती पार नाहीं। १ ।
पूर्वपुण्यबळें लाधलें तयासी। देतां उपमेसी उणा शक्र। २ ।
पांचशतें तया कामिनी सुंदरा। करितां नाहीं पुरा झाला काम। ३ ।
रिद्धि सिद्धि घरीं कामारि हिंडती। धैर्य शौर्य कीर्ति ज्याची जगीं। ४ ।
नामा म्हणे जेथें उणें कांहीं नाहीं। ऐसें असोनिही न सुटे भोग। ५ ।

१०९५. भोगाची नव्हाळी न सुटे कोणे काळीं । वासना वोंगळी तेचि करी । १ ।
वासनेचि थोरी सांगवेना कांहीं । न सुटिजे कांहीं कोण्या काळीं । २ ।
तारूण्याच्या भरें आवडी स्त्रियेची । वृद्धपणी तेंचि पुढें होय । ३ ।
म्हणतसे पोरें वांचतील कैसीं । हाचि अहर्निशी ध्यास करी । ४ ।
मेलियाही पुढें तेंचि उभें राहे । जन्मोजन्मीं पाहे लागलेंसे । ५ ।
मृगाचिया ध्यासें भरतां मृगपण । जन्मल्यावांचून सोडीनातें । ६ ।
नामा म्हणे जया जैसी जे वासना । जन्मकर्मे जाणा तैसीं होतीं । ७ ।

१०९६. पंचशतामाजी दोघी पतिव्रता । जारिणी सर्वथा सर्व कांहीं । १ ।
करूनियां ऐसीं जाती नरकासी । नाडिले पतीसी त्यांच्या पापें । २ ।
करिती एक वेळ झांकिती लोचन । शेवटीं बंधन यमाहातीं । ३ ।
नामा म्हणे बरें नव्हे हें कोणासी । घडेल तयासी जाच बहू । ४ ।

१०९७. ऐसें बहुत काळ लोटलियावरी । पुण्याची सामोग्रीं हारपली । १ ।
मरोनियां जन्म हरणाचा पावला । पतिव्रता झाल्या कुरंगिणी । २ ।
प्रारब्धाचा भोग सुटेना कोणासी । केलीं जैसीं तैसीं घ्यावीं फळें । ३ ।
नामा म्हणे देव कृपा करील जरी । सुटेना तोंवरी भोग खरा । ४ ।

१०९८. होऊनि हरण राहिला ते वनीं । दोघी त्या हरिणी स्त्रिया झाल्या । १ ।
जातीच्या स्वभावें करिती विहार । चित्त झालें स्थिर एकमेकां । २ ।
धाकुटीला दोन्ही पाडसें गोजिरीं । दुजी गरोदरी पूर्ण मास । ३ ।
नामा म्हणे पुढें काय झाली गती । कथेची संगति ऐका बरी । ४ ।

१०९९. देवलोकीं इंद्र सेवेशी सादर । भूतसेन चाकर होता तेथें । १ ।
सेवेसी चुकतां होय तूं किरात । ऐसें इंद्रें त्यातें शापियेलें । २ ।
शेज सज्ज करितां अंतर पडिलें । म्हणोनि घडले भोग त्यासी । ३ ।
नामा म्हणे सेवा करणें हें कठीण । त्यानें व्हावें जाण सावधान । ४ ।

११००. ऐकतांचि शब्द होऊनि किरात। राहिला निवांत एक ग्रामीं । १ ।
पाळणपोषण विषयांची वोढी । करीतसे जोडी पातकाची। २ ।
चण्डभिल्ल नाम घेतलें ठेऊनि । दुष्टभाव मनीं वाढविला । ३ ।
कासेसीं वाघुरा हातीं शूळ दंड । सामोग्री उदंड मेळविली। ४ ।
हिंडे नाना वन पर्वत शिखरें। मारीतसे फार जीवजंतू। ५ ।
जातीचा स्वभाव लागला तयासी । कष्टे अहर्निशीं म्हणे नामा । ६ ।

११०१. ऐसें असतां तो सरूं आला काळ । प्रारब्धाचें बळ कैसें पाहा। १ ।
हिंडतां हिंडतां फार कष्टी झाला। दृष्टीस तयाला न पडे कांहीं। २ ।
कडे दरी मोठ्या पर्वताचे वरी । रिघोनियां करी नाना युक्ती। ३ ।
झाली सांजवेळ न मिळे आमीष। होऊनि उदास राहिलासे । ४ ।
नामा म्हणे मग काय त्यानें केलें । ऐकावें निश्चळें साधुजनीं। ५ ।

११०२. मार्गीही राहिला जाऊं कोणीकडे। आमीष न जोडे काय कीजे। १ ।
चिंताज्वरें फार तापलें अंतर। क्षुधेचा आडदर पोटामध्यें। २ ।
रिक्त जाऊं तरी नाहीं काहीं घरीं। वाट पाहे घरीं दारापुत्र। ३ ।
पाहूं जातां कांहीं नाठवे विचार । तेणें स्थिरस्थिर पाय टाकी। ४ ।
नामा म्हणे तेव्हां देखे सरोवर । कांहींसा विचार करूं लागे । ५ ।

११०३. भोवतालें जाळें घाली नेटेंपाटें । हस्तकीं तिखट बाण धरी। १ ।
येतील उदकपानासी सावजें। पाहे त्याचे व्याजें रोखोनियां । २ ।
तेथें एक बिल्ववृक्ष महाथोर । वेंघोनियां वर बैसलासे। ३ ।
डोळ्याआड आलीं म्हणोनियां तोडी । अंतरीं आवडी आमीषाची। ४ ।
बकाचियेपरी ध्यानस्थ राहिला। जिवीचा जिव्हाळा वेगळाची। ५ ।
नामा म्हणे ऐसी दैवाची नव्हाळी। न करितां झाली देवपूजा। ६ ।

११०४. लक्षवरी बिल्वदळें माथा वाहे । आनंद न समावे महादेवा। १ ।
बहुता काळाचें तेथें एक लिंग। होतें भूमिभाग होऊनियां । २ ।

भोळा महादेव तेणे संतोषला। म्हणे करी मला कोण पूजा। ३ ।
नामा म्हणे पाहे निमित्याची वाट। पुराणीं बोभाट असे त्याचा। ४ ।

११०५. पुराणीं पवाडे जयाचे अपार। ऐकतांचि फार सुखवाटे। १ ।
भोळा महादेव पाहे भोळा भाव। एकसरें जीव उद्धराया। २ ।
रावण मागों गेला पार्वतीकारणें। देते वेळे नेणे कैसें द्यावें। ३ ।
जातीची चांडाळी गोकर्णासी गेली। दरूशनें ते नेली कैलासासी। ४ ।
नामा म्हणे कैसें दैव या भिल्लाचें। आलें पूजनाचें फल हातां। ५ ।

११०६. माथां पडतां पाला। सांब तेणें संतोषला। १ ।
होता प्राचिनाचा ठेवा। बहु दुर्लभ मानवा। २ ।
काय भक्तिचा जिव्हाळा। काय त्याचे अंगीं कळा। ३ ।
बहु केलीं दुष्ट कर्म। सेखी तोचि झाला धर्म। ४ ।
नामा म्हणे भोळादेव। सांगायाचा हाचि भाव। ५ ।

११०७. इतुकियासाठीं। बहु तुष्टला धूर्जटी। १ ।
काय सांगावा विचार। दैव पारध्याचें थोर। २ ।
झाली तीन प्रहर निशी। पूजा पावली देवासी। ३ ।
धाडियेलें यमाला। सुखी कराया तयाला। ४ ।
आला तो धांवत। माग म्हणे अपेक्षीत। ५ ।
त्याची विषयक भक्ति। पुढती झाली तया गती। ६ ।
जें जें याचकें मागावें। तें तें दातयानें द्यावें। ७ ।
काय मागितलें तेणें। तेंचि नामा ऐका म्हणे। ८ ।

११०८. येऊनियां यम ठाकला पुढारीं। पाहे दुराचारी दुरोनियां। १ ।
घाबरला मनीं कोण असे नेणे। विचारितां मनीं भांबावला। २ ।
पुसों लागे त्याला कोण तूं आलासी। आणिक म्हणसी माग कांहीं। ३ ।
देव किंवा यक्ष राक्षस किन्नर। करितां निर्धार न पडे ठायीं। ४ ।
नामा म्हणे मूर्ख पारधी तो खरा। दैव त्याच्या घरा आलें जाण। ५ ।

११०९. आणोनियां यम संतोषला मनीं । मंजुळ वचनीं काय बोले । १ ।
केली देवें कृपा पाठविलें मज । वरदान तुज द्यावयासी । २ ।
सर्वही जीवाचा नियंता मी यम । इच्छिसी तो काम पूर्ण करूं । ३ ।
शिवरात्र आजी उपवास केला । शंकर तोषला बिल्वदळीं । ४ ।
नामा म्हणे ऐसें ऐकतां वचन । पारध्याचें मन सुखावलें । ५ ।

१११०. जोडोनियां हात वंदिला कृतांत । म्हणे माझा हेत इतुकाची । १ ।
सर्वसुखाहुनि हेंचि वाटे गोड । संसाराची ओढ मोडवेना । २ ।
मृग पक्षीयाचें कळावें बोलणें । सर्व कांहीं येणें कार्यसिद्धी । ३ ।
इतुकी आहे हो माझी ही वासना । पुरवुनि स्वस्थाना जावें तुम्ही । ४ ।
नामा म्हणे ज्याची जे कांहीं वासना । तेचि पुढें जाणा उभी ठाके । ५ ।

११११. देऊनियां वर दंडपाणी गेला । ध्यास पारध्याला मृगाचाची । १ ।
लाऊनियां चित्त ऐके चळवळ । दृष्टीची तळमळ लक्ष तेथें । २ ।
उगवला दीन जाहला प्रकाश । मृग पक्षीयास दृष्टि झाली । ३ ।
तोंचि मृग पाहा आला उदकासी । उड्डाण गगनासी साधीतसे । ४ ।
तृषाक्रांत मोठा चालीला निःसंग । प्रारब्धाचा भोग ओढवला । ५ ।
उदकाचिये हावें दृष्टि झाली दुरी । पाश तो समोरी देखेचिना । ६ ।
येऊनियां पडे जाळिया माझारी । लोळे पृथ्वीवरी एकसरा । ७ ।
नामा म्हणे भिल्लें पाहातां लोचनीं । वोढोनियां गुणीं बाण लावी । ८ ।

१११२. याव वाळू जातां देखिलें नवल । पाहातसे खळ दुष्ट भावें । १ ।
परी तें होणार कदापि चुकेना । तैसीच वासना धांव घाली । २ ।
धाकुटी हरणी पाडसें धाकुटीं । सांडी उठाउठी आली तेथें । ३ ।
पाहों जातां पाशीं गुंतला तो मृग । तेव्हां काय मग केलें तिनें । ४ ।
मुखाप्रती मुख लाऊनि चुंबिलें । हृदय फुटलें देखतांचि । ५ ।
सुख दुःख बोल बोलती ते वेळीं । म्हणती कपाळीं भोग होता । ६ ।

नोडविता कोणी न दिसे ये काळीं। काळाची पडली उडी आतां। ७ ।
नामा म्हणे खुळा कळे त्याची वाणी। ऐकाया लागूनि स्थिर झाला। ८ ।

११११३. धर्मशास्त्री ऐसें बोलतांनी बोलें। तेणें चोजवलें चित्त त्याचें। १ ।
आश्चर्याच्या डोहीं बुडाला पारधी। म्हणे कैसी बुद्धि याची पहा। २ ।
रानींचीं रानवटें तया एवढें ज्ञान। प्रेमाचें जीवन वोसंडत। ३ ।
घाकाटली वृत्ति चित्त केलें स्थिर। दोघांचीं उत्तरें ऐकतसे। ४ ।
नामा म्हणे हरणीहरणाचा संवाद। ऐकतां भवबंध तुटतसे। ५ ।

११११४. बंधनीं गुंतला देखोनियां पती। उडालीसे वृत्ति हरणीची। १ ।
देहाची ते आस सांडोनि लवलाही। पडे रडे कांहीं बोल बोले। २ ।
म्हणे तुम्ही आतां नव जावें एकलें। संगें आम्हां नेलें पाहिजे जी। ३ ।
बहुता जन्मांची तुम्हां आम्हां गांठी। आतां कैसी तुटी पाडितसां। ४ ।
भोग जे भोगिले स्वप्नप्राय झाली। नाहीं ते पुरली वासना हे। ५ ।
नामा म्हणे विषयवासना वोंगळ। तेणें कोण्या काळें सुटिजेना। ६ ।

११११५. देखतांचि कांता दुःखी झाले फार। डोंगर तिजवर कोसळला। १ ।
बोलतां तियेशी न निघती बोल। ऐसाची तो वेळ आवधारी। २ ।
नको आतां पडूं मायेचिये भरी। जाये वो सुंदरी स्वस्थळासी। ३ ।
माझी गति मज तुझी गति तुज। काय काज व्यर्थ प्राण द्यावा। ४ ।
घरीं तुझीं बाळें गांजिरीं गोमटीं। जाऊनियां पोटीं धरीं त्यांसीं। ५ ।
न लावी उशीर जाई वो माघारी। जंव तो दुराचारी न देखतां। ६ ।
बाळा पाळण हाचि स्त्रियांचा धर्म। सांगतसे वर्म जाई आतां। ७ ।
माझिया प्रारब्धीं होतें तैसें झालें। तूं कां येथें बळें प्राण देसी। ८ ।
नामा म्हणे ऐसें सांगे तिच्या हिता। परी तें नाइकतां कष्टी होय। ९ ।

११११६. नेत्रीं अश्रुधारा पडती अपार। तेणें पृथ्वीवर पूर वाहे। १ ।
म्हणे तुम्हांवीण कैसा प्राण धरूं। वांचुनियां करूं काय आतां। २ ।

माझिया भारानें दाटेल मेदिनी । तुम्हां आव्हेरूनि गेले जरी । ३ ।
सुखाचे सांगाती होतों दोघेजण । दुःख म्हणवून सांडी केली । ४ ।
सांडिलिया तुम्हां देवा न मानेल । वेदशास्त्र बोल हाकारिती । ५ ।
तुजविण क्षण कंठवेना काळ । मीना जैसें जळ तैसें आम्हा । ६ ।
तुजविण जिणें व्यर्थ या संसारीं । नामा म्हणे खरी गोष्ट बोले । ७ ।

१११७. चण्डभिल्ल तेणें ऐकिलें बोलणें । सावधान मनें करोनियां । १ ।
तेव्हां होती चित्तीं वासना जे खोटी । जिरऊनि पोटीं चाकाटला । २ ।
भींतील यालागीं वृक्षा आड झाला । ऐकों जो लागला शब्द त्यांचे । ३ ।
नामा म्हणे ऐसा राहिला पारधी । ऐकावें ते संधि काय झालें । ४ ।

१११८. दुसरी जे होती गर्भिण कुरंगी । तेही लागवेगीं आली तेथें । १ ।
आहा ऐसें काय केलें वो साजणी । नयेसी अझुनी कोंपटासी । २ ।
लहान पाडसें आक्रंदती भुकें । कैसी येथें सुखें राहिलिसी । ३ ।
जाई लवलाही त्यांसी स्तन देई । सांगू आतां कांहीं बोलवेना । ४ ।
नामा म्हणे धन्य तयाचें सौजन्य । नाही भावभिन्न कोणामाजी । ५ ।

१११९. येरी म्हणे काय करूं वो सुंदरी । आतां आहे घरीं काय माझें । १ ।
प्राणनाथें पेणें केलें स्वर्गलोका । जाईन मी देखा तया संगें । २ ।
वडिलपणें तुम्ही लोभ असों द्यावा । सांभाळ करावा बाळकांचा । ३ ।
वागुरे माझारी गुंतलासे कांत । कायसें जीवित विचारी पां । ४ ।
न लावीं उशीर जाई येच क्षणीं । असती गर्भिणी पूर्ण दिवस । ५ ।
जरी देसी प्राण पतन गर्भासी । होय ते दोषासी पात्र होसी । ६ ।
पोसोनियां बाळें वाढवीं वंशाला । द्यावें चित्त बोला माझ्या आतां । ७ ।
पळावया तुज नाहीं अंगीं बळ । न देखतां खळ जाई वेगीं । ८ ।
नामा म्हणे ऐसीं उत्तरें ऐकिलीं । तेही घाबरली तयेवेळे । ९ ।

११२०. एकांचि जीव झाला कासावीस । म्हणे झालें कैसें अकस्मात । १ ।
आहां कपाळींचा भोग वोढवला । कांत तो नियाला सोडोनियां । २ ।
कैंचीं बाळें कोण कोणाचीं सांगातीं । पाहातां हे भ्रांति वाउगीची । ३ ।
ठायींची हे काया जायाची जाईल । वांचलिया फोल पतिविण । ४ ।
पतीविण सुख काय या संसारीं । दुःख कल्पवरी भोगावें कीं । ५ ।
नामा म्हणे ऐसें चिंतोनियां मनीं । आली ती तत्क्षणीं हरणापाशीं । ६ ।

११२१. कपाळीं कपाळ लावी चुंबी रडे । आक्रंदोनी पडे पृथ्वीवरी । १ ।
आवडीचें चिन्ह सांगवेना वाचे । जाणावें जयांचें त्यांचें त्यांनीं । २ ।
मानेवरी मान टाकुनि राहिली । वाचाही खुंटली बोलवेना । ३ ।
आम्ही तुजविण न राहूं क्षणभरी । उदास न करीं चित्त आतां । ४ ।
नामा म्हणे मृगजन्म त्यांचा खरा । लक्षितां विचारा ज्ञानी बहू । ५ ।

११२२. पट्टाची मी राणी वडील मानाची । जे गति मृगाची तेचि मज । १ ।
जाईन सांगातें न सोडीं संगती । निश्चय हा चित्तीं दृढ केला । २ ।
तुझीं बाळें घरीं कष्टती क्षुधेनें । जाईं वेगीं स्तनें पान देईं । ३ ।
बाळांकडे जाईं पाहें कंठीं काळ । न करीं उतावीळ मन आतां । ४ ।
नामा म्हणे ऐसें संवादले फार । तिघांचें अंतर एकविध । ५ ।

११२३. ऐशा दोघीजणी एकविध भावें । द्यावयासी जीव उभ्या ठेल्या । १ ।
धन्य धन्य त्यांचा संसार सुफळ । सत्वाचेंचि बळ अंगामध्यें । २ ।
पाजूनियां येईं बाळकासी स्तन । आम्ही दोघे जण येथें असों । ३ ।
न टाका मजला सांगोनि निघाली । बिऱ्हाडासी आली लागवेगें । ४ ।
घेऊनियां अंकीं पाडसें तीं दोन्ही । लावूनियां स्तनीं शोक करी । ५ ।
एकमेकें सुखें राहावें अनन्य । तुटलें सौजन्य तुम्हा आम्हां । ६ ।
पति पडिलासे फांसीं सांडीतसे प्राण । आम्हांलागीं जाणें त्याच्यासंगें । ७ ।
हृदयीं धरोनी दिधलें चुंबन । तीं म्हणती कोण पोशी आम्हां । ८ ।

येऊं तुम्हांसंगें देऊं आधीं प्राण। पुढील कारण तुम्ही पाहा। ९ ।
नामा म्हणे ऐसें पांचही ते एक । देखोनि कौतुक वाटतसे।१०।

११२४. निरोपिलें देखा आलीं त्या तळाका । झाली एकमेकां भेटी तेथें। १ ।
परस्परें दु:ख देखतां वाढलें । धैर्याचेंचि बळ केलें त्यांनीं। २ ।
देहभाव कांहीं नाठवे तयांसी । गुंतोनी मोहासी जीव देती । ३ ।
नामा म्हणे देवें सोडवावें त्यांसी । हें तों अनेकांसी आटोपेना। ४ ।

११२५. पारधी तों झाड घालोनी पातला। घालावया घाला एकसरें। १ ।
भयाभीत झाली पांचही ते काळीं। वासना गुंतली एकमेकां। २ ।
वडील कुरंगी येऊनि त्यापाशीं। लागोनी पायांसी काय बोले। ३ ।
नको मारूं पति तृषेनें पीडिला। मारीं तूं मजला तया आधीं। ४ ।
आहेवपणानें धाडीं स्वर्गलोका। येतुल्यानें सुखा पात्र होऊं। ५ ।
इतुकीयामाजी दुसरीही आली । ती म्हणे उगली थांब आतां। ६ ।
तृषेनें पीडिलों पाजीं आधीं पाणी। मग जैसें मनीं तैसें करीं। ७ ।
नामा म्हणे भिल्ल विसरला घात। राहिला निवांत त्यांच्या बोलें। ८ ।

११२६. वडील कुरंगी काय बोले त्यासी। सांगते धर्मासी पूर्वीलीया। १ ।
बांधोनी मारितां बडे महादोष। पाजी उदकास सोडोनियां। २ ।
पिऊनियां जळ येऊं तुजपाशीं । मग सावकासी करीं काज। ३ ।
आमुचा विश्वास नाहीं तुज जरी। मागशी त्यापरी भाक देऊं। ४ ।
पर उपकारीं पडतसे देह । लोभ आतां काय वांचूनियां। ५ ।
भुकेलिया अन्न तान्हेल्या जीवन। पुण्यासी कारण इतुकेची। ६ ।
पांचजणीं तुज वोपीयेले देह। यालागीं संदेह न धरावा। ७ ।
नामा म्हणे ऐसा प्रार्थितां किरात। द्रवला मनांत काय बोले । ८ ।

११२७. ऐकोनियां तुम्हां वनींचीं वनचरां। बोलतसां फार धर्माधर्म । १ ।
येणें कांहीं कांहीं द्रव आला मना । तुमची भावना कोण जाणे। २ ।

सांडिल्या पाण्यासी ठकवूनि आम्हांसी । गेलिया तुम्हांसी काय कीजे । ३ ।
नामा म्हणे ऐसें बोलोनि किरात । करावया घात शस्त्र काढी । ४ ।

११२८. देखतां तीं दोन्ही पाडसें त्या काळीं । भिल्लापुढें आलीं लागवेगें । १ ।
सांभाळोनि हात एकावी विनंती । धरीं कृपा चित्तीं आमुचिया । २ ।
अतितालागोनि चिलिया बोपी देहे । तेणेंचि तो लाहे परमधाम । ३ ।
मातापितरांसी न करावा घात । मारावें आमुतें आधीं आतां । ४ ।
कोंवळें शरीर गोड बहु मांस । लागो सार्थकास तुझे काजीं । ५ ।
नामा म्हणे सत्त्व मोठें त्या पांचांचें । होती कैलासींचे अधिकारी । ६ ।

११२९. हणों मागें कांहीं कर्मविपाकासी । ऐशा ऐशा दोषीं ऐसे होती । १ ।
ठकवूनियां आम्हीं तुज जाऊं जरी । अंधतमाभितरीं वास पावों । २ ।
गुरु स्वामी द्रोही विश्वासघातकी । तयास तो नरकीं वास सदा । ३ ।
परद्रोही परनिंदेसी रतला । तो होय कावळा जन्मोजन्मीं । ४ ।
पंक्तिभेदकेंचीं मरतील पोरें । किंवा पती मरे बाळपणीं । ५ ।
सदासर्वकाळ दुष्ट कर्मी रत । शूकरादि होत नीच योनी । ६ ।
अतीत अभ्यागत पूजा नाहीं ज्याला । घूस सर्प बिळामाजी होती । ७ ।
नामा म्हणे केलें तैसें तें भोगावें । सावधान व्हावें जाणत्यांनीं । ८ ।

११३०. पापिष्ठाचें जिणें काय तें जियालें । गळां स्तन झाले शेळियेचे । १ ।
येथेंचि जो खोटा तेथें तो करंटा । व्यर्थ आला पोटा माउलीच्या । २ ।
तप्त ताम्र भूमि लोळविती नरा । लोटिती अघोरा नरकामाजी । ३ ।
लोहोचंचुकाग्र टोंचिती येथोनी । मारिताती घणीं माथां घाव । ४ ।
बांधोनियां गळां टांगिती उफराटें । हाणताती सांटे वरिच्यावरी । ५ ।
असीपत्रावरी वोढिती घरोनीं । लोटिती नेऊनी कुंभपाकीं । ६ ।
जळतिया खांबा भेटविती बळें । खैराच्या इंगळें नाहाविती । ७ ।
प्रळय क्रूर सर्प झोंबविती कंठासी । ओढोनि जिव्हेसी खंड करिती । ८ ।
नामा म्हणे ऐसी पापिष्ठाची गती । जन्म लक्ष शतीं हेंचि फळ । ९ ।

११३१. न करूं आम्हीं तैसें घेई आतां भाक । अंतरीं निःशंक झालों सर्व । १ ।
तुम्हां आम्हां साक्षी असे सदाशिव । येथें दुजा भाव धरूं नको । २ ।
पिऊनियां पाणी न येऊं तुजपाशीं । तरी घडे आम्हांसी सर्व पापें । ३ ।
जातीचा ब्राह्मण न करी ब्रह्मकर्म । तो जैसा अधम तैसे आम्ही । ४ ।
स्वामिद्रोही आणि विश्वासघातकी । तो पडे ज्या नरकीं तेथें पडों । ५ ।
नामा म्हणे ऐसी वाहोनियां आण । धरीले चरण पारध्याचे । ६ ।

११३२. पारधियासी तेव्हां दाटला गहिंवर । लोटलें अपार प्रेम तेव्हां । १ ।
जीवदान दिलें जावें तुम्हीं आता । न करावी चिंता कांहीं येथें । २ ।
इंद्राचा मी दूत चुकलों सेवेसी । यालागीं जन्मासी आलों जाणा । ३ ।
तुमचिया बोलें निवालें अंतर । घात इत:पर न करीं कांहीं । ४ ।
नामा म्हणे शुभकाळ त्याचा आला । म्हणवोनि झाला पश्चात्ताप । ५ ।

११३३. सोडोनियां गळा मुक्त केले त्यांसी । पिऊनि उदकासी आली पुढती । १ ।
क्षुधेलासी फार न लावीं उशीर । घेऊनियां शस्त्र हाणीं वेगें । २ ।
घर तुझें दूर वाहावेना भार । आम्ही तेथवर येत असों । ३ ।
सत्यत्व देखोनि म्हणतसे पारधी । तुम्हांसी न वधीं जावें आतां । ४ ।
पाठोपाठी त्याच्या घरालागीं आली । चरणीं घातली मिठी त्यांनीं । ५ ।
नामा म्हणे सत्त्व आगळें तयांचें । वर्णावया वाचे नये शेषा । ६ ।

११३४. हरिश्चंद्र राजा सत्त्वनिष्ठ मोठा । स्त्रीपुत्र चोहाटामाजी विकी । १ ।
तैसेंचि येथें मृगाअंगीं सत्त्व । वोपियेला जीव पारध्यासी । २ ।
शिबीराजा अंग कापी नेटपाटें । सत्त्वासी पालट होऊं नेदी । ३ ।
ताम्रध्वजा शिरीं करवत घातला । नाहीं पालटला मनोधर्मा । ४ ।
नामा म्हणे मागें बहुतीं केली कीर्ति । तयां ऐसी रीति येथें दिसे । ५ ।

११३५. आधींच कृपाळु भोळा महादेव । जाणितला भाव कुरंगांचा । १ ।
कृपा केली देवें मांडिला सन्मान । धाडिलें विमान दूताहातीं । २ ।

लखलखित टके पताका डोलती। तयामाजी होती गीत नृत्य। ३ ।
नाना सुमनांची शय्या आस्तुर। करिती उपचार सिद्धि आठ। ४ ।
आले अकस्मात तयाचियेपाशीं। पाहतां सर्वांसी नवल वाटे। ५ ।
दिव्य देह झाले पांचांचे ते काळीं। विमानीं बैसली लागवेगें। ६ ।
पारधी देखोनी तटस्थ राहिला। दूतीं तया केला उपदेश। ७ ।
शिवरात्री आजी जागरण उपवास। केला तेणें दोष सर्व गेला। ८ ।
करोनी पारणें होईं शिवभक्त। आशापाशीं चित्त गोवूं नको। ९ ।
अखंड कीर्तन शिवनामाचें करीं। तेणें मोक्षपुरी पावसील। १० ।
पुढिल्या शिवरात्री नेऊं कैलासासी। सांगोनियां त्यासी गेले वेगीं। ११ ।
नामा म्हणे मोक्ष झाला त्या पांचासी। वस्ति चंद्रापाशीं केली त्यांनीं। १२ ।

११३६. तेणें उपदेशें पारध्यासी ज्ञान। करी तो कीर्तन नामघोषें। १ ।
संचिताचा नाश क्रियमाण बुडविलें। त्या सहज जोडलें मोक्ष सुख। २ ।
दुसऱ्या शिवरात्री पूजिलें शंकरा। करोनियां बरा भाव शुद्ध। ३ ।
विमानीं वाहोनी स्वस्थानीं स्थापिला। येथुनि संपला कथाभाग। ४ ।
नामा म्हणे शिव विष्णु एकरूप। जाणोनियां जप करा त्यांचा। ५ ।

११३७. शिवरात्री कथा धन्य जे ऐकती। इच्छिलें पावती सर्व कांहीं। १ ।
पातकाचा नाश पुण्य वाढे फार। शेखीं विश्वंभर कृपा करी। २ ।
भोग भाग्य ज्ञान वाढेल संतान। काळ करी चरण सेवा त्यांची। ३ ।
नामा म्हणे शिव अक्षरें हीं दोन्हीं। जपावीं सज्जनीं वारंवार। ४ ।

११३८. लिंगपुराणीं हा बोलिला इतिहास। तोचि म्यां तुम्हांस निवेदिला। १ ।
अनेक पुराणीं अनेक प्रकार। तारावया नरनारी लोक। २ ।
मुख्य हेचि कथा शिवरात्रीची जाणा। कैलासींचा राणा तोष पावे। ३ ।
नामा म्हणे मन करोनि निश्चळ। करा गदारोळ नामघोष। ४ ।

११३९. अहो सदाशिवा । देसी भुक्ति मुक्ति भावा । १
करावी ते तुझी सेवा । ऐसें धरावें या जीवा । २
नामा म्हणे महादेवा । चुकवीं चौऱ्यांशींचा हेवा । ३

११४०. बरवें गा शंकरा नाम तुझें । हरहर बरवे गा देवा नाम तुझें । १
गाईल्या ऐकिल्या होय वैष्णवा गती । रामनामें तरलें नेणों किती । २
ऐसा सदा आनंद राउळीं । विष्णुदास नामा पंढरपुरीं । ३

११४१. साठीसहस्त्र विघ्नांवरी । शिवनाम पंचाक्षरी । १
तो पर्वत राजा कैं देखेन । जेथें असे मल्लिकार्जुन । २
भक्तिभावाचें अंजन । साधावया निधान । ३
मन मारूनि देईन बळी । साधावया चंद्रमौळी । ४
भ्रांति पाटा फिटला । शिव मार्ग देखिला । ५
विष्णुदास नामा पायाळ भला । तेणें मलयानिळ देखिला । ६

११४२. सदा सोमवारीं । विभूति लावुनि शिरीं ।
तुमच्या मंदिरीं । आलाप करीं । १
शंकर त्रिपुरारी । हरि उच्चारी ।
म्हणती षडाक्षरी । पावें मज । २
ॐ नमः शिवाय । हरहर जय जय ।
नाहीं भवभय । तुझेनि नामें । ३
करिती शिवरात्री । वाहाती बेलपत्री ।
प्रगट होऊनि गाती । भक्तिभावें । ४
बोलती सत्कीर्ति । जिंतिलें पवित्रीं ।
हरहर नाम मंत्रीं । तुज पूजिती । ५
रूद्राक्षाच्या माळा । घालूनियां गळां ।
तो तुम्हां जवळां । सर्व मान्य । ६
शिवशंभु भोळा । बहुतां पुण्यें जोडला ।
पावे जाश्वनीळा । म्हणे नामा । ७

११४३. विष्णूसी भजला शिव दुरावला। अध:पात झाला तया नरा। १
शिवपूजा करी विष्णूसी अव्हेरी। तयाचिये घरीं यम नांदे। २
विष्णुकथा ऐके शिवासी जो निंदी। तयासी गोविंदीं ठाव नाहीं। ३
नामा म्हणे असती शिवविष्णु एक। वेदाचा विवेक आत्माराम। ४

संत नामदेवांना लिंगपुराण ज्ञान होते. श्रीमहादेवांची आरती म्हणावी.

## ❖ संत नामदेवकृत श्री महादेवांची आरती ❖

११४४. निर्गुणा निर्विकारा शिवा कर्पूरगौरा। व्यापूनी चराचरा असमी प्रकृतिपरा।
अगणित कोटी लिंगे तूंची होसी दातारा। तयामाजी ज्योतिर्लिंगे पुराणप्रसिद्ध बारा। १
जयदेवा निळकंठा सकळ देवा आदि श्रेष्ठा। रग मी शरण आलो निवारी भवकष्टा। ध्रु.
जयदेवी निळकंठा। १
सोरटी सोमनाथ जगी एक विख्यातु। तयायोंनी दरुशनें चुके संसार ग्रंथु।
हेमवंत पृष्टी भागा लिंग केदार भुतुज। ऋषिमुनी सेविनानी धरोनी कैवल्य हेतु।
जयदेव निळकंठा। २
उज्जयनी नाम नगरी पवित्र ते चराचरी। महाकाळ लिंग जेथे धन्य तो पूजा करी।
ॐकार ममलेश्वरु जाती लिंग निर्धारी। तयाचेनी दर्शने जन्म मरणपैंदुरी। ३
जयदेवा निळकंठा।
भीवरा उगम जेथे भीमाशंकर तेथे। घुंघुडाकिणी स्नान करीसी।
तयाचेन जोडे अगणित पुण्य चालत तेथे पंथे। दक्षिणे रामेश्वर जोतिर्लिंग म्हणते तयासे। ४
जयदेव निळकंठा।
आवंढ्या नागनाथु देव आपण नांदतु। भक्तजनाप्रति पाळकु भुक्तिमुक्तिसहितु।
प्रसिद्ध लिंग जाणा परळी वैजनाथु। हरिहर तीर्थ जेथे जन होत कृतार्थु। ५
जयदेव निळकंठा।

पश्चिमे लिंग एक जया नाव त्रिंबका । गौतमी उगम जेथे वास मंगळयांचे ।
दर्शने स्नानमात्रे पुण्यपावन लोकु । तैसाच घृष्णेश्वरू शिवालय रमणिकु । ६ ।
जयदेव निळकंठा।
श्रीशैल्य श्रीपर्वतु लिंगरूप समर्थु । सांभिवंत निळगंगा माझी श्रीमल्ल नाथु ।
भउमी कैलास दुजे जना साक्षदावितु । साठ वर्षे वाट पाहे कृपाळु उमाकांतु । ७ ।
जयदेव निळकंठा।
अनुपम्य काशीपुरी मनकर्णिका नीरी । जान्हविपुण्य गंगा पाप ताप निवारी ।
विशेष विश्वनाथ जीव मात्र उद्धरी । तारक ब्रह्मसूत्र जपुनी कर्णविवरी । ८ ।
जयदेव निळकंठा।
येऊनी संसारा लिंगे पहावी बारा। येक तरी दृष्टी कीजे अन्यथा भूमीभारा।
नामया विष्णुदास ध्याई परात्परा । जयदेव निळकंठा।

शिवरात्र कथा समाप्त.

## श्री गणेशाची आरती

११४५. सिंदुरे घवघवीतु तुझा चर्चिला माथा ।
दोही हाती सिद्धीबुद्धी नमन करू एकदंता ।
मसी तर्कु थोर झाली मज तुज वर्णिता।
धन्य तो एकदंत चौदा विद्येचा दाता । १ ।
जयजय मंगलमूर्ती जयजय गणपती ।....
वडीलपुत्र गिरिजेचा तुझे नाम लंबोदरु। विष्णुदास नामा सेवी निरंतरु । ५ ।

११४६. रात्रथोर झाली पैसका फुली। चलावे श्रीहरी मंदिरासी ।
तुम्ही भागलेनी हो आता उठावे झडकरी। उशीर मुरारी होत असे । १ ।
कुंकवाची सरी नेत्रासी पावली । बोलता पावली जिव्हा वळे। २ ।
क्षीरसागराची गोडी विसरले श्रीहरी। रखुमाई मंदिरी वाट पाहे । ३ ।
या वैष्णवांचे सुख मज झाले बहुत। विसरला समस्त सुखदु:खासी। ४ ।
मज वेधिले सकळ जन मी असे त्या आधीन। जिवाचा जीवन म्हणे नामा। ५ ।

## श्रीयाळ महिमा

११४७. सूर्यवंशी राजा असे तो श्रीयाळ। पंच वरुषीं बाळ चिलया त्यासी। १।
पतिव्रता कांता नाम तें चांगुणा। अतिता भोजन घाली नित्य। २।
कैलासीं नारद वर्णी यांची कीर्ति। सत्व पाहण्याप्रति आले शिव। ३।
जाहालासे अतित रूप तें कुश्चळ। रक्त पू हा गळे सर्वांगासी। ४।
आला तो अतित श्रीयाळाचे घरीं। नमस्कार करी राजा त्यासी। ५।
येऊनि चांगुणा वंदिती चरण। बहुत सन्मान केला त्याचा। ६।
उष्णोदकें त्यासी घातियलें स्नान। केलेंसे पूजन अतिताचें। ७।
म्हणे महाराजा करावें भोजन। पतीता पावन करा तुम्ही। ८।
येरू म्हणे माझें शरीर हें रोगी। नरमांस वेगीं देई मज। ९।
चांगुणा ती म्हणे देतें माझें मांस। नये उपयोगास आमुचिया। १०।
राजा म्हणे माझें मांस मान्य करा। न लगे उदारा तुझें मज। ११।
पंच वरुषीं बाळ तुझा हा चिल्हाळ। मांस हें सकळ देईं त्याचें। १२।
पाक हा करुनी घालीं मज आतां। खेद काय चिंता करूं नये। १३।
करित्तां हो खेद जाईन उठोनी। सत्वाची हे हानी करूनियां। १४।
तेव्हां ते चांगुणा म्हणे अतितातें। करितें पाकातें सिद्ध आतां। १५।
बोलविला तेव्हां तिनें तो चिल्हाळ। वचन कोमळ बोले त्यासी। १६।
तुज हा अतित आल्रासे पाहुन। मागतो भोजन तुजलागीं। १७।
होई बा उदार अर्पी हें शरीर। संतोषला वर पार्वतीचा। १८।
ऐकोनी चिलया बोले मातेप्रती। संतोष हा चित्तीं माझा असे। १९।
नाशवंत देह नाहीं राहणार। सार्थक समग्र करीं याचें। २०।
सांडीं हे ममता होई तूं उदार। कैलासी शंकर संतोषेल। २१।
घेऊनि चिलिया गेली पाकशाळे। कापियेलें बाळ चांगुणेनें। २२।
शीर त्याचें तेव्हां ठेविलें झांकोन। शरिराचा तिनें पाक केला। २३।
तेव्हां तो अतित बोले चांगुणेसी। वस्तु हे कार्याची ठेवियेली। २४।

मीही आतां जातों आपुल्या आश्रमा। कासयासी श्रम करिजेसी।२५।
तुज हे ममता झालीसे उत्पन्न। वाहतसे आण चांगुणा ते।२६।
म्हणे महाराजा सांगाल तें मान्य। वंदित चरण चांगुणा ते।२७।
पाकामाजी घाली शीर हें कांडोनी। रसिक गाय गाणीं आवडीनें।२८।
चांगुणेनें शीर घातिलें उखळीं। ओंव्या ते वेल्हाळी गात असे।२९।
सत्वधीर राजा स्वामी हा श्रीयाळ। धन्य त्याचा बाळ चिलया तूं।३०।
अतिताच्या वेशें आला असे शिव। देखोनियां भाव दृढ तुझा।३१।
आवडीनें तुज ठेवितो उदरीं। पुण्याची सामोग्री मोठी तुझी।३२।
माझे पोटीं तुवां घेतला अवतार। दाविलें चरित्र जगामाजी।३३।
येऊनि वंशाचा केला त्वां उद्धार। मित्र केला वर पार्वतीचा।३४।
तुझी माता मज म्हणती हे जन। पूर्वीचें हें पुण्य फळा आलें।३५।
तुज हा प्रसन्न जाहला सदाशिव। मागसी वैभव देईल तो।३६।
मज बाळा तुवां सांडियेलें येथें। कैलासींचा पंथ धरीयेला।३७।
अतित गेलीया सांडीन मी प्राण। येईन धांवोन तुजमागें।३८।
तुझी माझी भेटी होईल कैलासीं। सांग शिवापाशीं नमस्कार।३९।
धैर्याचा उखळ वैराग्य मुसळ। घेतलें सबळ चांगुणेनें।४०।
कांडूनियां शीर केला पाक तिनें। अतिताकरणें भोजनासी।४१।
म्हणे महाराजा करावें भोजन। वंदित चरण चांगुणा ते।४२।
येरू म्हणे बाई पात्रें वाढी तीन। पंक्ति यजमान बैसा तुम्हीं।४३।
ऐकोनि श्रीयाळ सद्गद अंतरीं। झाला असे भारी मोठा तेव्हां।४४।
तेव्हां ते चांगुणा म्हणे श्रीयाळासी। बैसावें पंक्तीसी स्वामी आतां।४५।
नवमास बाळ ठेविला उदरीं। एक दिन भारी काय झाला।४६।
अतिता संतोष होय ऐसें करा। मान्य गिरिजावर होईल तो।४७।
सिद्ध झाली तेव्हां दोघें भोजनासी। अतित तयासी पुसतसे।४८।
काय तुम्हां आतां असे हो संतान। केलें शिवार्पण म्हणती ते।४९।

निपुत्रिकाचे घरीं न घे मी हें अन्न। चालिला उठोन अतित हा ।५०।
श्रीयाळ चांगुणा वंदिती चरण । फुटकें प्राक्तन आमुचेंचि ।५१।
चिलयासारिखा गेला तोही मुन । विन्मुख अतित जातो तोही ।५२।
आता कामयासी ठेवावा हा प्राण। करावा अर्पण शंकरासी ।५३।
ऐकोनियां ऐसें अतित तो भ्याला। चांगुणे पुत्राला बाहे आतां।५४।
येईंबा चिलया धांव तूं त्वरीत । न जेवी अतित तुजवीण।५५।
राखीं आतां सत्त्व येईं तूं धांवोनी। तेव्हां शूळपाणि प्रगटले ।५६।
पंचमुख अंगीं विभूत चर्चित । अर्धांगीं शोभत पार्वती ते ।५७।
मुगुटीं जयाचे शोभतसे गंगा । कोण वर्णी शोभा स्वरूपासी।५८।
धांवतचि आला तेव्हां तो चिल्हाळ। आलिंगी स्नेहाळ सांभ त्यासी।५९।
श्रीयाळ चांगुणा बैसवी विमानीं। बाळ राजस्थानीं स्थापियेला।६०।
अखंड कैलासीं असे त्यांचा वास । धन्य तेचि दास सांभवाचे ।६१।
नामदेव त्याचे आठवीत गुण। करीत कीर्तन प्रेमभावें ।६२।

## भक्त ध्रुवकथा

११४८. राजवासी सर्व वृत्तांत ठाउका। असोनी बाळका पाहीना तो। १ ।
कामिक जगासी कामचि आवडे । स्त्रीमोहानें वेडे झाले बहु। २ ।
रावणानें वेदां ऋचा पदें केलीं । सीतालागीं आली भ्रांती कैसी। ३ ।
पाराशरा ऐसा दासीसी गमन । हें नव्हे बोलणें आश्चर्याचें। ४ ।
विश्वामित्र झाला रंभेपाठीं श्वान । सांडोनि अभिमान तपाचाही। ५ ।
नामा म्हणे कोण तयासी टाळील। प्रारब्ध करील तेंचि खरें। ६ ।

११४९. पतिव्रता मोठी सुमती सुंदरी। वाचेनें उच्चारी गुणदोष। १ ।
संचित क्रियमाण वाहोनियां सकळ। प्रारब्ध केवळ सारीतसे। २ ।
गातें हरिनाम अखंड अंतरीं। प्राणेश्वरावरी भाव निका। ३ ।
बाळकाची कळा ठाउकी तियेसी। जीवें प्राण पोसी निरंतर। ४ ।
नामा म्हणे काळ कल्याणाचा तिला। म्हणोनी जाहला हरिभक्त। ५ ।

११५०. लागलें वरूप पांचवें बाळासी । खेळे तो मुलांसी नेटेंपाटें । १ ।
पाह्याती ते लोक विस्मय पावती । त्याची अंगकांती कोण वाणी । २ ।
चंद्रा ऐसें मुख पंकजलोचन । धैर्यासी मंडण तेचि एक । ३ ।
सांवळा सुकुमार सुंदर गोजिरा । बुद्धीचा अंतरा बांधवीत । ४ ।
वीर्यधैर्य पाइक जयाचा । नामा म्हणे वाचा वर्णवेना । ५ ।

११५१. मातेलागीं पुसे पिता माझा कोण । ते म्हणे वचन ऐक बाळा । १ ।
क्षिराब्धीपासोनी चंद्रमा कां जैसा । होसी तूंहि तैसा राजपुत्र । २ ।
तरी कां आम्हां त्यानें टाकिलें निवडोन । संचित ते म्हणे पूर्वकर्म । ३ ।
जाऊं भेटूं त्याला बोलवूं कां मागें । नको बा तुज काय उणें असे । ४ ।
नामा म्हणे ऐसा दोघांचा संवाद । झाला मनीं खेद सुमतीसी । ५ ।

११५२. कोणे एके दिवशीं खेळत खेळत । गेला सभेआंत राजयाच्या । १ ।
पाहिलें राजानें ओळखिला पुत्र । झळंबलें गात्र आवडीनें । २ ।
गोजिरा गोमटा शाहाणा चपळ । नेत्र ते विशाळ पुंजाळले । ३ ।
नामा म्हणे चंद्र पूर्णिमेचा पाह्याता । समुद्रा ये भरतें तैसें झालें । ४ ।

११५३. पाचारिलें ध्रुवा जवळी त्या गयानें । जाणोनि सन्मानें आला पाशीं । १ ।
संतोष तो कांहीं बोलवेना वाचे । उदार प्रेमाचें झळंबती । २ ।
अंकीं बैसवितां कैसा तो शोभला । कोंदण रत्नाला जयापरी । ३ ।
चुंबोनियां मुख पुसतो मंजूळ । मी कोण तें न कळे तुज कांहीं । ४ ।
तो म्हणे आहेसी तात तूं निष्ठुर । आम्हांसी बाहेर ठेवियेलें । ५ ।
राजा म्हणे काय जाहालें तयासी । होसी तूं राज्यासी अधिकारी । ६ ।
नामा म्हणे ऐसा दोघांचा उद्गार । लोटों आला पूर आनंदाचा । ७ ।

११५४. सापत्न माउली होती पोषवीत । ऐकिला भावार्थ दोघांचाहि । १ ।
बुद्धीचा कांतर बुदबुदला मोठा । चावीतसे ओंठा खेद बहु । २ ।
निघुनी ते वेगीं आली रायापाशीं । म्हणे या पोरासी कां घेतलें । ३ ।

मांडी बैसवीसी लाडानें बोलवीसी । पाहूं आतां कैसी लोचनीं मी । ४ ।
शरीर त्यागावें कीं त्यासी मारावें । हेंचि जीवें भावें वाटे मना । ५ ।
मागेंपुढें कांहीं न पाहे दृष्टीस । लोटिलें बाळक पायें तिनें । ६ ।
नामा म्हणे राया तियेचा अंकिला । झाला चाकाटला आपुल्या ठायीं । ७ ।

११५५. बाईला आधीन होती जे कां नर । ते म्हणों पामर श्वानरूपें । १ ।
नेणती स्वहित कामाचिया वृत्ती । प्रवृत्ति निवृत्ति सोडोनियां । २ ।
इष्ट मित्र गुरू ऐसा कैसा भाव । सर्वही निर्वाह तोचि एक । ३ ।
नाचविले तिने तैसे ते नाचती । माकडाच्या गति गारुड्याच्या । ४ ।
नामा म्हणे राजा गुंतला तियेसी । शेंबुडातें माशी हालूं नेणे । ५ ।

११५६. उठविना बाळ आक्रंदलें पोटीं । निघे उठाउठी चमत्कारें । १ ।
आवसेचा शशी तैसा राजा झाला । येरू हा निघाला कळावंत । २ ।
आळवावा तरी धाक बाईलेचा । तेणें त्याची वाचा चाकाटली । ३ ।
हृदय फुटलें प्रेमही दाटलें । तरी काय चाले तियेपुढें । ४ ।
सूर्यासी पडेल निधनासी भूत । तैसी झाली मात राजयासी । ५ ।
नामा म्हणे मोह खोटा हा दुर्धर । त्यागावा निर्धार वेदांतीच्या । ६ ।

११५७. चालिलें बाळक रुदन करीत । देखोनी गांवांत हाहा:कार । १ ।
पाहा हें रायानें मांडिलें अनुचित । कासया तो भ्रांत झाला नेणों । २ ।
देवोनियां रत्न घेतला चिंचोका । दिला कवडी एका चिंतामणी । ३ ।
कामधेनु नेघे पोशिले बोकड । अस्पंद माकड पाळावया । ४ ।
कल्पतरू मोडी शेतां कुंपण करी । तैसी झाली परी आजीची हे । ५ ।
नामा म्हणे तिचा मोह हा दारुण । राजा ती आधीन झाला तैसा । ६ ।

११५८. घरा येतां बाळ देखिलें मातेनें । दाटली दु:खानें बोलवेना । १ ।
आक्रंदोनि पुढें मोकलोनि धाये । नेणों कैसें काय झालें यासी । २ ।
घालोनियां कव घेतां कडेवरी । दोन्ही नेत्र करीं पुसीतसे । ३ ।
काय झालें बाळा सांग बा वृत्तांत । बा कोण तूतें पाहों नेणे । ४ ।
नामा म्हणे असो प्रेमा तो अपार । पुढील विचार बोलीयेजो । ५ ।

११५९. न कळतां मुलांसंगें मी खेळत। गेलों सभेआंत राजयाच्या। १ ।
काय सांगों माये जाहला अपमान। तेणें माझें मन दुखावलें। २ ।
मातें प्रेमभावें रायें आळवीलें। मांडी बैसविलें सन्मानेशीं। ३ ।
आली आकस्मात् दुर्धर कोपोन। त्यांस कीं ते कोण मी तों नेणें। ४ ।
ताडोनियां पायीं मज उठविलें । निघालों मी सहजें तत्क्षणीं। ५ ।
कोणी नुठवी ऐशाठायीं म्यां बैसावें। तें कोणा मागावें सांग माये। ६ ।
नामा म्हणे दिसे पाहातां बाळक। ज्ञानची निष्टंक मुसावलें। ७ ।

११६०. ऐकोनियां वाणी पावली ते रमा। बोलिली विश्रामा जीवाचिया। १ ।
दुर्जनाचा भाव ऐसाचि वोखटा। दर्प त्याचा मोटा आवरेना। २ ।
दुसऱ्याचें बरें तें कैसें सोशिती। बळें निखंदिती साटोपानें। ३ ।
दीपाचा प्रकाश सोशीना पतंग। जळताही अंग झेंप घाली। ४ ।
चंद्रोदया आधीं फुटतील डोळे। ते काय कावळे पाहातील चंद्र। ५ ।
आधींच सावत्र संबंधी पापीण। राजाही आधीन जिच्या झाला। ६ ।
सिंहासनीं त्याच्या मांडीये बैससी। हें ते कैसें सोसी निसंगळ। ७ ।
दैवहीन आम्हीं देवचि कोपला। आपुला तो झाला परावा कीं। ८ ।
देवें द्यावें तव्हां भोगावें सकळ। न चले कदा बळ दुसऱ्याचें। ९ ।
कासया तूं बाळा स्फुंदसी दुःखानें। देवाहून कोण सखें आम्हां। १०।
नामा म्हणे हित ऐकतां मायेचें। चित्त त्या बाळाचें उठावलें। ११।

११६१. पूर्वजन्मीं त्यानें साधियेला योग। कांहींसा वियोग झाला होता। १ ।
कैसा नेटपाटे उन्मेख फुटला । बालपणीं त्याला ज्ञान झालें। २ ।
विरक्ती वोळगे पाइक होउनी । शांती पुढारूनी माळ घाली। ३ ।
शमदम अंकित पुढारले बळें । योग तो अढळ सदा तेथें। ४ ।
मान गर्व मनाचा खुंटला विचार। थिता अहंकार तोहि गेला। ५ ।
नामा म्हणे बाळ बोलिलें जाणोनि। माउली हांसोनि काय बोले। ६ ।

११६२. संकल्पाचा मळ नेत्रीं निढाळा । त्यालागीं तो डोळा काय दिसे । १ ।
जेथें देखों तेथें तोचि तो कोंदला । विश्वामाजी भरला विश्वंभर । २ ।
मोठे थोर थोर तापसी नाडीले । कामानें वोढिले मायींतेची । ३ ।
वेदाचें पुनीत यज्ञशीळ सारें । झाकवती बारे वासनेनें । ४ ।
दांभीक मगरीं गिळिलें सर्वांसीही । त्यालागीं तो नाहीं ऐसा भासे । ५ ।
नामा म्हणे ऐसी बोलली जननी । बाळ मोठा ज्ञानी जाणवला । ६ ।

११६३. केला नमस्कार मातेला उठोनी । निघाला तेथुनी लागवेगें । १ ।
वनीं बैसोनियां घरोनी विश्वास । आळवावा ईश ऐसें चित्तीं । २ ।
हाक मारीत मागें माउली चालली । तियेसवें बोली करीना तो । ३ ।
एकाकी तो नीट चालीला त्वरेनें । पाहोंनियां जन स्तब्ध झाले । ४ ।
बोलवितां कांहीं बोलेना कोणासी । अघोर स्थळासी प्रवेशला । ५ ।
मातेसी ठाउकें तयाचें अंतर । म्हणोनी ते स्थिर झाली ठाईं । ६ ।
नामा म्हणे पूर्व पुण्याचिया वळें । मन त्याचें झालें स्थीर तेथें । ७ ।

११६४. नगरीं नरनारी समस्तही । म्हणती झालें कांहीं राजयाला । १ ।
बाळ तें केवढें धाडीलें वनासी । याचिया धैर्यासी दुजा नाहीं । २ ।
मागें बहु झालें नाहीं हें देखिलें । हें तों नव्हे भलें विचारितां । ३ ।
सर्वादिकीं त्यासी सांगितले वृत्त । कारे तूं निवांत बैसलासी । ४ ।
नामा म्हणे राजा ध्रुवापाठीं गेला । काय तो बोलिला ऐका त्यासी । ५ ।

११६५. म्हणे बा आतां करिशील कायी । एकला ये ठायीं येऊनियां । १ ।
वय हें केवढें बुद्धि हे केवडी । बांधां काढाकाढी तपाची कां । २ ।
व्याघ्र आणि सिंह जंबुक विखार । नांदती या घोर वनामाजी । ३ ।
म्हैषा मसको भूतें वसती रानीं । तुज माये रानीं झोंबतील । ४ ।
नको बा या ठाईं राहूं चाल घराप्रती । जाऊं जे कां प्रीती तेचि देऊं । ५ ।
नामा म्हणे ध्रुव पाहेना बोलेना । आपुलिया ध्यानामाजीं मग्न । ६ ।

११६६. मधुवन चांगलें लोचनीं देखीलें । तेथें मन रंगलें बाळकाचें । १ ।
राहूं येथें करूं देवाची प्रार्थना । म्हणोनियां मना बोधवीत। २ ।
सरोवर दिव्य त्यामाजीं कल्हारें । भोंवताले मयुर नाचताती । ३ ।
साउली सुंदर सुमनें मनोहर। देवाचा विहार तये ठायीं । ४ ।
नामा म्हणे ऐसा निश्चय नेमून। ध्रुव तये वनीं स्थिरावला । ५ ।

११६७. राजा म्हणे याला देतों पंच ग्राम । तो म्हणे आत्माराम देता आहे। १ ।
आशा सांडोनियां निराश जाहला । शरण देवाला जावयासी। २ ।
चतुर्थ भागानें राज्य घे वांटोनी । म्हणे चक्रपाणी देता आहे। ३ ।
अर्धें भूमंडळ घेईं रे उदारा । म्हणे विश्वंभरा लाज माझी। ४ ।
संपूर्ण हे महि तुजचि वोपीन । म्हणे नारायण सांभाळील। ५ ।
नामा म्हणे ऐसा गणीना भूपातें । निश्चय चित्तांत एक झाला । ६ ।

११६८. बाळकाच्या बोला राजा भांबावला । म्हणे झालें याला ज्ञानगम्य । १ ।
शांती याचे अंगीं बाणलीसे नीट। तेणें नेटपाटें पुढारला। २ ।
मी तों झालों वांयां कामाचा किंकर । केला म्यां अव्हेर बाळकाचा। ३ ।
कीर्ति हे त्यागोनी दुर्दशा आणिली। ऐसी होऊं सरली बुद्धि फिकी। ४ ।
नामा म्हणे राजा लाजला चित्तांत। प्राणाविण प्रेत तयापरी। ५ ।

११६९. ठेवुनी भोंवताले रक्षणाला दूत। सांगतो तयातें सत्तारूपें। १ ।
तुम्ही आतां याचें करावें रक्षण। व्याघ्र सिंह येणें बाधा नव्हे। २ ।
क्षणाक्षणा मातें सांगावा वृत्तांत। वनीं भूत प्रेत हिंडताती। ३ ।
चोर हेर खळ रात्रिचींये वेळे । रहावें भोंवताले सावधान। ४ ।
नामा म्हणे ऐसें सांगे त्या दुतांसी। आपण घरासी येता झाला। ५ ।

११७०. बैसे तो निवांत होउनी त्याठायीं। राहोनियां कांहीं करिता झाला। १ ।
न कळे भक्तिभाव ध्यावें कैसें त्यासी। देव कोण त्यासी ठावें नाहीं। २ ।
भावार्थानें सर्व इंद्रियें खुंटलीं। प्रारब्धानें दिली वाट तया। ३ ।

साध्यसाधनाचा उपाव कळेना । ध्यान तो धारणा कैंचि तेथें । ४ ।
नामा म्हणे गुरु करावा तें नेणे । अद्भुत विंदान मांडियेलें । ५ ।

११७१. वाचितां अध्यात्म जाणितांही अर्थ । गुरूवीण व्यर्थ सर्व कांहीं । १ ।
करावा तो आधीं सद्गुरू प्रसन्न । त्याचिये कृपेनें सर्व साधे । २ ।
योग याग तपें चित्त शुद्ध होय । गुरूवीण नये मोक्ष हातां । ३ ।
निर्मळ जीवन तीर्थावीण पावन । तैसा गुरु जाण साधकांसी । ४ ।
नामा म्हणे गुरु कृपेचिया बळें । मूर्खही तरेल भाक माझी । ५ ।

११७२. एकाएकीं दैव उदेलें ध्रुवाचें । येणें नारदाचें झालें तेथें । १ ।
देखियेलें पोर ठाकलेंसे वनीं । भावना धरोनी अपैसया । २ ।
साधुचा भाव उदकाचिया परी । लव तेथें भरी उणें नाहीं । ३ ।
आर्ताचा हे आर्त पुरवावा हा नेम । साधूचा निःसीम स्वभाव कीं । ४ ।
गिरी देखे मेघ मग तो कैसा थोर । तैसे ते उदार साधुसंत । ५ ।
आतां या बाळाचा योग क्षेम कैसा । पुसावया धिवसा नामा म्हणे । ६ ।

११७३. नारदें पाहिले बाळकाची स्थिती । त्याच्या चित्तीं शांती भरली दिसे । १ ।
कल्पनेचा दाता म्हणे तयालागीं । बाळा कवणालागीं आठविसी । २ ।
वय तरी थोडें भावना उदंड । काय तुज चाड सांग आतां । ३ ।
न बोलसी तरी साधेना हें काज । अंतरींचें नीज मज कळे । ४ ।
आला लाभ काळ फळलीसे भावना । उघडोनी लोचना पाहीं मज । ५ ।
ऐकोनी ध्रुवानें सज्जनाची वाणी । नेत्र विकासोनी पाहे तदा । ६ ।
पुढें उभा मुनि लावण्याचा गाभा । आपुलिया लाभालागीं नाचे । ७ ।
नामा म्हणे ध्रुवें वंदिले चरण । बोलिले वचन ऐका आतां । ८ ।

११७४. बैसायासी गेलों पितयाचें अंकीं । उठविलें एकी माउलीनें । १ ।
सरेना सरेना कोणी उठविना । ऐसा ठाव जाणा वांछितसें । २ ।
उपाय न कळे मागावें कोणासी । भावना आपैसी उठावली । ३ ।
नामा म्हणे शब्द ऐके देवऋषी । मग त्या बाळकासी आश्वासिलें । ४ ।

११७५. ब्रह्मांड नयाच्या पोटीं सांठवलें । तेंचि साकारलें ध्रुवापाशीं । १ ।
कैसें तें बोलावें कैसें तें जाणावें । वेदांसही ठावें नोहे जे कां । २ ।
निळोत्पल रवि गगनाही हिणावी । ऐसी शोभा दावी इंद्रनीळ । ३ ।
मरगजालागीं जोडलें सौरभ्य । आनंदाचे कोंब चारी भुजा । ४ ।
मुगुट कुंडलें सर्वांगी भूषण । लेणियासी लेणें अंगाचिया । ५ ।
इंद्रधनुष्याची मांडणी मेघाची । माळ वैजयंती गळां रुळे । ६ ।
कस्तुरी कपाळीं रेखलीसे भाळीं । उटी ते पिवळी सर्वांगासी । ७ ।
सायुध सुंदर शोभताती कर । प्रभा ते अपार कोंदाटली । ८ ।
अभय हस्त एक पुढें तुकावला । आपुल्या भक्ताला सांभाळाया । ९ ।
गोजिरी गोमटी ध्यानीं उभी ठेली । नामया माउली माथा ठेवी । १० ।

११७६. ऐसें कांहीं एक अपूर्व देखिलें । हृदयीं कोंदाटलें मूर्तिरूप । १ ।
परी तें कांहीं तैसें न राहे निश्चळ । चित्त तें चंचळ माघारलें । २ ।
पुढती सायास करी नानापरी । न राहे अंतरीं साचोकारें । ३ ।
आवडीनें जीव झाला कासावीस । तंव त्या परेशास कृपा आली । ४ ।
ब्राह्मणाचें रूप उभा ठेला पुढें । निज भक्तांचें कोडें पुरवावया । ५ ।
कपोलासी शंख लाविला स्वहातें । तेव्हांचि तयातें ज्ञान झालें । ६ ।
वैकुंठ पिठीचें अधिष्ठान साचें । तें रूप तयाचे दृष्टी पडे । ७ ।
नामा म्हणे काय सांगावा नवलावो । भक्तांलागीं देवो साहाकारी । ८ ।

११७७. स्तवीतसे वाचे जोडोनियां कर । वेदां अगोचर ऐसें कांहीं । १ ।
धन्य धन्य आतां उद्धरलों स्वभावें । माझें मज ठावें झालें निज । २ ।
विश्वाच्या विसांव्या जिवाचिया जिवा । देवाचिया देवा दिनानाथा । ३ ।
तूंचि सर्वा आदिमायेची अवधी । तुजवीण कधीं दुजें नाहीं । ४ ।
एक तूं अनेक अनेकीं तूं एक । येणेंही सांशंक बोलवेना । ५ ।
दातृत्वाची आदी कल्याणाची निधी । चित्त मन बुद्धि सर्व तूंची । ६ ।

तुझिये कृपेनें गेले भावाभाव । आणिक मागावें ऐसें नाहीं। ७ ।
कधींही कोणता चळेना ढळेना। मातें ऐशा स्थाना बैसवावें। ८ ।
नामा म्हणे ऐसी करीन प्रार्थना। घाली लोटांगणा पायांवरी। ९ ।

११७८. आम्हांसीनि देव बोलिले ध्रुवासी। इच्छा तुझी जैसी तैसें करूं। १ ।
सहज सत्येनें ऐसें कांहीं जहालें। अढळ दिधलें बैसावया। २ ।
चंद्र सूर्य तारा शशि ऋषी थोर। हे ज्या आधारें हिंडताती। ३ ।
ब्रह्मलोक साचे परी ते न नासे। ऐशा परी त्यास बैसविलें। ४ ।
क्षतेचा दिवस योजनें उन्नती। बैसवी श्रीपति ध्रुवालागीं। ५ ।
सर्वी सर्वत्रांच्या लोचना गोचर। रमणीये अपार वर्णवेना। ६ ।
नामा म्हणे दुजें वैकुंठ केवळ। भक्तालागीं केलें देवरायें। ७ ।

११७९. ऐसें झालें ध्रुवाचें आख्यान। ऐकती जर जन एका भावें। १ ।
तयावरी कृपा देवाची होईल। केलें तें लाभेल सर्व काज। २ ।
पुत्राभिष्ट पुत्र धनाभिष्ट धन। जैसें ज्यांचे मन तैसें होय। ३ ।
नामा म्हणे तया कल्याण सर्वदा। चिंतितां गोविंदा काम पुरे । ४ ।

## ↔ भक्त उपमन्यु कथानक ↔

११८०. ऐका श्रोते सावधानता। सांगेन उपमन्युची कथा।
एक्या भावें परिसतां। सायुज्यता पाविजे। १ ।
बाळ तो लडिवाळ तान्हा। वाढे मातेचिया स्तन पान्हा।
परि ते असे दुर्बळपणा। उपमन्यु नांव तयेचें। २ ।
उपमन्यें मागितलें। कृष्णें तयासी काय दिधलें।
तें सांगेन वहिलें। चित्त देउनी परियेसा। ३ ।
ब्राह्मणासी एक पुत्र झाला। पितयानें संतोष मानिला।
थोर कष्टें वाढविला। तयाचें पुत्रपण फिटलें। ४ ।
बाळ जाहला जाणता। पितयासी उपजली दुधाची चिंता।
दूधच ऐकिलें बोलतां। तेंचि मातेसी मागत। ५ ।

मग कर्डी कांडोनी जनकजननी। त्याचें केलें शुभ्रपाणी।
बाहेर दूध म्हणउनी। वाटींत भात कालविला। ६ ।
तंव शेजारी ब्राह्मणानें श्राद्ध केलें। त्यानें त्या बाळकास जेवावयास नेलें।
षड्रस पक्वान्न वाढिलें। दूध क्षीर नाना परीचें। ७ ।
तयासी वाढिली दूध क्षीरी। बाळक जेविलें पोटभरी।
पुसोनियां तये घरीं। माते मागूं जेवावया। ८ ।
गेला आपुलिया घरा प्रती। बाळ तो निद्रा करी रातीं।
प्रात:काळीं भूक लागे मागुती। मागे दूधभात जेवावया। ९ ।
पुढती कर्डी वांटुनि जननी। त्याचें काढिलें शुभ्र पाणी।
येरें टाकिलें थुंकोनी। माते दूध कालचें नव्हे। १० ।
बारे त्या समर्थांचे घरीं। देवें दिधलें दूध क्षीरी।
आम्हां दुर्बळाचे घरीं। तें दूध कोठुनि मिळेल। ११ ।
कोठें आहे तो श्रीहरी। तो मज दावीं वो डाडकरी।
दूध मागेन निर्धारीं। क्षुधा अंतरीं बहु पीडी। १२ ।
देव्हारां श्रीहरिची मूर्ती। नेउनी दाखविली बाळाप्रती।
बारे हा लक्ष्मीपति। दूध या प्रती मागावें। १३ ।
बाळ खळ घेउनी बैसला तेथें। देवा दूध पोटभर दे मातें।
मी कोठें जाऊं नेदी तूतें। दूध घेतल्यावांचोनी। १४ ।
ऐसे तिघां तीन उपवास पडती। माता पिता चिंता करिती।
लोकीं मिळोनी बहुतीं। उठवूं पाहती बाळकातें। १५ ।
बाळा तुजकारणें। एक गाय देतों आणुन।
येरू न मानी त्यांचें वचन। म्हणे देईल लक्ष्मीरमण मजलागीं। १६ ।
माता समजावी बहुता वचनीं। त्या ब्राह्मणाचें दुध देलें आणुनी।
हें पाहें पां चाखोनी। दूध कालचें होय कीं नव्हे। १७ ।

दूध आणिलें भीक मागुनी । संतोष न वाटे माझे मनीं ।
देव देईल मज लागुनी । तरी दूध सेवीन । १८ ।
देवें धुरूसी अढळपद दिलें । तैसेंच दूध देई मज संचलें ।
न देतां अव्हेरिलें । तरी प्राण देईन निर्धारीं । १९ ।
देवा दुधाची शिधोरी । कां मज न देसी श्रीहरी ।
आळ पुरवीं बा मुरारी । दूध पोटभरी मज देईं । २० ।
मज बहु लागलीसे क्षुधा । अझुनी कां न पावसी गोविंदा ।
तुज मागत नाहीं धनसंपदा । एका दुधा वांचोनी । २१ ।
देवा नको पाहूं निर्वाण । देह करवतीं घालीन ।
प्राण तुज समर्पीन । सत्य वचन पाहें माझें । २२ ।
देखोनि बाळकाचें अंत:करण । कळवळिला नारायण ।
सांडोनि क्षीरसागर शेषशयन । येत धांवून बाळकाप्रती । २३ ।
सुदर्शन घेऊनि हातीं । पावला उपमन्यु आकांतीं ।
प्रकट झाली विष्णुमूर्ती । निजरूप दाविलें । २४ ।
बाळ येऊनि लागला चरणीं । देवें हृदयी धरिला आलिंगुनी ।
वरदहस्तें कुरवाळुनी । कृपादृष्टी अवलोकी । २५ ।
सांग बाळा प्रसन्न झालों तूंतें । काय संकल्प तो माग मातें ।
येरू म्हणे दूध द्यावें कृपावंतें । जें कल्पांतींही न सरेची । २६ ।
हांसून बोले वैकुंठरमण । पहावो बाळ केवळ अज्ञान ।
म्हणे मी झालों आतां प्रसन्न । काय दूध तुवां मागावें । २७ ।
देवा या दुधाचि कारणें । एवढें केलें म्यां निर्वाण ।
सहित मातापिता तियेजण । क्षीर भोजन मज द्यावें । २८ ।
माता पिता उपमन्यु । तिघे गरूड पृष्ठीं वाहवून ।
क्षीरसागरीं ठेवी नेऊन । दूध प्राशन सुखें करा । २९ ।

राज्य देउनी क्षीरसागरीचें । अमर शरीर केलें त्यांचें।
अखंड दर्शन श्रीहरीचें। सायुज्यपद त्या दीधलें । ३० ।
यालागीं काया वाचा मनें। जावें विटोबासी शरण ।
आर्त मनोरथ पूर्ण । निजभक्ताचें करीतसे । ३१ ।
विष्णुदास नामयाचा स्वामी। तो श्रीहरी वोळगा तुम्ही।
जें जें इच्छिलें अंतर्यामीं । इच्छा दानीं पुरवील । ३२ ।

## नक्र उद्धार

११८१. नक्र बोले ऐकें हृषिकेशी। नाममात्रें तारिलें गजेंद्रासी।
काय कृपण झालें मजविशीं । आतां कैसा बा मोकलूनि जासी। १ ।
कळलें तुझें रे देवपण आतां । सोडीं ब्रीद आपुलें दीनानाथा। ध्रु० ।
दीनानाथ म्हणविसी कशासाठीं । द्वैतभाव का धरियेला पोटीं ।
कैसें पाप लाविलें माझे पाठीं । तुझें रूप देखिलें आजि दृष्टि। २ ।
दीनानाथ बोलती वेद चारी । साधुसंत गाताती नानापरी ।
सत्य ब्रीद मिरविसी चराचरीं। सोडीं ब्रीद आपुलें झाडकरी। ३ ।
रज मात्रें तारिली अहिल्या शिळा। नाम मात्रे तारिले अजामेळा।
पापी कैसा मी सांग घननीळा। तुझें रूप देखिलें आजि डोळां। ४ ।
न्याये ब्रीद येईल तुझें आतां। पापी कैसा मी सांग दीनानाथा।
कैसें पाप लाविलें माझ्या माथां । अझुनि लाज कां नये तुझ्या चित्ता। ५ ।
नक्र बोले देवासी हांसू आलें। निंदा नोहे स्तवन माझें केलें।
दीनानाथें तात्काळ उद्धरिलें । विष्णुदास नामा कौतुक बोले। ६ ।

## दशावतारजनक श्रीविठ्ठल

११८२. भक्तांसाठीं देव अवतार धरी। कृपाळु श्रीहरि साचखरा। १ ।
तो हा महाराज चंद्रभागे तीरीं। उभा विटेवरी पांडुरंग। २ ।
ब्रह्मयाचे वेद चोरी शंखासुर। मत्स्य अवतार तयालागीं। ३ ।

समुद्र मंथनीं मंदार बुडाला। कूर्मरूप झाला तयेवेळीं। ४ ।
हिरण्याक्ष धरा नेतां रसातळा। वराहरूपें त्याला वधियेलें। ५ ।
प्रल्हादासी पिता गांजी नानापरी। स्तंभीं नरहरी प्रगटला। ६ ।
देवकाजीं झाला वामन भूतळीं। बळीसी पाताळीं घातियेला। ७ ।
भूमिभार झाला क्षत्रियांचें कुळ। केलेंसे निर्मूळ परशुरामें। ८ ।
सीतेचिया काजा रावण मर्दिला। सूर्यवंशीं झाला रामचंद्र। ९ ।
गोकुळीं जन्मला श्रीकृष्ण आठवा। होऊनि पांडवां साह्यकारी। १० ।
व्रतभंगासाठीं बौद्ध अवतार। झाला दिगंबर अवनिये। ११ ।
कलंकि अवतार होणार श्रीहरि। तेव्हां पृथ्वीवरी तृण न उरे। १२ ।
नामा म्हणे तुझे अनंत अवतार। तेथें मी पामर काय वर्णूं। १३ ।

११८३. प्रथम अवतारीं रूप मच्छ झाले साजिरें। वधोनि शंखासुर वैरी आणिले वेद। १ ।
कूर्म अवतारीं सांवरीली सृष्टी। वराहद्विज नेहटी धरणीधरू। २ ।
प्रल्हाद कैवारा स्तंभाभीतरी। बळी बंधन हरी प्रगट झाला। ३ ।
रेणुका नंदन द्विजकुळ पाळण। त्र्यंबक भंजन रघुनाथ। ४ ।
गोकुळीं अवतारू सोळासहस्र वरू। आपण योगेश्वरू बौध्यरूपीं। ५ ।
अवतारू वदतसे वरू। नामया दातारू केशिराज। ६ ।

११८४. देवा तूं प्रथम गर्भवास भोगिसी। सागरीं जळचरू मत्स्य झालासी।
कमठ पाठी नसंडी कैसी। कूर्मे कासाविसी केलें तुज। १ ।
अपवित्र नाम आदि वराह। याहुनि थोर कूर्म कांसव।
अर्ध सावज अर्ध मानव। हे भवभाव कर्माचे। २ ।
खुजेपणें बळिस पाताळीं घातलें। तेणें कर्में तयाचें द्वार रक्षिलें।
पितयाचे वचनें मातेसी वधिलें। तें कर्म जडलें परशुरामा। ३ ।
श्रीरामा झाल्या आपदा बहुता। कर्में भोगविलें अंतरली सीता।
भालुका तिर्थी वधियलें अवचिता। नाम अच्युता तुज झालें। ४ ।

ऐसा कल्कि होऊनि बौद्ध राहिलासी। तूं कलंकिया लोकां मारिसी।
आपुल्या दोषासाठीं आणिकां दंडिसी। निष्कळंक होसी नारायणा। ५ ।
ऐसा तूं बहुता दोषीं बांधिलासी। पुढिलाचि जन्में अवगलोसी।
विष्णुदास नामा म्हणे हृषिकेशी। तुझी भीड कायसी स्वामियाहो। ६ ।

११८५. मीनरूप झाला प्रथम तो हरी। ज्याचा चराचरीं वास होता। १ ।
मार्कंडेयालागीं दाखविली माया। वटपत्रीं तया रूपासी हो। २ ।
बाळमुकुंदानें स्वरूप दाविता। श्वासोच्छ्वास घेतां चौदाकल्प। ३ ।
पाहोनियां माया अंतरीं निमाला। घाबरा तो झाला ऋषिराज। ४ ।
आश्वासून तया दाखविली माया। धन्य देवराया नामा म्हणे। ५ ।

११८६. मत्स्य कच्छ क्रोड मृग ते खुजट। जेथुनि प्रगट झालीं रूपें। १ ।
तेंचि ब्रह्म उभें भिवरेच्या तिरीं। हात कटावरी ठेवूनियां। २ ।
मातृघाती हिंडे वनीं जो रडत। चोर जार घात करी दुष्ट। ३ ।
दिगंबर अश्वारूढ खड्गधारी। पृथ्वीचा जो करी ग्रास एक। ४ ।
नामा म्हणे मुंगी आदि ब्रह्मवरीं। नाना अवतारीं एकलाचि। ५ ।

११८७. उदकीं बुडतां क्षिति तारियेली। भूतें सारियलीं दाढेवरी। १ ।
अद्यापि तूं होसी ऐसा हृषिकेशी। धरूनि मारिसी बळिवंत। २ ।
नामा म्हणे धन्य अघटित करणी। दाढेसी धरूनि वराह तूं। ३ ।

११८८. प्रल्हादकारणें स्तंभीं अवतार। भक्त राजेश्वर म्हणताती। १ ।
जळीं स्थळीं आहे सर्वां ठायीं हरी। प्रत्यक्ष तूं त्याहाळी स्तंभामाजी। २ ।
ऐकतांचि वाणी क्रोधासी चढला। खड्ग तो काढिला कोशांतून। ३ ।
तयेकाळीं हाक मारिली प्रचंड। फोडिलें ब्रह्मांड नरसिंहें। ४ ।
धरूनियां दैत्य वेगीं मांडीवरी। नखानें तो चिरी पोट त्याचें। ५ ।
जयजयकार झाला ब्रह्मादि पावला। इंद्रादिक आला देवांसहित। ६ ।
करूनियां स्तुति देव शांतविला। प्रल्हाद तो झाला पूर्ण भक्त। ७ ।
नामया हो झाली मायबाप भेटी। लाभ उठाउठी आनंदाचा। ८ ।

११८९. बळीराजा दैत्य बहुत मातला। संपत्ति हरिल्या देवांचिया। १ ।
तयाकाळीं जे जे देव आठविती। प्रार्थना करिती देवदेवा। २ ।
तयाकाळीं तुवां आदिति उदरीं। अवतारधारी बटु झाला। ३ ।
छळुनियां बळी पाताळीं घातला। आपण राहिला तया द्वारीं। ४ ।
देव देवपदीं बैसऊनि सारे। राखीतसे द्वार नामा म्हणे। ५ ।

११९०. मारावया राजे ब्राह्मणाचे घरीं। रेणुकाउदरीं अवतार। १ ।
करूनियां पृथ्वी निःक्षत्रिय बहुवेळां। दान ते सकळां विप्रां दिली। २ ।
खुंटविला चिरंजीव अद्यापि तो आहे। आत्मरूपीं पाहे निजानंदीं। ३ ।
दाशरथी रामा समागम झाला। तेणें एक बाण दिला म्हणे नामा। ४ ।

११९१. दशरथ राजा संतान तें नाहीं। म्हणोनियां पाही ऋषेश्वरीं। १ ।
करूनि विनंति पुत्रेष्टी हे केली। पुरोडाश भक्षिली पत्नियांनीं। २ ।
तपाच्या समार्थ्यें पुत्र चार झाले। अविनाश आले अवतारासी। ३ ।
रघुपति रामें पूर्ण मुसावलें। चैतन्य प्रगटलें कौसल्येसी। ४ ।
तेणें केली ख्याति राक्षस मारिले। रामराज्य केलें त्रैलोक्यांत। ५ ।
नामा म्हणे मज नाम गोड आहे। त्यालागीं तूं पाहे विचारुनी। ६ ।

११९२. श्रीकृष्ण लीलामृत वर्णनाचि गोडी। कथेचि परवडी आवडती। १ ।
तयाचा विस्तार तोचि बोलवीता। आहे सर्व सत्ता त्याचे हातीं। २ ।
तेथें मी पामर काय बोलूं वाणी। दिसे केविलवाणी संतांपुढें। ३ ।
म्हणोनि विस्तार आटोपिला नाहीं। वेदांसी तें नाहीं पुरतें ठावें। ४ ।
नामा म्हणे नामें आठवा अवतार। पूर्ण ब्रह्म साचार कृष्णरूप। ५ ।

११९३. मध्यें झालें मौन देव निजध्यानीं। बौद्ध ते म्हणोनि नांवें रूप। १ ।
पाखांडें बहुत कलिमाजी झालीं। वर्णाश्रम सकळीं बुडविलें। २ ।
पापाचिया राशी जळतील नामीं। निश्चय हरिनामीं नामा म्हणे। ३ ।

११९४. कलीचिये अंतीं होणार कल्की । मारील म्लेंच्छ कीं घोड्यावरी । १ ।
करील धर्मांची उभारील गुढी । कृतयुगा प्रौढी तोंचिकरी । २ ।
तोंवरी साधन हरिनाम कीर्ति । संतांची संगती नामा म्हणे । ३ ।

११९५. होसि भक्तांचा कोंवसा । तुझीं ब्रीदें हृषिकेशा ।
निववविलें सायासा । कृपासिंधु मुरारी । १ ।
अंबरऋषिकारणें । दहा वेळ गर्भवासा येणें ।
अवतार धरिला नारायणें । गजापूर नगरीं । २ ।
अंदुरायाच्या घरीं । बाळ जळसेनाच्या कुमरीं ।
मत्स्य रूप अवतार धरीं । वेदहरण कैवारी नारायण । ३ ।
विद्यापुर नगरीं । अंधरूराजा राज्य करी ।
श्रियादेवी त्या सुंदरी । उदरीं कुमरु जन्मला । ४ ।
पृथ्वी रसातळवटीं । जातां थोर अंदोळली सृष्टी ।
धांवण्या धांवले जगजेठी । धरा पृष्ठीं सांवरिली । ५ ।
मर्गजपुरीं पुरपती । हिरण्याक्ष चक्रवर्ती ।
अग्नि असे जनवंती । घरीं बाळ वराह । ६ ।
त्रिदशदेवश्रिया चाडा । हिरण्याक्ष वधिला गाढा ।
भूगोल धरूनियां दाढा । केला निवाडा स्वर्गीचा । ७ ।
कर्पूरपुरपाटण । हरिभक्तीचें हें स्थान ।
सद्यादेवी प्रिया नंदन । उदरीं नृसिंह जन्मला । ८ ।
पित्या पुत्रा झाली कळी । स्तंभीं प्रगटला तयेवेळीं ।
असुर मारिला करकमळीं । भक्त प्रल्हाद रक्षिला । ९ ।
कश्यपनंदनवर्धन । कोंवळादशाचा वामन ।
खुजट रूप धरून । महेंद्रपुरीसी आला । १० ।
दानें तपें व्रतें बळी । तोही घातला पाताळीं ।
अद्यापि राहिला जवळी । चरणातळीं पद देउनी । ११ ।

रेणापुरीं देवी रेणुका । लाधली जमदग्नीस देखा ।
तिचें उदरीं विश्वतारका । परशुराम जन्मला ।१२।
असुरीं वधियेली माया । म्हणे धांवें पुत्रराया ।
अवचित पातला धांवया । सहस्रार्जुन मारिला ।१३।
अयोध्या नाम नगरी । जन्म कौसल्ये उदरीं ।
देवभक्तांचा कैवारी । दशरथनंदन राघव ।१४।
राम त्रैलोक्यीं वीर दारूण । तेणें वधियेला रावण ।
चिरंजीव पद देऊन । राज्यीं बिभीषण स्थापिला ।१५।
मथुरा नामें नगरीं । वसुदेव देवकी उदरीं ।
कृष्ण आठवा अवतारी । लीला विग्रहि जन्मले ।१६।
कंस चाणूर मर्दिले । विमळार्जुन उन्मळिले ।
सप्त गर्भांचे सूड घेतले । रक्षिलें गाई गोपाळां ।१७।
बौद्ध श्रीवत्साच्या घरीं । जन्म शांभवीच्या उदरीं ।
राजा कांतिये नगरीं । निरंतर रूपें राहिला ।१८।
ध्यान मुद्रा मांडुनियां । वस्त्रें शस्त्रें त्यजूनियां ।
राहिला पैं निरंजनिया । भक्तिभाव ओळखे तो ।१९।
कल्कि जसरायाचा पुत्र । सावित्री देवीचा कुमर ।
शंभलापुरीं करील अवतार । दाही रूपें प्रगटला ।२०।
ऐसा अमूर्त मूर्ति विटेवर । उभा राहिला निरंतर ।
वैष्णुदास नामयाचा दातार । वर विठ्ठल पंढरीये ।२१।

## कलिप्रभाव

११९६. ऐका कलियुगाचा धर्म । पुत्र सांगे पितयास काम ।
ब्राह्मण त्यजिती ब्रह्मकर्म । ऐसें वर्तमान मांडलें । १ ।
माया बहिणी दवडिती । स्त्री आपुली आणविती ।
ऐका ऐका नवल गती । अगा श्रीपति परियेसी । २ ।

भार्या न करिती पतिची सेवा । नाहीं कवणा धर्माचा हेवा ।
वर्ततसे पापाचा ठेवा । अगा केशवा परीयेसी । ३ ।
अरे वैराग्याच्या वराचारु । आणि संन्यासा मोह थोरु ।
संता बहुत अहंकारु । रूसणें नलगे कोणासी । ४ ।
झाला कलीचा प्रवेशु । आम्हा नामाचा विश्वासु ।
हृदयीं हृषिकेशु । विष्णुदास नामा म्हणे । ५ ।

११९७. ऐका कलियुगींचा आचार । क्रियाभ्रष्ट झाले नर । १ ।
मंचकावरी बैसे राणी । माता वाहतसे पाणी । २ ।
स्त्रियेसी अलंकार भूषण । माता वळीतसे शेण । ३ ।
स्त्रियेसी पाटावाची साडी । माता नेसे चिंध्या लुगडीं । ४ ।
सासुसासऱ्यां योग्य मान । मायबापा न घाली अन्न । ५ ।
साली सासवा आवडती । बहिणभावां तोंडीं माती । ६ ।
स्त्रियेसी एकांतगोडी । मातेसी म्हणे रांड वेडी । ७ ।
म्हणे विष्णुदास नामा । ऐसा कलियुगींचा महिमा । ८ ।

११९८. कांहीं सांगोनि गेले वचना । कृष्ण उपदेशी पंडुनंदना ।
येथें राहतां पाविजे बंधना । थोर वर्तमान कलियुगीं । १ ।
ते कलिमाझारीं । पुत्र पित्याचे वैरी ।
घरची माता होय कामारी । पुरूषांतें नारी अव्हेरिती । २ ।
न येती वृक्षा फळें आटती धेनु । न पिके मही न वर्षे घनु ।
यापरी आटेल सकळ जनु । ऐसें जगज्जीवनु बोलिले । ३ ।
आणिक एक वर्तेल अपवित्र । ब्राह्मण सांडितील वेदमंत्र ।
आचार सांडुनि होती शुद्र । ऐसे अपवित्र कलियुगीं । ४ ।
थोर वर्तमान पडेल काळु । चहूं वर्णांचा होईल एकचि मेळु ।
कोणी कोणाचा न धरिती विटाळु । मग गोपाळु निघते झाले । ५ ।

आतां वेळोवेळां सांगों किती । मोडला धर्म झाली प्रवृत्ति ।
विष्णुदास नामा येतो काकुळती । कैसेनि करूं भक्ति पंढरिराया । ६ ।

११११. गृहस्थ बैसला ओसरीवरी । गृहस्वामिणी स्वयंपाक करी ।
तंव मार्गस्थ ब्राह्मण आला द्वारीं । अन्न द्यावें स्वामिया । १ ।
पडली कुऱ्हाड कपाळीं । रागें मूप चाटू आफळीं ।
जळत काष्टातें हातीं कवळी । जैसी आसाळी गर्जतसे । २ ।
ब्राह्मणें घेतलें धरणें । तंव बाईलेसी गेला शरण ।
म्हणे माझ्या ग्रासांतून ग्रास देणें । लज्जा राखणें आजिची । ३ ।
मग म्हणे वो बाईल । कैंचा आलासे बैल ।
तुजसारिखा असेल । बैलासि बैल मोडरे । ४ ।
गृहस्थें धरोनि वेणी । तिनें शेंडीस हात घालोनि ।
अंगजूठ होऊनि । बाईल हृमण्या मारितसे । ५ ।
त्याचे मागें सुटली शेंडी । सवेंचि धरिलासे अंडीं ।
पडिली असे मुर्कुंडी । तोंडिच्या तोंडीं मारीतसे । ६ ।
शेजारीं व्याही होता तो धांवला । येतांचि तोंडावरी मारिला ।
चौकीचा दांत पडिला । केला बोचिरा व्याही तो । ७ ।
आधींच व्याही होते रोडके । आणि हाणितला टाणवईच्या बुडखे ।
निथळत निथळत बोडकें । येऊनि सुडकें पुसितसे । ८ ।
निकडुनि धांवला मेहुणा । तोहि पाडिला उताणा ।
केला तिनें धोळाणा । तया मेहुण्याचा । ९ ।
ब्राह्मणाकडे दांत रगडी । तंव ब्राह्मण हळु हळु पाय काढी ।
ओल्या धोतराची घडी । पळतां वेंगडी वळतसे । १० ।
ऐसा ओलांडिला दारवंटा । तंव धाविन्नली पाठोवाटा ।
सीण घालून हाणिल्या बरोटा । कोठें थोंट्या पळसील । ११ ।

ऐसा कलियुगीं स्त्रियांचा विचार । एक बुडविती बेताळीस नर ।
एक दाविती स्वर्गीचें द्वार । नामा निरंतर विनवीतसे । ११ ।

१२००. पाप्या नावडे संतसंगति । लोभिया नावडे उदारवृत्ति ।
व्यभिचारिणी नावडे पति । नावडे ज्योति उजियेडा । १ ।
चांदणें नावडे तया चोरां । सद्बुद्धि नावडे रांडपोरां ।
सावधान नावडे तया हेरां । सत्य कुचरां नावडे । २ ।
तीर्थ नावडे तया दुष्टां । न्याय नावडे नष्टां ।
कणव नावडे तया पापिष्ठां । अभिमान नष्टां न सांडवे । ३ ।
भक्ति नावडे तया खळां । पुण्य नावडे तया चांडाळां ।
देखत देखत जन आंधळा । कां रे घननीळा विसरलेती । ४ ।
पारखी नावडे खोट्यांला । स्नान नावडे तया विटाळां ।
सुसंग नावडे नाठाळां । न्याय तंट्याला नावडे । ५ ।
धर्म नावडे तया कृपणां । शुद्धि नावडे दुर्जनां ।
कर्म नावडे अब्राह्मणां । ऐसी दुष्ट वासना पापियातें । ६ ।
नाम नावडे तया नष्ट भक्तां । वृत्त नावडे तयां सर्वथा ।
नावडे भजन कैंची कथा । नाहीं पतिव्रता कलियुगीं । ७ ।
ऐसा आला कलीचा प्रवेश । धरा नामाचा विश्वास ।
जीवीं धरा हृषीकेश । विष्णुदास नामा म्हणे । ८ ।

१२०१. जन्मामी येयोनि जाहलों मी चाटा । गेलों होतों हाटा पंढरीये । १ ।
गुंड गे करीं गुंड गे करीं । बैसलों द्वारीं पंढरिये । २ ।
शनिवारीं पुंडलिकापाशीं । चंद्रभागेसी स्नान केलिये । ३ ।
आदित्यवारीं करीं पद्माळें । कळीकाळा न भीयें त्याचेनी बळिये । ४ ।
सोमवारीं वेणुनादींच्या हाटा । जातसे चाटा उभवोनी गुढीये । ५ ।
विष्णुदास नामयानें उभवोनी गुढी । विकलीसे प्रौढि केशीराजये । ६ ।

## ❋ प्रारब्धगती ❋

१२०२. कृष्ण सहाय पांडवासी । ते भोगिती नष्टचर्यासी ।
साह्य केलें हरिहरासी । प्रारब्ध कोणासी टळेना । १ ।
ऐसी प्रारब्धाची ठेव । झाले भिक्षुक पांडव ।
राज्य घोडे भाग्य सर्व । सांडियेला ठाव प्रारब्धें । २ ।
शरीर संचिता आधीन । धर्मराज हिंडे वन ।
कर्में बुडाला रावण । आणि दुर्योधन प्रारब्धें । ३ ।
अभिमानें शिशुपाळ । कृष्ण हस्तें झाला काळ ।
यादव निमाले सकळ । केलें निर्मूळ प्रारब्धें । ४ ।
कर्म रेखा रे टळेना । बाण लागला जगज्जीवना ।
कृष्णें सांडिल्या गोपांगना । हें नारायणा प्रारब्ध । ५ ।
कामबुद्धीचें सुख । अति मानिती ते मूर्ख ।
चंद्रासी लागला कलंक । इंद्रासी दुःख प्रारब्धें । ६ ।
हरिश्चंद्र तारामती । घोर जन्मांतर भोगिती ।
नळराव पुरूषार्थी । तयाच्या विपत्ति प्रारब्धें । ७ ।
पतिव्रता सुशीळ । दमयंती पाळे पोळे ।
ऐसें अनिवार कपाळ । भोगी दुष्काळ प्रारब्धें । ८ ।
ऐसी अनिवार जन्मांतरें । राज्य सांडिलें रघुवीरें ।
सवें मेळवुनि वानरें । फिरवी दिगांतरें प्रारब्धें । ९ ।
फिरत असतां काय झालें । पुढें प्रारब्ध ओढवलें ।
जानकीस राक्षसें नेलें । कष्ट भोगविले प्रारब्धें । १० ।
कर्मा आधीन शरीर । पूर्ण ब्रह्म रामचंद्र ।
रघुपति विष्णुचा अवतार । पाठीं जन्मांतर नामा म्हणे । ११ ।

१२०३. नव जावें तेथें लागे जाणें । न करावें तेंचि लागे करणें ।
न बोलावें त्यासि लागे बोलणें । पडे मागणें नेदी तया । १ ।

कृष्णें देवकीये उदरा येणें । कंसा त्यागोनि गोकुळासि जाणें।
तेथें नंदाच्या गाई राखणें । संगतीं असणें गोवळ्यांच्या । २ ।
राम वान्नरांची सेवा करी। पांडव किंकर विराटा घरीं।
हरिश्चंद्र डोंबाघरीं पायकी करी । हें अपूर्व परियेसा । ३ ।
रुद्रें अंजनी उदरा येणें । रामाची सेवा वान्नरपणें।
प्रसंग पडे तैसें वर्तणें। रुसणें नलगे कवणासी। ४ ।
स्वामीनें सेवकाची सेवा करणें। नुपेक्षी कदन्न भक्षणें ।
म्हणवूनि अहंकार न धरणें। विषम संसार अरे जना। ५ ।
अवचट घडविती तुझिया भावा। घोर विस्मय होतो माझिया जीवा।
विष्णुदास नामा विनवी केशवा। देवा तूं करिसी तें बरवें । ६ ।

१२०४. सगुण समान भजती अंतरीं । सर्व भूतांतरीं असे एक। १ ।
पाहा कोळियांची काय सांगों कीर्ति। विद्या अभ्यासिती मूर्तिपुढें। २ ।
द्रौपदीचे घरीं होते उपवासी । देंठही लाविती अकस्मात। ३ ।
नामा म्हणे मुख्य प्रारब्ध कारण । पांडुरंगाविण गति नाहीं । ४ ।

१२०५. झाला कामावीस बाण लागताचीं । प्रारब्धाची गति चुकवेना । १ ।
चुकतां ते जाण । कर्म रेखा क्रियमाण । २ ।
बाणें पश्चात्ताप अर्जुनाचे मनीं । शस्त्र चक्रपाणि धरी न मी । ३ ।
नामा म्हणे धरूं ऐसे याचे संगा। तारूं पांडुरंगा उभा असे। ४ ।

१२०६. काय सांगों कर्मभोग । लिंगपात शिवाचें। १ ।
याच सुखें ब्रह्मामुख । उभा नख छेदिला । २ ।
सुचिष्मंत पंडुपुत्र । भिक्षा पात्र हिंडती। ३ ।
नामा म्हणे कर्म रेखा। देवांदिकां चुकेना। ४ ।

१२०७. हरिश्चंद्रराजा होता सत्त्वगुणी । वाहातसे पाणी डोंबाघरीं । १ ।
सत्य पतिव्रता तारामती राणी । राहिली भोगोनि कायाक्लेश। २ ।

भरते ऐकतां मातेचें वचन। श्रीराम दर्शन कैसें घडे । ३ ।
माता पिता सर्व अव्हेरी जनक । नामा म्हणे भाक प्रारब्ध हे । ४ ।

रूपकात्मक उपदेश. शेत.

१२०८. संसार शेत सुलभ थोर भूमी वाहिलीं नवही द्वारें ।
पांचही आउतें मेळवुनी तेथें जुंपियेली दोन्ही ढोरें ।
उखीतें करी येति जाती भारि नव्हती कोणिह स्थिरें ।
बुनादि शेत वाहिलें तें काय सांगृ अपार रे । १ ।
संसार शेत करि कारे आल्या देहाचिया लाहे परि ।
भक्ति उंच माळा उभा राहुनि हरिनाम सोंकरि रे । २ ।
हरिश्चंद्र राजा सात्विक भला तेणें वाहो केला ।
सत्त्व नांगर त्रिगुण तिफणी निर्वाण कुळव धरिला ।
भक्ति कुऱ्हीवरी उभा राहुनियां बहुत भाग्य पिकला ।
खळे दाणे तेणें दिधले ब्राह्मण युगायुगीं तरला रे । ३ ।
शिराळ शेटी कुळवाडी मोठा बहु सोसियेल्या वेठी ।
आलिया गेलिया जेववी भक्ता देतो थोर सृष्टी ।
भला भला म्हणोनि जगीं वाखाणिला देव आला त्याचे भेटी ।
मुक्ति शेत तया इनाम दिधला ठाव दिला वैकुंठी । ४ ।
रावणाचें शेत चवदा चाहुर दाटल्या दुर्बुद्धी पेढी ।
गर्व अहंकार दाट खुंट झाडें शेत आलें तेणें पडी ।
कर्मकांड किडा मुळिं जो बैसला बीज गेलें तेणें वोढी ।
बटकर बाण अंगीं जो सेकला तोही झाला देशधडीरे । ५ ।
अत्रधी कुळवाडी कौरवें केली नाटोपेचि दुर्योधन ।
अर्ध वांटेकरी धर्म दुराविला शेतासि नाहीं रक्षण ।
अधर्म टोळीं शेत जें खादलें बिज गेलें चौपट होऊन ।
हरिभक्तिविण फलकट जालें न जोडे कृष्ण निधान रे । ६ ।

पांचहीं पांडवीं नवाट काढिलें वाहिलें अद्वैत वन।
निरंजन वन शेत जें पिकलें आपण कृष्ण रक्षण।
द्रौपदी सुंदरी डाह्मोरा जो केला दुर्वासा दिधलें भोजन।
अनंत खंडी सांजे जें पिकली जोडलें कृष्ण निधान रे। ७ ।
ज्ञानदेव चांगदेव वटेश्वर निवृत्ति मुक्ताई सोपानदास।
परसाभागवत सांवता माळया रसाळ चोखा दास।
जनमित्र नागा गोरा खास कूर्मदास।
इतुके शेतकरी त्यांचा वाटे करी नामा विष्णुदास रे। ८ ।

१२०९. वाहो क्षेत्र केलें जुंपिलीं आउतें। अठरा धान्यें तेथें पेरियेलीं। १ ।
मेघःशाम मेघ वर्षे सर्वां धारीं। वीज विटेवरी सासिन्नलें। २ ।
जगाचें जीवन पंढरी पिकली। चराया सोकलीं भुतें जाणा। ३ ।
घालूनियां माळा रक्षी कळिकाळा। काय कलिमळा संसाराची। ४ ।
पापा सोंकरणें भक्ति हे गोफण। भूस सांडी कण वेंचिताती। ५ ।
वेदशास्त्र ऐसे बोल बोलविता। गूढ वेगळितां लाभ होती। ६ ।
नामा म्हणे स्वामी विट्ठल सुकाळ। अन्न ब्रह्म फळ त्रिभुवनीं। ७ ।

१२१०. तुझ्या माझ्या शेता नाहीं पेंडवळा। दावियेला डोळां पांडुरंगा। १ ।
कल्पनेची पेंडी पाप कुंदा काढी। काशा देशधडी लावियेल्या। २ ।
त्रिगुण तिफणी धरोनी सूत्रधारी। वेद बैल चारी जुंपियेलें। ३ ।
अनाथाचें शेत प्रेमाचा ओलावा। शेत राखे देवा पांडुरंगा। ४ ।
ब्रह्मनामबीज बांधोनियां ओटी। पेरी दाटोदाटी नामदेव। ५ ।

१२११. चालती कुळवाडी नटके। उपकें घेतलीसें नाकें।
चार वर्षे पिकलें निकें। त्यांचे कण सांचले। १ ।
पुढें एक निपाणिक पडिलें। त्या कणाचें द्रव्य सांचलें।
कृपणाचें घर भरिलें। वंचक झाला भक्तांसी। २ ।

स्त्रियांबाळां खाऊं नेदी। धर्म न करीच त्रिशुद्धी।
डोईस बांधलीसे चिंधी। खांदीं रकटें ठिगळांचें। ३।
त्या द्रव्याचें करी कळांतर लेखा। सजगाणीस देई रूका।
रूक्यास घेई पैका। आठा दिवसांच्या बोला। ४।
सवाई दिडि दुणी। अकर्तांच घरीं आणी।
तो न भजे चक्रपाणी। पाप दुणीं होतसे। ५।
तंव एक अतीत घरासी आला। बाईलीनें त्यासी स्वैंपाक केला।
तंव आपण उठून जागला। झाडकरी आला द्वारासी। ६।
कोणें दाखविलें माझें घर। त्यावरी घेईन जहर।
कोठें गेला सुना मोगर। अरगळा कोणें काढिली। ७।
ऐसा तो ब्राह्मण चडफडत गेला। आपण परतोन माघारा आला।
धांवोनि घाव हाणितला। डोई फोडिली बायलेची। ८।
कैसी केली वोहरी। बोज नाहीं तुझे घरीं।
नागविलें इया पोरीं। तीनवेळां खातातीं। ९।
ऐसी गजबज ऐकोन। शेजारी आला धांवोन।
त्यासी हातीं धरोन। गृहाभितरीं हिंडविला। १०।
त्यासी बैसावया दिला पिढा। तों स्वैंपाक आणोनि पुढां।
पहा हो बायलेचा धाडस केवढा। ऐका तुम्ही दादोजी। ११।
ऐसीं पूर्ण अकरा वर्षे भरलीं। बारा वर्षांची साउली पडली।
या रीतीनें गुजराण झाली। तंव अग्नि लागला गृहासी। १२।
शेतांतून कुळवाडें केली चोरी। पाणी निघालें पेत्रा भीतरीं।
सुनेनें घालून घेतलें विहिरीं। ऐसेपरी नागवलों। १३।
ऐसे जे नर असती। ते जन्मांजन्मीं नागवती।
यांची न चुके यातायाती। विष्णुदास म्हणे नामा। १४।

१२१२. करीन म्हणसी व्यापार। नाम चोखट करी अक्षर। १।
देवा तुझा मी व्यापारी। मेवा करीन नाना परी। २।
धर्म खर्डा केला जमा। खर्च घातला पूर्वकर्मा। ३।
दोन्ही रोजनामे महिन्याचे। एकादशी द्वादशी पोत्याचे। ४।
सेवेची घडली शिल्लक बाकी। भरत हुजुरात नेटकी। ५।
नामयानें मोह जवाब दिला। तो वैकुंठीं सरता केला। ६।

१२१३. आम्ही देह केलें दुकान। तेथें सांठविलें ब्रह्मज्ञान। १।
एके खेपें लाभ पैं झाला। आम्हा पंढरिनाथ भेटला। २।
पुण्य सत्वाची केली तागडी। ब्रह्म तुकून बांधली पुडी। ३।
तुझा दास मी वाणिया भला। नामा केशवचरणीं विनटला। ४।

१२१४. कष्टाचें कुश्चळ झालें तुझे पोटीं। स्मरावा जगजेठी कृपाळु तो। १।
नाम औषध घ्यावें नाम औषध घ्यावें। संतांचे लागावें समागमीं। २।
त्यापाशीं औषध आहे नानाविध। रामकृष्ण गोविंद म्हणती वाचे। ३।
पुत्रस्नेहें कैसा अजामेळ स्मरला। तेणें तो उद्धरला क्षणमात्रें। ४।
राम राम म्हणतां तारिली कुंटिणी। वैकुंठभुवनीं तये वासु। ५।
तेंचि हें औषध प्रल्हादें घेतलें। तें तूं घे उगलें म्हणे नामा। ६।

१२१५. आम्ही परीट चोखट। शुद्ध केलें खटनट। १।
बोध साबण लाऊनी ठायीं। डाग उडविला पाहीं। २।
शांति शिळेवरी धुतलें। ज्ञानगंगे निर्मळ झालें। ३।
परब्रह्म होउनि ठेलों। नामा म्हणे सुखरूप झालों। ४।

१२१६. बांधिलें राहीना वैरलें खाईना। दवडिलें जाईना जाणते हो। १।
तया खुंटा ना दावे सौरसें बांधावें। कशानें करावें वोढाळें हो। २।
तया नेत्र ना पाय तिन्ही एक पाहे। न देखावें ते ठाय देखताहे। ३।
नामा म्हणे श्रोती विचारावें ज्ञानीं। केशवाचे नयनीं उतरला। ४।

## घोंगडें

१२१७. पाटोळ्या तिमल्ला रे। मजवरी घाली कांबळें । ध्रु० ।
आषाढमासिचा रे कैसा शीतळ वारा। वर्षतो मेहुला रे कैसा शीतळ धारा। १ ।
झिरमिर झिरमिर रे कैसा वर्षतो मेघू । जाळीचें घोंगडें या मजवर घाली सेवू । २ ।
प्रेमाचें भरतें गा कैसा महापूर आला । नामया विष्णुदास केशवराजीं मिनला। ३ ।

१२१८. घोंगडें हें नवें धडूत पैं माझें। पांवुरतां ओझें होत असे । १ ।
घे आपुलें घोंगडें देईं माझा पांवा । अझुनि का केशवा चाळविसी। २ ।
विष्णुदास नामा केशवा विनवी। ऐहिक्य परत्र नाहीं चाड मज। ३ ।

१२१९. चौऱ्याशीं लक्ष जन्म हिंडतां। घोंगडें अनंता जर्जर झालें । १ ।
जेथें जाय तेथें तुटचि हे पडे । मुद्दल न घडे काय करूं। २ ।
संचित आटलें व्यवसाय खुंटले। म्हणोनि टाकिलें द्वार तुझें । ३ ।
नामा म्हणे विठोबा जरी होसी जाणता। तरी ह्या बोला उचिता प्रेम देईं। ४ ।

१२२०. औट हात घोंगडें दिधलें हरी। पांघरलों नाहीं घणीवरी । १ ।
माझें घोंगडें कृष्णा गा जतन करीं। नागविलें थोरीं पांचाजणीं । २ ।
ाठी तीनशें दसांडी। पदरीं औट कोंडी रोमावळी। ३ ।
ब्रहात्तर गांठी सोळा फुंदणी । घोंगडीं दाटणी होत असे । ४ ।
त्रेगुणी दोरिया जाणा। घोंगडें पांघरवी पंढरीराणा। ५ ।
याचें घोंगडें त्यासी दिधलें । उघडें नामें भक्ती पांघरविलें। ६ ।

## कूट अभंग

२२१. एका ब्राह्मणाचें घरीं खाण पडिलें। सातां चोरीं एक मुसळ नेलें।
ापुडें ब्राह्मण नागविलें। धाऊनि आलें वोसगांवींचें। १ ।
सिगांवींचा हनुमंत खोटा। त्याचा बाप जुनाट चोरटा।
ारूनि नेतो दाहीवाटा। जन चोहटा नागविलें। २ ।
ागविला चोहाटीचा वाणी। आणिक नेली प्रभुची गोणी।
ळी आली लांडगा घेउनी। गाढव बंदीखानीं बोंबलत। ३ ।

एका संन्याशानें कुतरें खादलें। गांवच्या खाटका प्रायश्चित्त दिलें।
बापुडे कुंभार नागविले। डांचकें फोडिलें म्हातारीचें। ४।
ऐशा सिद्धांतीच्या खुणा। एक जाणे पंढरीराणा।
विष्णुदास नामा करी विज्ञापना। संत प्रेमळ जाणती। ५।

१२२२. मुंगी उमगा ते मुंगी उमगा। मुंगीचे मुखीं त्रिवेणी गंगा। १।
उदकाचें टवळें मसीची माती। अंधारीं मुंगीनें तेथें लाविली ज्योती। २।
अवघें आकाश मुंगीये मागें। मुंगीचे संसार सांडिला मागें। ३।
विष्णुदास नामा मुंगीये मागें। मुंगी उमगली खेचरसंगें। ४।

१२२३. मुंगीनें आकाश कवळीलें बाहीं। तेथें एक नवल वर्तलें पाहीं। १।
मुंगी उमगा मुंगी उमगा। मुंगीचे माथां त्रिवेणी गंगा। २।
मुंगीचे गळां तुळसीचा लोढणा। विष्णुदास नामा बोलिला खुणा। ३।

१२२४. समुद्राचें पाणी मुंगी मुखांतूनी। काढाया लागोनि श्रम थोडे। १।
केशवाची भक्ति कठीण त्याहूनि। वांयां दंभपणीं नोहे नोहे। २।
आकाश अंगुळें माप सुयेमान। भूमीचें वजन पालडेंनि। ३।
नामा म्हणे वारा वळूं ये कदापि। केशवाचे रूपीं नव्हे बुद्धि। ४।

१२२५. मुंगी व्याली शिंगी झाली तिचें दूध किती।
सतरा रांजण भरून गेले पेले बारा हत्ती। १।
आम्ही लटिकें न बोलूं वर्तमान खोटें। ध्रु०।
लटिकें गेलें कटकें तेथें गाडग्या एवढें राळें।
उडत चिमणी चरत चाले तिचे वाटीयेवढे डोळे। २।
शेळी करी घुसळण तेथें मांजर काढी लोणी।
उंदीर गेले देशांतरा ताकें भरल्या गोणी। ३।
पाण्यांत कासव गीत गाय वनांत कोल्हा नाचे।
मावज मनीं संतोषला खोकड पुस्तक वाचे। ४।

कांतणी घरीं लग्न लागलें मरडा कर्णीक कांडी ।
बागुल वंध्या कण्या परणी घुबड मांडे रांधी । ५ ।
बाभुळीचे खोडीं माशानें केलें कोटें ।
सशानें सिंह ग्रासिला बेडुक आले लोटें । ६ ।
विष्णुदास नामा म्हणे ऐका त्यांची ख्याती ।
लटिकें म्हणतील त्यांचे पूर्वज नरका जाती । ७ ।

१२२६. आंधळ्यानें स्वरूप देखियलें नयनीं । मुकें बहिऱ्या कानीं गोष्टी सांगे । १ ।
कांसवीचें दूध दुहितां भरणा । दुही त्याला जाणा हात नाहीं । २ ।
वारियाच्या लोथा बांधोनियां माथां । वांझेचिया सुता बळिवंता । ३ ।
मुंगीनें त्रैलोक्य धरियेलें तोंडी । नामा म्हणे पिंडीं प्रचीत आहे । ४ ।

१२२७. हाटकर कुणबी वाट मोडी । रिकामा ब्राह्मण करितो चहाडी । १ ।
गुळेंविण शिंपी बोटें चाटी । प्रेमेंविण तेली क्षेम दे लाटी । २ ।
जिताचि कोष्टी घातला खाचे । प्रेमेंविण कुंभार नाचे । ३ ।
लोहार हिंवाविण तापे । सोनारा लागले धापे । ४ ।
नामा म्हणे यातिचे चाळे । दुखणेंविण परीट विव्हळे । ५ ।

१२२८. अकरा लोचन त्याचे पांच मुख । आठ कान देख पुच्छ दोन । १ ।
अरत अखंड निरत प्रचंड । उमाळ उदंड उभा फार । २ ।
दहा पाय चहूं चालत ते जाय । नव्हेत गे माय सावज त्या । ३ ।
नामा म्हणे त्याचा अर्थ करीं चोख । पूर्वज पातक लया जाय । ४ ।

१२२९. बारा हात लुगडें एकचि नारी । पालऊं घातला खांदियावरी । १ ।
जाईन त्या गोकुळा पाहीन त्या गोपाळा । तयालागीं उतावेळ मन माझें । २ ।
एका हातीं घातला तांबियाचा वाळा । हाळदुळी बांदुनी सुदलें मी डोळां । ३ ।
एकली जातां नोळखे मातें । विष्णुदास नाम्यास नेईन सांगातें । ४ ।

१२३०. राईयेवढें पांखरूं त्रिभुवनीं त्याचा फेरारे ।
नर आणि नारी तया पांखराचा चारारे ।
पिंडामध्यें आहे त्याचा शोध तुम्ही करारे ।
मेरूच्या शिखरीं त्या पांखराचा थारारे । १ ।
येऊनि संसारा याचा अनुभव तुम्ही करारे ।
चौऱ्यांशीं लक्ष योनी चुकेल जन्माचा फेरारे । ध्रु० ।
अठ्ठावीस योजने तया पांखराचा फेरारे ।
बत्तिसा मुखांनीं तें बा घेतसे चारारे ।
अहं सभेमध्यें याचा शोध तुम्ही करारे ।
अकराही लोचन तया चोंची असती फारारे । २ ।
एकवीस स्वर्गांहुनी तया पांखराची उंचीरे ।
सप्तही पाताळाखालीं तया पांखराची नीचीरे ।
नेत्रांतील बाहुली तया पांखराची निचीरे ।
उडालें पांखरूं सप्तही सागर घेऊन चोंचीरे । ३ ।
ऐसें तें पांखरूं दादा आहे सृष्टीवरीरे ।
मेरू आणि मांदार तया पांखराचे उदरीरे ।
शिवाचें आसन दादा कवणिये परीरे ।
पिंडीं आणि ब्रह्मांडीं म्हणती दशवे द्वारीरे । ४ ।
ऐसें तें पांखरूं गोरक्षरायें वळखिलेरे ।
पिंडीं आणि ब्रह्मांडीं मछिंद्रनाथें देखियेलेरे ।
त्याचियेनीं अंगसंगें सद्गुरूनाथें दाखविलेरे ।
त्याचियाचि प्रसादें नामा शिंप्यानें गाईलेरे । ५ ।

१२३१. प्रळयाचे काळीं ब्रह्मांड जळालें । कोण त्यांत उरलें सांगा मज । १ ।
प्रभा ते फांकली जाली ते गुंतली । सांग मज खोली स्वरूपाची । २ ।
ब्रह्मांडाची जेव्हां राख जळून झाली । कोणी ती लाविली अरूपरूपीं । ३ ।
विष्णुदास म्हणे सांगा हेंचि गूढ । नाहीं तरी मूढ होऊनि राहें । ४ ।

१२३२. मेलें जिव्हासी सांगे गोष्टी। आंधळें ओंवी सुवर्णाच्या गांठी।
पांगुळ लागे पवनाच्या पाठीं। बाळका पोटीं माय वाढे। १।
थोट्यानें धवळार रचियेलें। मुकें पुराण सांगूं बैसलें।
सर्वेचि बहिरें ऐको ठेलें। वेडें हांसलें शहाणियासी। २।
आणिक एक नवल सांगूं काई। जीत वाघ शलभानें भक्षिला पाहीं।
मुंगीनें पर्वत उचलिला बाहीं। माशी करी साही सूर्यासी पैं। ३।
मृदंगें वाहिला गुरव राणा। वांझेच्या स्तनीं मंचरला पान्हा।
माथां फुलें खोऊं नाचे दवणा। जाण सुजाणा न कळेची। ४।
मुरकुटें सगळा सागर शोषिला। माशानें पारधी मारिला।
सशानें सिंह भोवंडिला। वेदांपुराणां न कळेची। ५।
हें तुम्ही म्हणाल उमानें। हें तंव उफराटें दृष्टी पहाणें।
विष्णुदास नामा म्हणे। अनुभवी या खुणा जाणती। ६।

१२३३. नीर समुद्र तो कोण। कोठें क्षिराब्धि आसन। १।
दधि समुद्र कोण्याठायीं। खारा समुद्र कोण्या गृहीं। २।
रत्न समुद्र तो कोण। कोठें मदनाचें आसन। ३।
मन समुद्र कोठें आहे। नामा म्हणे शोधून पाहे। ४।

१२३४. नेत्र नीर समुद्र देखा। क्षीर सत्रावी ओळखा। १।
दधिसमुद्र नाकीं आहे। खारा शरीरीं तो पाहें। २।
नाभीं रत्नाकर देखा। माथां मदन ओळखा। ३।
नामा म्हणे सांगूं काय। मन समुद्र हृदयीं आहे। ४।

१२३५. राधा वर्णीच्या पुत्रास धन बहुत झालें। तो म्हणे आतां धर्म करीन।
बापाचिया श्राद्धा आवंतिले ब्राह्मण। एक जेवण सुदामाचें। १।
कैसी नागवण आली रे बापा। त्यांचा परतें पाप आणिक नाहीं। ध्रु०।

महाजनां ब्राह्मणां सवा सवा शेराचा भात । कढींत हिंग जिरें मिरें बहुत ।
त्यावरी घातलें मुगाचें वरण । येत्रोका मरण जेवित्यांसी। २ ।
महाजणां ब्राह्मणां घातले सहा वडे । घालितां रडे उकसाबुकसीं ।
त्यावरी घातलें तूप लोणकडें । जावो कां मढें या जेवित्यांचें। ३ ।
सगळ्या गव्हाची रांधिली क्षीरी। ही एक महामारी आली देखा।
त्यावरी घातला साखर गुळ । उठोका पोटशूळ जेवित्यांसी। ४ ।
जेवण झालें दहीं भात आला । तंव आत्मा लागला ब्रह्मांडासी ।
बहुतेक दिवसासी अंतर पडिला। समुळीं नागविला म्हणे नामा। ५ ।

१२३६. उठ लाल लेंकुरा त्वांड वाणी म्हंड अंडें । लटिके न बोलो वर्तमान गाढे । १ ।
शेळी व्याली व्याघ्र जन्मला मांजरासी तीन डोळे ।
कोहळ्याएवढे मोती आम्ही डोळां देखियेले । २ ।
बाभुळीचें खोडी। माशाने केले कोंटे।
सशाने सिंह ग्रासीला बेडूक आले लोटे । ३ ।
आम्ही आलो वरल्या देशा तेथें गाडग्याएवढे राळे।
उडत मुंगी देखिली तिचे वाटीएवढे डोळे । ४ ।
विष्णुदास नामयानें गाइली ही जती । लटिकें म्हणेल त्याच्या पूर्वजांसी अधोगती । ५ ।

१२३७. त्रिभुवनाचो परी मांडिली शरीरीं । गोकुळाभीतरीं उभारिलें । १ ।
शेषाचीये दृष्टी मूळ भूमिका चोखटी। तेथुनी मूळ सृष्टी आरंभिली। २ ।
मन विंदानीं आणि कुंडलणी चतुर्दळांपासुनी ।
पवनवेगीं टाकुनी पति समचा स्वाधिष्ठानी। ३ ।
मणीपूर पर्यंत तळवट शोभिवंत । तेथुनी टाकितसे नीट कर्मभूमीं। ४ ।
बारा सोळा नारी श्रीपति मुरारी । हृदय मंदिरीं गोपीराजु। ५ ।
कनक घाटेवरी सत्रावी सुंदरी । चाले उन्मत्त भारी चंद्रकळा। ६ ।
तेथें रोवियला दारवंटा दावी त्याच्या वाटा । जावया वैकुंठा गौळियांसी। ७ ।
मृत्युलोकींचिया सैंवरा आल्या ज्या चौवाट । देखिल्या त्या घरां चौघीजणी। ८ ।

त्या चिपोळीया वाहती मिळोनियां येती। चालती मागुती पश्चिमपंथीं। ९।
अनुहतावरी वाट करूनी नीट। विशुद्ध नगरा येती धीट। १०।
तेथुनी वाट असे नीट दारवंटा। तेथूनि जावें ब्रह्मरंध्र कपाटां। ११।
हेंचि परब्रह्मराऊळ तेथुनी। जाऊं नये पुढारीं सांडुनी राया। १२।
तेथें रविशशीवरी आणि ब्रह्मरश्मी स्वरूप। एकांत ओवरी आहे अमूप। १३।
विष्णुदास नामा सांगे निर्वाणींच्या खुणा। अनुभवी तोचि जाणे येरा चोजवणा। १४।

## खेळिया

१२३८. नव्हे तेंचि कैसें झालें रे खेळिया। नाहीं तेंचि दिसूं लागलें रे।
अरूप होतें तें रूपासि आलें। जीव शिव नाम पावलें रे।
आपलिच आवडी धरून खेळिया। आपआपणातें व्यालें रे।
जोपनाकारणें केली एक बायको। तिने येवढें वाढविलें रे। १।
एक खेळिया तुज सांगितलें ऐसें जाणुनि खेळ खेळे रे। ध्रु०।
ब्राह्मणाचें पोर एक खेळासि भ्यालें। तें बारा वर्षे लपालें रे।
कांपत कांपत बाहेर आलें। तें नागवेंचि पळून गेलें रे।
साहा तोंडाचे शंभूचें बाळ एक। बहुतचि बळ आथियेलें रे।
खेळ खेळतां दगदगी व्यालें। तें कपाट फोडुनि गेलें रे। २।
चहूं तोंड्याचा पोर एक नारयाहि जाण। तो खेळिया माजी आगळा रे।
कुचाळी करूनी पोरें भांडवी। आपण राहे वेगळा रे।
गंगा गौरी दोघी भांडवी। संभ्यासी धाडिलें राना रे।
खेळ खेळे परि डावीं न सांपडे। तो एक खेळिया शाहाणा रे। ३।
खेळिया माजी हनुम्या शहाणा न पडे कामव्यसनीं रे।
कामचि नाहीं तेथें क्रोधचि कैंचा तेथें कैचें भांडण रे।
नामा गड्याची आवडी मोठी। म्हणूनि लंके पेणे रे। ४।
यादवांचा पोर एक गोप्या भला। तो बहुतचि खेळ खेळला रे।
लहान थोर अवघे मारिलीं। खेळचि मोडूनि गेला रे।
ऐसे खेळिये कोट्यानकोटी गणित नाहीं त्याला रे।
विष्णुदास नामा म्हणे वडील हो पहा देहीं शोधुनी रे। ५।

१२३९. संसार वन घनदाट। कैं होईल शेवट जातीयाचा। १ ।
जीव हेंचि जातें कर्म हाचि खुंटा। वोढिती बरवंटा चौघीजणी। २ ।
जातां वैरू वैरणें जंव आहे लहाणें। जातां जाईजणें जाईल जाणा। ३ ।
एकोत्तरशें कौरव वैरिले वैरणा। पांचा पांडवा जाणा तेंचि झालें। ४ ।
नळनीळ मांधाता वैरियले जातां। निमिष न लागतां पीठ झालें। ५ ।
संसाराचा वोढा वोढितां न वोढे। बैस पैलकडे लावीं हात। ६ ।
नामा म्हणे विठोबा दिनाचें माहेर। सदा पंढरपूर गाऊं गीतीं। ७ ।

१२४०. स्त्री गरवार पति उदरीं। पतिव्रतापण माजे तिये नारी। १ ।
अबला खेळवी मोहें। कडीये घेवो देतसे पाहे। २ ।
समस्तीं मिळोनी पाळणा घातला। विष्णुदास नामयानें अनुभव गाइला। ३ ।

१२४१. रावणा मारून माझे माये गे। बिभीषण लंकेस स्थापिलास काय गे।
अयोध्येसी आलीस काय गे। माझे हृदयमंदिरीं राहें गे।
विठ्ठल माये गे। १ ।
रूसुनी आली रखुमाबाई गे। तिच्या मागें तूं धांवलीस काय गे।
संगें घेऊनियां गोपाळ गाय गे। मम हृदयमंदिरीं राहे गे। २ ।
सत्यें राधिकेचे पायीं गे। सोडुनी द्वारकेचा ठाव गे।
आलीस काय गे। माझे हृदयमंदिरीं राहे गे। ३ ।
धन्य पुंडलीक भक्त माय गे। त्यानें विटेवर उभा केला काय गे।
नामा म्हणे माझे माय गे। माझे हृदय-मंदिरी राहे गे। ४ ।

१२४२. योगी ब्रह्मचारी सिद्ध ब्रह्मज्ञानी। ते तों तुज कोणी न येती कामा। १ ।
कोंडुनि इंद्रियें बैसती समाधि। हळुच तुझ्या पदीं झेंपावती। २ ।
एवढें विश्वरूप नाहीं ऐसें केलें। सकळ होउनी ठेलें आपणचि। ३ ।
ऐसियाचा विश्वास न धरिसी देवा। नामा तुज केशवा विनवीतसे। ४ ।

## ॐ खलदुर्जनांस उपदेश ॐ

१२४३. दुर्जनाची बुद्धि वोखटी दारुण। आपण मरून दुजा मारी। १ ।
माशी जातां पोटीं मेली तेचि क्षणीं। प्राण्या वोकवूनि कष्टी करी। २ ।
दीपकाची ज्योति पतंग नासला। अंधार पडिला जनामध्यें। ३ ।
तैसा नैसर्गिक स्वभाव दुष्टांचा। शेखीं ज्याचा त्यासी फळा येतो। ४ ।
झाली सज्जनाची संगति कदापि। जाईना तथापि त्याची क्रिया। ५ ।
सहज मळलें धुतां शुद्ध होय। विबयाचा काय डाग जातो। ६ ।
वज्रहि फुटेल नभहि तुटेल। भला तो होईल ऐसा नव्हे। ७ ।
नामा म्हणे कुंभपाकींचा तो धनी। तयासी भल्यांनीं बोलूं नये। ८ ।

१२४४. दुष्ट तो दुर्जन दुरीच धरावा। संग न करावा पापियाचा। १ ।
सर्पाचें पिलें मानें म्हणऊनि पोशिलें। त्यासी पान दिधलें अमृताचें। २ ।
नव्हे तें निर्विष न संडी स्वभावगुण। घेऊं पाहे प्राण पोसित्याचे। ३ ।
विष्णुदास नामा सांगतसे युक्ति। विवेक हा चित्तीं दृढ धरा। ४ ।

१२४५. समर्थासी करी क्रोध हे अहंता। अखंड ममता मानी सदा। १ ।
आपुली आपण व्यर्थ सांगे स्तुति। वडिलांची कीर्ति भोग सांगे। २ ।
वमन झालीया संचितसे अन्न। काय तो दुर्जन भाग्यहीन। ३ ।
नामा म्हणे जाण असतां शरीरीं। जातो यमपुरीं भोगावया। ४ ।

१२४६. कोळसासी दूध मर्दोनियां धूतां। न पावे शुद्धता कोणे काळीं। १ ।
दुर्जनासी तैसा बोधिता परमार्थ। नवजायचि स्वार्थ जाण त्याचा। २ ।
सूकराचे परी नेणती मिष्टान्न। विष्टा ते भक्षण करीताती। ३ ।
मोहियले प्राणी सर्वत्र असता। काय सांगूं आतां नवलावो। ४ ।
नामा म्हणे तया न होयचि मोक्ष। येवोनि पद्माक्ष केविं भेटे। ५ ।

१२४७. वेडिया उच्चार गाढवा गुऱ्हाळ। म्हैसिया विन्हाड पुष्पवनीं। १ ।
मद्यासनीं केंवि कुंजर हो बैसे। कोडिया न दिसे चंदन बरवा। २ ।

नैसा नव्हे देव मूर्ख जनांच्या भक्ति । भल्याचा विरक्ति ज्ञानद्वारा । ३ ।
शेळीस ऊंस कळकटीया सुदिवस । सूकराप्रति रस आंबियाचा । ४ ।
दर्दुरा क्षीरपान त्रिदोषिया मौन । मद्यपिया मन स्थिर नव्हे । ५ ।
नामा म्हणे हरि सबाह्य भरला । भरोनि उरला दाही दिशा । ६ ।

१२४८. थिल्लर तें नेणे सागराचा अंत । मुंगीस अग्नींत रीघ नाहीं । १ ।
श्वान काय जाणे मेरुचें प्रमाण । कोसळल्या गगन न कळे त्यास । २ ।
अंध काय जाणे कैसा उगवे दिन । पाषाण पर्जन्य नकळे जेंवी । ३ ।
देहवंत जीव काय जाणे देव । नामा म्हणे भाव काय तेथें । ४ ।

१२४९. जाळें टाकिलें सागरीं । उदक नयेची चुळभरी । १ ।
तैसें पापियाचें मन । ज्या नावडे हरिकीर्तन । २ ।
सावजीं केला कोल्हा राव । तो न संडी आपुला भाव । ३ ।
गाढव गंगेसि न्हाणीले । पुढती लोळूं ते लागले । ४ ।
श्वान बैसविलें पालखीं । वरती मान करूनि भुंकी । ५ ।
नगर नावडे विखारा । दर्पण नावडे नकट्या नरा । ६ ।
पति नावडे शिंदळी । जाय परपुरूषाजवळी । ७ ।
नामा म्हणे बा श्रीहरि । कोड्या नावडे कस्तुरी । ८ ।

१२५०. जयाचें उदरीं जन्मला जो नर । पिडी तया थोर सर्वकाळ । १ ।
मानिली अंतरीं सखी जीवलग । आत्महत्या मग घात करी । २ ।
मानीना तो भक्ति भ्रष्ट आचरण । दोषी नारायण सदोदित । ३ ।
नामा म्हणे ऐसे पातकी चांडाळ । बुडविलें कुळ बेचाळिस । ४ ।

१२५१. अभक्ताचे स्थळीं भ्रांताची संगती । परदारा चित्तीं परनिंदा । १ ।
नेणे भूतदया शांतीचें लक्षण । कार्या कारण बोलतसे । २ ।
हरिचिया दासा करिती मत्सर । करी निरंतर द्वेषबुद्धि । ३ ।
नामा म्हणे व्यर्थ पेटला पर्वत । नेणे अपघात स्वयें पावे । ४ ।

१२५२. विषयासंगें रात्रीं जागे। हरिकीर्तनीं झोंप लागे। १।
काय करूं या मनासी। नाठवेचि हृषिकेशी। २।
दिवसा व्यापार चावटी। रात्रीं कुटुंबचिंता मोठी। ३।
नामा म्हणे कां आलासी। भूमिभार जन्मलासी। ४।

१२५३. मूर्ख बैसले कीर्तनीं। न कळे अर्थांची करणी। १।
घुबड पाहे भलतीकडे। नाडके नामाचे पवाडे। २।
पाहूं इच्छी परनारी। चित्त पादरक्षावरी। ३।
नामा म्हणे सांगूं किती। मूढ सांगितलें नाइकती। ४।

१२५४. कथे बैसोनि उठोनी जाती। खर होऊनि फिरती। १।
नाम नावडे नावडे। संग वैष्णवांचा न घडे। २।
नामा म्हणे सांगों किती। पूर्वजांसहित नरका जाती। ३।

१२५५. राजसी तामसी जें गाणें। तोडी ताल मोडी मान। १।
ख्याल गाये कंपस्वर। रिझवी दात्याचें अंतर। २।
हे तों प्रीति धनावरी। अर्था अनर्थ तो करी। ३।
नामा म्हणे हा शास्त्रार्थ। अर्थ तोचि होय स्वार्थ। ४।

१२५६. हरिकथा ऐकतां अन्य पैं गोष्टी। निधान त्यां दृष्टी अंतरलें। १।
घडी घडी प्रेम अंतरूं न द्यावें। सावधान व्हावें रामनामीं। २।
यापरी स्वहितीं ठेवियलें लक्ष। ते पावती मोक्ष म्हणे नामा। ३।

१२५७. पोटामाटीं जरी करी हरीकथा। जन रंजविता फिरतसे। १।
तेणें घात केला एक्कोत्तरशत कुळांचा। पाहुणा यमाचा श्रेष्ठ थोर। २।
द्रव्याचिये आशें हरिकथा करी। तया यमपुरीं नित्य वास। ३।
नामा म्हणे ऐसे होत जे रे कोणी। ते नर नयनीं पाहूं नये। ४।

१२५८. शिकलाते गाणें राग आळवण । लोकां रंजवण करावया । १ ।
भक्ताचें तें गाणें बोबडिया बोलीं । तें ही विठ्ठलीं अर्पियलीं । २ ।
बोबडिया बोलीं जे कोणी हांसती । ते पचिजेती रौरवीं । ३ ।
नामा म्हणे बहु बोलों आतां काई । विठोबाचे पाय अंतरती । ४ ।

१२५९. अहंकारें अथिलें ऐसें जें शरीर । तें जाणा मंदिर चांडाळाचें । १ ।
आपुलिया मुखें सांगे पंढरीनाथ । नव्हेहो तो भक्त सत्य जाणा । २ ।
नाम विटंबिती संतांसि हांसती । ते मूर्ख म्हणिजेती सर्पपिलीं । ३ ।
तयांसि लक्ष्मीवल्लभ सांगे उपदेश । नामा विष्णुदास विनवीतसे । ४ ।

१२६०. हरिभक्ति अथिलें ऐसें ते उत्तम । येर ते अधम अधमांहुनी । १ ।
हरिभक्त सप्रेम तेंचि तैसें नाम । येर ते अधम अनामिक । २ ।
नामा म्हणे जया नाहीं हरिसेवा । ते जितची केशवा प्रेत जाण । ३ ।

१२६१. आंडाळते मुणें बैसे विहिरणी । तेथें काय गुणी प्रगटेल । १ ।
देव खादलें ते काय करी जाणा । सर्व अवगुण तयापासीं । २ ।
अवघीं संतति कावळे पोशिले । जावोनि बैसले विष्टेवरी । ३ ।
भुजंगाचे मुखीं अमृत घातलें । फिरोनि पाहिलें विषमय । ४ ।
नामा म्हणे ऐसे अभक्त निर्लज्ज । त्यांसि केशिराज उपेक्षील । ५ ।

१२६२. आपुली करणी न विचारी मनीं । व्यांयां काय ठेवूनि बोल देवा । १ ।
खाटकी जो चेपी पशूची नरडी । अवचिता करंगळी सांपडली । २ ।
मेलों मेलों म्हणूनि गडबडां लोळे । परि कापी गळे आठवीना । ३ ।
आपुलें म्हणवूनि विव्हळतसे । खदाखदां हांसे दुसऱ्यासी । ४ ।
वाटपाड्याचे घर खाणोंनि घेतलें । जितुकें मेळविलें तितुकें नेलें । ५ ।
आपुलें नेलें म्हणऊनि खळखळां रडे । परि घेतां दरवडे आठवीना । ६ ।
सोनाराचे घरीं पडिलेसे खाण । चोरिलें सुवर्ण तेंहि नेलें । ७ ।
आपुलें नेलें म्हणऊनि मोकलितो धाया । ठकविल्या आयाबाया तें आठवीना । ८ ।

तराळाचे घरीं आला असे जेव्हां । म्हणतसे देवा काय करूं । ९ ।
दुसऱ्यासी मागतां परम सुख वाटे । आपण देतां फुटे काळीज तें । १० ।
जन्मवरी पोशिलें लेंकुराचे परि। हातीं घेऊनि सुरी उभा राहे । ११ ।
गर्दन सुळीं देतां म्हणे काय केलें । पुढिल्यासि मारिलें आठवीना । १२ ।
नामा म्हणे विष्णुदास ऐसे जे निर्लज्ज । त्यांसी पंढरीराज कैंचि भेटे । १३ ।

१२६३. घाटिकाप्रमाणें कासी व्यापार । मनीं निरंतर धरोनियां । १ ।
दुष्ट दुराचारी दुर्बळ घातकी । परम पातकी दुष्ट बुद्धि । २ ।
अपमानीं आशा धन मेळविसी । अंतीं नरकासि जासी जाण सत्य। ३ ।
नामा म्हणे जाण करूं मोटाळें। जाऊनियां लोळें विष्टेमाजी । ४ ।

१२६४. जो कां करी संतनिंदा। त्यासि दंडावें गोविंदा। १ ।
करी संतासीं पाखंड । त्याचें करावें त्रिखंड। २ ।
निंदक दंडावे दंडावे । नेऊनि अंधारीं कोंडावे। ३ ।
नामा म्हणे सांगेन एक । निंदक श्वानाचे ते लोक। ४ ।

## भक्तिस्तोम माजविणाऱ्या वेषधाऱ्यांस उपदेश

१२६५. एक म्हणतो आम्ही देवचि पै जालों । तरी असे नका बोलों पडाल पतनीं । १ ।
एक म्हणती आम्हीं देवासमान। तरी घासील वदन यमराम । २ ।
एक म्हणती आम्ही देवाचींच रूपें । तुमच्यानि बापें संसार न तुटे। ३ ।
देवें बधियेलें दानवां दैत्यां । आम्हां आड जातां तृण न मोडे। ४ ।
देवें उचलिल्या शिळा मेदिनी। तुमचेनी एक गोणी नुचले देखा। ५ ।
विठ्ठलाचे पद जो कोणी अभिलाषी । तो महा पातकी म्हणे नामा। ६ ।

१२६६. त्यागेंवीण विरक्ति । प्रेमावांचुनि भक्ति।
शांति नसतां ज्ञप्ति । शोभा न पवे । १ ।
दमनेंवाचुनि यति । मानावीण भूमिपति।
योगी नसतां युक्ति । शोभा न पवे । २ ।

बहिर्मुख कविमति । नेमावांचुनियां वृत्ति ।
बांधेंविण मह्रंती । शोभा न पवे । ३ ।
अनधिकारीं व्युत्पत्ति । गुरू तो कनिष्ठ याति ।
माता नीच शिश्न वृत्ति । शोभा न पवे । ४ ।
हेतुवांचुनि प्रीती । गुणरहित स्तुति ।
करणीवांचुनि कीर्ति । शोभा न पवे । ५ ।
सत्समागमसंगती । बाणली नसतां चित्तीं ।
नामा म्हणे क्षिति । शोभा न पवे सर्वथा । ६ ।

१२६७. युगें गेलीं जरी अपारें । भूमिसी न मिळती खापरें । १ ।
ऐसीं पापियांचीं मनें । स्थिर न होतीं कीर्तनें । २ ।
श्वान घातलें पालखीं । वरतीं मान करूनि भुंकी । ३ ।
सूकर चंदनें चर्चिला । पुढती गिवसी चिखला । ४ ।
गाढव न्हाणियला तीर्थीं । लोळे उकरडियाप्रती । ५ ।
नामा म्हणे युगें गेलीं । खोडी न संडिती आपुली । ६ ।

१२६८. मुखीं नाहीं नाम । काय जप तो श्रीराम । १ ।
काय आसन घालून । मुखीं नाहीं नारायण । २ ।
टिळे टोपी माळा दावी । भोळ्या भाविकांसी गोवी । ३ ।
नामा म्हणे त्याचा संग । नको चित्ता होय भंग । ४ ।

१२६९. गोमुखीं गोवूनि काय जपतोसी । जपतप त्यासी विघ्न करी । १ ।
नामसंकीर्तनें जळतील पापें । चुकतील खेपा चौऱ्यांशींच्या । २ ।
उपवास करी उग्र अनुष्ठानी । तया चक्रपाणि अंतरतो । ३ ।
नामा म्हणे ऐसे बहुतेक प्राणी । पचतील खाणी भ्रष्टलोक । ४ ।

१२७०. कांचनीक भक्ति सर्वकाळ करी । बहुतांचे वैरी हित नेणें । १ ।
लोकांपुढें सांगे आम्ही हरिभक्त । न होय विरक्त स्थिति ज्याची । २ ।

असंतोषी सदां अनितासा [illegible] । [illegible] केली स्वयें केली । ३ ।
वेदमर्यादा सांडूनि चालती । हुंबतें येती वा[illegible] ।
नामा म्हणे आतां असो याचि मात । सुख नेणें हित कदा काळीं । ५ ।

१२७१. सिबुर दावूनि बैसलें हातीं । सांगताहे गोष्टी जाणीवेच्या । १ ।
कापियेलें नाक झालें ते निःशंक । वारे भुरभुरां देख वाजतसे । २ ।
दवडा दवडा परतें करील निंदा । घ्यावा कां कांदा मुळींहुनी । ३ ।
नामा विनवीतसे केशवातें सत्ता । उरले सुरले आतां अवघे तासां । ४ ।

१२७२. यज्ञादिक कर्म करूनि ब्राह्मण । दंभ आचरण दावी लोकां । १ ।
लोकांसी दाविती मीच कर्मनिष्ठ । अभिमान खोटा वागविती । २ ।
वागविती वाक्य जाण ऋषीश्वर । नको येरझार नाना मतें । ३ ।
नानामतें अधोऊर्ध्वसात जावीं । नको गोवागोवीं नामा म्हणे । ४ ।

१२७३. नाहीं परमार्थ पोटीं धनाचि आशा । धरूनि हव्यासा धनमान । १ ।
दंभमान दावी ज्ञानमार्ग मोठा । पुढिलांसी वाटा यमपंथें । २ ।
पंथ न चुकती संतांविण संधीं । संसारासंबंधीं तया नरा । ३ ।
नामा म्हणे ऐसे बहु अभाविक । संतसंगसुख काय जाणे । ४ ।

१२७४. गोसावीपणाचा दाखविती वेष । नाहीं निदिध्यास हरिनामीं । १ ।
वरी वरी आर्त दाविती झगमग । अंतरीं तो संग विषयाचा । २ ।
व्यर्थ लोकांपुढें हालविती मान । केली विटंबन संसाराची । ३ ।
नामा म्हणे मन गुंतेल पांडुरंगा । आतां ऐशा सांगा कोण रीती । ४ ।

१२७५. वेदाध्ययन केलें तरी वैदिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना । १ ।
पुराण सांगसी तरी पुराणिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना । २ ।
गायन करिसी तरी गुणीजन होसी । परी वैष्णव न होसी अरे जना । ३ ।
कर्म आचरसी तरी कर्मठचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना । ४ ।
यज्ञ करिसी तरी याज्ञिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना । ५ ।

[illegible] हासा अरे जना । ६ ।
तीर्थ करिसी तरी कापडीच [illegible] वाचे घसी । तरीच वैष्णव होसी अरे जना । ७ ।
[illegible]

१२७६. गेला परमहंस परिवारासहित । कोल्हाळ करिती मायबहिणी । १ ।
काया हे नगरी पांचही तराळ । निद्रेनें भ्रमले व्याकुळ झाले । २ ।
गेला मागू न दिसे कवणिये वाटे । नवही द्वारें सपाट पडलीं ओस । ३ ।
नामा म्हणे चोरी एके अंगणांत । दिवसा रात्रीं पडत खाण तेथें । ४ ।

१२७७. डोई बोडून केली खोडी । काया नागविली बापुडी । १ ।
ऐसा नव्हे तो संन्यास । विषय देखोनि उदास । २ ।
मांजराचे गेले डोळे । उंदीर देखोनि तळमळे । ३ ।
वेश्या झाली पाटाची राणी । तिला आठवे मागील करणी । ४ ।
नामा म्हणे वेष पालटे । परी अंतरींचें ओसपण न तुटे । ५ ।

१२७८. तोंवरी रे तोंवरी वैराग्याचें ठाण । जंव कामिनी कटाक्ष बाण लागले नाहीं । १ ।
तोंवरी रे तोंवरी आत्मज्ञान बोध । जोंवरी अंतरीं कामक्रोध उठले नाहीं । २ ।
तोंवरी रे तोंवरी निरभिमान । जंव देहीं अपमान झाला नाहीं । ३ ।
नामा म्हणे अवघी बचबच गाळी । विरळा तो जाळी द्वैत बुद्धि । ४ ।

१२७९. चंद्र सूर्यादि बिंबें लिहिताती सांग । परि प्रकाशाचें अंग लिहितां नये । १ ।
संन्यासाचीं सोंगें आणिताति सांग । परि वैराग्याचें अंग आणितां नये । २ ।
नामा म्हणे कीर्तन करिताति सांग । प्रेमाचें तें अंग आणितां नये । ३ ।

१२८०. हरिभक्त म्हणविणें संतदर्शना न जाणें । बोलतां लाजिरवाणें आहेजी देवा । १ ।
पतिव्रता म्हणविणें आणि परपुरुषीं विचरणें । बोलतां लाजिरवाणें आहेजी देवा । २ ।
योगिया म्हणविणें आणि इंद्रिया नाहीं दमन । बोलतां लाजिरवाणें आहेजी देवा । ३ ।
क्षत्रिय म्हणविणें आणि पाठिशीं घाव साहणें । बोलतां लाजिरवाणें आहेजी देवा । ४ ।
पितृभक्त म्हणविणें आणि पितृआज्ञा न पाळणें । बोलतां लाजिरवाणें आहेजी देवा । ५ ।
ऐसे भक्त किती गेले अधोगति । नामा म्हणे श्रीपति दास तुझा । ६ ।

१२८१. कडू वृंदावन साखरें घोळिलें। तरी काय गेलें कडूपण। १ ।
तैसा तो अधम करी तीर्थाटण। नोहे त्याचें मन निर्मळ तें। २ ।
वचनाग रवा दुग्धीं शिजविला। तरी काय गेला त्याचा गुण। ३ ।
नामा म्हणे संत सज्जन संगतीं। ऐशालही गति काळांतरीं। ४ ।

१२८२. दावी जडीबुटी जारण मारण। नागवें हिंडणें काय काज। १ ।
दावी उग्र तप केले उपवास। फिरतांही देश काय काज। २ ।
काय काज तरी होसील फजीत। स्मरा रे अनंत सर्वकाळ। ३ ।
नामा म्हणे नव्हे उदंड उपाय। धरीं आधीं पाय विठोबाचे। ४ ।

१२८३. लांब लांब काय सांगशील गोष्टी। करी उठाउठी निरभिमान। १ ।
मी तूं पण जंव दंभ गेला नाहीं। साधिलें त्वां न कांहीं तत्त्वसार। २ ।
अहंभाव देहीं प्रपंचाचे दृष्टी। काय चाले गोष्टी रोकडी ते। ३ ।
नामा म्हणे ऐसें नेणती विचार। जाती निरंतर यमपंथें। ४ ।

१२८४. काय करूनि तीर्थाटणें। मनी भरिलें अवगुण। १ ।
काय करूनियां जप। चित्तीं नाहीं अनुताप। २ ।
मन:संकल्पाचीं पापें। नव जाती तीर्थांचेनि बापें। ३ ।
नामा म्हणे वर्म सोपें। पाप जाय अनुतापें। ४ ।

१२८५. करितां साधन जिवासी बंधन। कोणे काळीं मन शुद्ध नोहे। १ ।
करूं जातां तप अभिमानरूप। त्रिविधादि ताप कैसा निवे। २ ।
नित्यानित्य करी विवेक आपण। तेणें अभिमान वाढतसे। ३ ।
नामा म्हणे जन्म विसरोनियां गेलों। मरोनि राहिलों देहातीत। ४ ।

१२८६. भुजंग त्रिकाळ पवनाचा आहार। परि योगेश्वर म्हणों नये। १ ।
पवनाच्या अभ्यासें कायाचि पालटी। परि तो वैकुंठीं सरता नव्हे। २ ।
शुद्ध करी मन समता धरोनि ध्यान। तरीच भवबंधन तुटेल रे। ३ ।
पवित्र गंगाजळ मीन सेवी निर्मळ। परि दुष्ट ते केवळ कर्म त्याचें। ४ ।

अवचिता हेतु सांपडला गळीं । न सुटे तयेवेळीं तीर्थोदकें । ५ ।
घर सांडोनियां वन सेविताती । वनीं कां नसती रीस व्याघ्र । ६ ।
काम क्रोध लोभ न संडवे मनीं । असोनियां वनीं कोण काज । ७ ।
बहुरूप्याचा नटा माथां भार जटा । भस्म राख मोटा हातीं दंड । ८ ।
धोति पोति कर्मावेगळाचि दिसे । हुंबरत असे अंगवळें । ९ ।
त्रिपुंड्र टिळे अंगीं चंदनाची उटी । घालोनियां कंठीं तुळसीमाळा । १० ।
व्यापक हा हरि न धरिती चित्तीं । लटिकीयाची गति गातु असे । ११ ।
मीतूंपण जरी हीं दोन्हीं सांडी । राखिसी तरी शेंडी हेंचि कर्म । १२ ।
मानसी तूं मुंडीं देहभाव सांडी । वासनेसी दंडी आत्ममयें । १३ ।
मन हें दर्पण करोनि निर्मळ । पाहे पां केवळ आत्मास्वयें । १४ ।
तुझा तूं केवळ तुजमाजी पाहीं । नामा म्हणे ध्यायी केशिराजु । १५ ।

१२८७. योग याग यज्ञ इच्छिसी कामना । परि केशव निधाना विसरला । १ ।
नेणेचि हें मन भुललें अज्ञानें । यातायाति पतनें भोगुं पाहे । २ ।
ज्याचेनि जाहलें तुझें हें शरीर । त्याचा नामोच्चार नये वाचे । ३ ।
नामा म्हणे कारे नेणसी अझुनी । केशवचरणीं अनुसरे कां । ४ ।

१२८८. शास्त्रज्ञ पंडित तो एक मी मानी । आपणातें देखोनि तन्मय झाला । १ ।
येरां माझें नमन सर्व साधारण । ग्रंथांचें रक्षण म्हणोनियां । २ ।
वेद पारायण मानीं तो ब्राह्मण । चित्त समाधान संतुष्ट सदा । ३ ।
पुराणिक तो होऊनि कृतार्थ । विषयीं विरक्त विधिपाळी । ४ ।
मानीं तो हरिदास ज्या नामीं विश्वास । सर्वस्वें उदास देहभावा । ५ ।
नामा म्हणे ऐसे भेटवीं विठ्ठला । त्यालागीं फुटला कंठ माझा । ६ ।

१२८९. मुखीं नाम हातीं टाळी । दया नुपजे कोणे काळीं । १ ।
काय करावें तें गाणें । धिक् धिक् तें लाजिरवाणें । २ ।
हरिदास म्हणोनि हालवी मान । कवडीसाठीं घेतो प्राण । ३ ।

हरिदासाचे पायीं लोळे । केशीं धरोनि कापी गळे । ४ ।
नामा म्हणे अवघे चोर । एक हरिनाम हें थोर । ५ ।

१२९०. ताकहि पांढरें दूधहि पांढरें । चवी जेवणारे जाणवीते । १ ।
केळाच्या पाटीवर ठेविला दोडका । तोंहि म्हणे विका तणें मोलें । २ ।
ढोर म्हणती आम्हां हाकारलास । वारूवा सरसे खाऊं द्या घांस । ३ ।
मंदल्याजेती घरोघरीं गाती । धृपदासाठीं ताक मागती । ४ ।
नामा म्हणे सोपीं कवित्वें झालीं फुका । हरि हरि म्हणा आपुलिया सुखा । ५ ।

१२९१. पोटीं अहंतेसी ठाव । जिव्हे सकळ शास्त्रांचा सराव । १ ।
भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें । २ ।
सजिवासी हाणी लाथा । निर्जिवपायीं ठेवी माथा । ३ ।
सजीव तुळसी तोडा । पूजा निर्जिव दगडा । ४ ।
वेला करी तोंडातोडी । शिवा लाखोली रोकडी । ५ ।
तोंड धरून मेंढा मारा । म्हणति सोमयाग करा । ६ ।
सिंदुर माखुनियां धोंडा । त्यासि भजती पोरें रांडा । ७ ।
अग्निहोत्राचा सुकाळ । कुश पिंपळाचा काळ । ८ ।
मृत्तिकेची पूजा नागा । जित्या नागा घेती डांगा । ९ ।
नामा म्हणे अवघें खोटें । एक हरिनाम गोमटें । १० ।

१२९२. काय चाड आम्हां वाहिल्या वेषें । सुखाचें कारण असे अंतरीं तें । १ ।
भीतरी पालट जंव नाहीं झाला । तोंवरी न बोला जाणपणें । २ ।
चंदनाचे संगतीं नीच महत्त्वा पावली । नांवें परि उरली पालट देहीं । ३ ।
नामा म्हणे ऐसें सांगा मज कोणी । जेणें केशव येऊनि हृदयीं राहे । ४ ।

१२९३. उपाय असतां अपाय मानिती । तया अधोगति न चुकती । १ ।
मनुष्या माझारी तो एक गाढव । तया अनुभव काय करी । २ ।
नामा म्हणे देव ऐसियासी कैसा । काया मनें वाचा भेदवादी । ३ ।

१२९४. सोवळें विझूनि कां घालिशी । मुद्रेनें आंग कां जाळिसी । १ ।
कामया केली खोडी । काया विटंबिली बापुडी । २ ।
कावळा प्रात:स्नान करी । जितें मेलें तें न विचारी । ३ ।
मैंदें लावूनि द्वादश टिळे । तो फांसा घालूनि निवटी गळे । ४ ।
सुसरी गंगे रहिवासु । बहुतां जीवांतें करी ग्रासु । ५ ।
गंगे गेल्या ज्ञान सांगे । मांजर मारिलें तें न सांगे । ६ ।
बक ध्यान लावूनि टाळी । मौन धरूनियां मासा गिळी । ७ ।
नामा म्हणे केशिराजा । ऐशिया जीवा लावी वोजा । ८ ।

१२९५. अंतरीं आवेश धरूनि कामाचा । लटकी जल्पे वाचा शब्द ज्ञानें । १ ।
बोलाचे पैं मांडे क्षीर घारी अन्न । तेणें समाधान केविं होय । २ ।
बोलिल्यासारिखें न करी पामर । वृथाचि कुरकुर वाढविली । ३ ।
नाहीं जीव तया प्रेता आलिंगन । तैसे ते श्रवण केल्या होय । ४ ।
नामा म्हणे त्याच्या संगें स्थिति दुखे । झाला लाभ नासे तेथें आतां । ५ ।

१२९६. मांजरें केली एकादशी । इळवरी होतें उपवासी ।
यत्न करितां पारण्यासी । धांऊनि गिवसी उंदिरू । १ ।
लांडगा बैसला ध्यानस्थ । तोंवरी असे निवांत ।
जंव पेट सुटे जीवांत । मग घात करी वत्साचा । २ ।
श्वान गेलें मलकार्जुना । देह कर्वतीं घातलें जाणा ।
आलें मनुष्यदेहपणा । परि खोडी न संडी आपुली । ३ ।
श्वानें देखिला स्वयंपाक । जोंवरि जागे होते लोक ।
मग निजलिया नि:शंक । चारी मडक्कीं फोडिलीं । ४ ।
वेश्या झाली पतिव्रता । तिचा भाव असे दुश्चिता ।
तिसी नाहीं आणिक चिंता । परद्वारावांचुनि । ५ ।
दात्यानें केली समाराधना । बहुत लोक जेविले जाणा ।
परि न संडी वोखटी वासना । खटनट चाळिनसे । ६ ।

ऐशा प्रकारच्या भक्ति। असती त्या नेणों किती।
एक ओळंगा लक्ष्मीपति। म्हणे विष्णुदास नामा। ७।

१२१७. जयालागी जोडसी ती न येती तुज सरीसी।
यमु कासाविसी करिती वेळे।१।
तूं तव आज्ञान न देखसी डोळा। झालासी गांवळा धनगराचा।२।
चोरी रे घेती सापडलिया हाती। आवघी त्याची पळती टाकोनिया। ३।
नामा म्हणे संती न मानावे निष्ठुरा। वेगी ठाकी द्वार केशवाचे।४।

## उपदेश व मार्गदर्शन

१२१८. जन्मा येऊनियां काय पुण्य केलें। बाळपण गेलें वांयांविण। १।
संतसंगें सुख हुंडारलें जाणा। नामसंकीर्तना नोळखत। २।
तरूणपणींहि नाठवेचि देवा। वृद्धपणीं सेवा अंतरली। ३।
ऐसापरी जन्मुनि गेलासि रे वांयां। पंढरीच्या राया नोळखता। ४।
आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं। आझुनि कां श्रीहरि नोळखसी। ५।
सहस्र अपराध जरी म्यां रे केले। तारिलें विठ्ठलें म्हणे नामा। ६।

१२१९. बाळपणीं वर्षे बारा। तीं तुझीं गेलीं रे अवधारा।
तें तूं धांवसी सैरा। खेळाचेनि विनोदें। १।
म्हणवोनि आहेस नागर तरूणा। तंव बोळगे रामराणा।
आलिया म्हातारपणां। मग तुज कैंचि आठवण। २।
तुज भरलीं अठरा। मग तूं होसी निमासुरा।
पाहिले पंचविसीच्या भरा। झणें गव्हारा भुललासी। ३।
आणिक भरलिया सात पांचा। मग होसी महिमेचा।
तेंवें खिळेल तुझी वाचा। देवा ब्राह्मणांतें न भजसी। ४।
त्वचा मांस शिरा जाळी। बांधोनि हाडांची मोळी।
राखितोसि सदाकाळीं। देहचि रत्न आहे माझें। ५।

म्हणे मी मी तारूण्याच्या भरें । ऐसा संशय मनाचा रे ।
बहु श्रम या शिराचा रे । तूं संडीं रे अज्ञाना । ६ ।
माथवींचे पडे मासोळी । ते म्हणे मी आहे प्रबळ जळीं ।
तैसी विषयाच्या पाल्हाळीं । भुललासि गव्हारा । ७ ।
तुज भरलिया सांठीं । मग तुझ्या हातीं येईल काठीं ।
मग ती अडोरें लागती । म्हणती बागुल आला रे । ८ ।
म्हणती थोर रे म्हातारा । कानीं झालासि बहिरा ।
कैसें न ऐकसी परिकरा । नाम हरिहरांचें । ९ ।
दांतांची पाथीं उठी । मग चाववेना भाकर रोटी ।
नाक लागलें हनुवटी । नाम होटीं न उच्चारवे । १० ।
बैसोनि उंबरटा तळवटी । आया बाया सांगती गोष्टी ।
म्हणती म्हातारा बैल दृष्टी । कैसा अक्षयीं झाला गं । ११ ।
खोकलिया येतसे खंकारा । म्हणती रांडेचा म्हातारा ।
अझूनि न जाय मरण द्वारां । किती दिवस वाचेल । १२ ।
ऐसा जाणोनि अवसर । बोळगा वेगें सारंगधर ।
विष्णुदास नामया दातार । वर विठ्ठल पंढरीये । १३ ।

१३००. बाळपणीं हिंची वर्षे गेलीं बारा । खेळतां दे पोरा नानामतें । १ ।
विटु दांडु चेंडु लगोऱ्या बाबोडे । चपे पेडखडे एकीबेकी । २ ।
सेलदोरे खेळी आणि सलवडी । उचलिती धोंडी अंगबळें । ३ ।
कोंबडा कोंबडी आणि पाणबुडी । आणि मेलडी लिंबुटिंवु । ४ ।
नामा म्हणे ऐसें गेलें बाळपण । मग आलें जाण तारूण्य तें । ५ ।

१३०१. संसारसागर भरला दुस्तर । विवेकी पोहणार विरळा संत । १ ।
कामाचिया लाटा अंगीं आदळती । नेणों गेले किती पोहोनियां । २ ।
भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा । एक पडिले धारा चौऱ्यांशींच्या । ३ ।

नावाड्या विठ्ठल भवसिंधु तारूं । भक्तां पैलपारू उतरीतो । ४ ।
नामा म्हणे नाम स्मरा श्रीरामाचें । भय कळिकाळाचें नाहीं तुम्हां । ५ ।

१३०२. संसार करितां देव जैं सांपडे । तरि कां झाले वेडे सनकादिक । १ ।
संसारीं असतां देव जरी भेटता । शुकदेव कासया जाता वनालागीं । २ ।
घराश्रमीं जरी जोडे परब्रह्म । तरि कां घराश्रम त्याग केला । ३ ।
ज्ञातीच्या आचारें सांपडे जरी सार । तरि कां निरहंकार झाले साधु । ४ ।
नामा म्हणे आतां सकळ सांडोन । आलोंसे शरण विठोबासी । ५ ।

१३०३. परब्रह्मींची गोडी नेणती ती बापुडीं । संसार सांकडीं विषयभरित । १ ।
तूंतें चुकली रे जगजीवन रक्षा । अनुभवाविण लक्षा नयेचि रे कोणा । २ ।
जवळीं असतांचि क्षीर नव्हेंचि वरपडा । रुधिरा सेवितां गोचिडा जन्म गेला । ३ ।
दर्दुरा कमळिणी एके ठायीं बिढार । वास तो मधुकर घेवोनि गेला । ४ ।
मधुमक्षिया मोहोळ रचितां रात्रंदिवस । भाग्यवंत रस घेऊनि गेला । ५ ।
गोळीस घातली उसांची वैरणी । घेऊं नेणे धणी त्या रसाची । ६ ।
नामा म्हणे ऐसीं चुकलीं बापुडीं । अमृत सेवितां पुढीं चवी नेणे । ७ ।

१३०४. मिथ्या मायाजाळ मृगजळ बाधा । लागलासे धंदा संसारीया । १ ।
गालेरे आलेरे हाकित टाकित । मूढा गिवसीत काळचक्रीं । २ ।
बंधनापासूनि बांधलासे पायीं । बुडतों मी डोहीं निर्जळा ये । ३ ।
कोण भरवंसा धरिलासे जिवीं । बळीया सोडवी कदा काळीं । ४ ।
पुत्रपत्नी बंधु म्हणसील झणी । धांवोनि निर्वाणीं पाव आतां । ५ ।
नामा म्हणे वेगीं सावधान व्हावें । शरणही जावें पांडुरंगा । ६ ।

१३०५. कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग । न लगे तुज उद्वेग करणे काहीं । १ ।
समर्थ सोयरा राम हा निधान । जनी जनार्दन एक ध्याई । २ ।
नाम हेंचि सार नाम हेंचि सार । तराल निर्धार श्रुति सांगे । ३ ।
नामा म्हणे उच्चार रामकृष्ण पार । तुटेल येरझार भवाब्धीची । ४ ।

१३०६. संसाराचें दुःखसुख म्हणों नये । पुढे दुःख पाहे अनिवार । १ ।
तया दुःखा नाहीं अंतपार जाणा । काळाची यातना बहुतांपरी । २ ।
संसाराची चिंता वाहतां जन्म गेला । संग्रम हा वाढला बहुतांपरी । ३ ।
हित हीं बुडालें परत्र दुणावलें । नरदेह बुडविलें भजनाविण । ४ ।
भजनाच्या प्रतापें दुःख दुरी जाय । जैसें अभ्र होय देशधडी । ५ ।
वायूच्या झुंझाटें वृक्ष उन्मळती । परी माना गति तैसें दुःख । ६ ।
नामा म्हणे नाम दुःखाचा परिहार । सुखाचा अनिवार पार नाहीं । ७ ।

१३०७. प्रपंच स्वार्थासि साधावया चांग । वैराग्याचें अंग दाविसी जना । १ ।
अनुताप नित्य नाहीं कदाकाळीं । मग संचिताची होळी कैसी होय । २ ।
पवित्र ते वाचा कारे गमाविसी । रामनाम न म्हणसी अरे मूढा । ३ ।
नामा म्हणे जीव कामया ठेवावा । न भजतां केशवा मायबापा । ४ ।

१३०८. स्वयें घरदार प्रपंच मांडिला । जोडुनियां दिला बाळा हातीं । १ ।
तैसें सर्वांभूतीं असावें संसारीं । प्राचीनाची दोरी साक्ष आहे । २ ।
वाटसरू वस्ती येऊनि राहिला । प्रातःकाळीं गेला उठोनियां । ३ ।
नामा म्हणे आम्हां नाहीं प्रापंचिक । पंढरीनायक साह्य झाला । ४ ।

१३०९. फुटल्या घटाचें नाहीं नागवणें । संसार भोगणें तेणें न्यायें । १ ।
स्वप्नींची ती मात जागृतीस सांगे । तैसा भवरोग प्रारब्धाचा । २ ।
नामा म्हणे ऐसा जाणा तो संसार । वाउगा पसारा जाय जाणा । ३ ।

१३१०. जाय जाणा देह जाईल नजसी । लौकिक मिरविसी लाजसी ना । १ ॥
माझें माझें माझें मानिसी निभ्रांत । करिसी आपघात रात्रंदिवस । २ ॥
सांग तूं कोणाचा आलासि कोठोनि । दृढ बुद्धि मनीं विचारी पां । ३ ॥
धन संपत्ति करोनि मदें मातलासी । पुढत पुढती पडसी गर्भवासीं । ४ ॥
पुत्र कलत्र दारा यांचा झालासी म्हणियारा । यांच्या पातकाचा भाग वाहशील । ५ ॥

अंतीं यमापाशीं बांधोनियां नेति । कवतुक पाहती सकळ जन । ६ ।
नानापरी तुज करिती यातना । मांग तेथें कोणा बोभाशील । ७ ।
धन पुत्र दारा तुज नये कामा । एका मेघश्यामा वांचोनियां । ८ ।
विषयाचेनि संगें भुलशील झणें । भोगीसी पतन रात्रंदिवस । ९ ।
नामा म्हणे एक ध्यायीं कमळापति । निजाचा सांगाति केशिराज । १० ।

१३११. शरीर काळाचें भातुकें । तुम्हीं नेणां कां इतुकें । १ ।
माझा जन्म गेला वांयां । तुजवीण पंढरीराया । २ ।
अझूनि तूं कां रे निश्चिंत । काळ जवळीं हटकीत । ३ ।
नामा म्हणे अवघी चोरें । शेखीं हरिनाम सोयरें । ४ ।

१३१२. दुर्लभ नरदेह झाला तुम्हां आम्हां । येथें साधूं प्रेमा गयोबाचा । १ ।
अवघे हातोंहातीं तरों भवसिंधु । आवडी गोविंदु गाऊं गीतीं । २ ।
हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां । शोक मोह दुःखा निरसूं तेणें । ३ ।
एकमेकां करूं सदा सावधान । नामीं अनुसंधान तुटों नेदूं । ४ ।
घेऊं सर्वभावें रामनाम दीक्षा । विश्वासें सकळिकां हेंचि सांगों । ५ ।
नामा म्हणे शरण रिघों पंढरीनाथा । नुपेक्षी सर्वथा दीनबंधु । ६ ।

१३१३. नाम म्हणावया तूं कां रे कांटा । काय तुझे अदृष्टां लिहिलें असे । १ ।
यमाचे यमपाश पडतील गळां । जाशील सकळा काळामुखीं । २ ।
शरीराची आशा बाळ हें तारूण्य । अवचित वृद्धपण येईल मूढा । ३ ।
लक्ष्मी धन मद पुत्र स्त्री घरदार । नेतां यमकिंकर न सोडविती । ४ ।
मायबाप सखी न येती सांगातें । जंव शरीरीं पुरतें बळ आहे । ५ ।
न येती सांगातें सज्जन सोयरीं । वानप्रस्थ ब्रह्मचारी श्रेष्ठ झाले । ६ ।
होशील तूं सोंग संन्यास आश्रम । सांडूनि घराश्रम न सुटसी । ७ ।
नामा म्हणे नाम नित्य नरहरी । म्हणतां श्रीहरी तरशील । ८ ।

१३१४. बाळ वृद्ध तरुण काया हे जर्जर। वेगीं हा पामर आळशी झाला। १ ।
काय करूं देवा नाहीं यासि भावो। न करी उपावो तुझ्या भजनीं। २ ।
मन ठेवीं ठायीं रंगें तूं श्रीरंगीं। गोष्टी त्या वाउगी बोलूं नको। ३ ।
नामा म्हणे श्रीरंगु चित्तीं पां चोखडा। उघडा पवाडा सांगितला। ४ ।

१३१५. भुक्ति मुक्ति सिद्धि यावया कारणें। सेवकासी देणें पांडुरंगा। १ ।
ऐसिया तुज सांगणें आपणातें म्हणविती। तया अधोगति कल्पकोडी। २ ।
देहो सरल्या मिळे ज्योतीस ज्योति। ऐसें म्हणतां किती सितरिले। ३ ।
नामा म्हणे ऐसें नाशिवंत शरीर। पूजा हरिहर एक वेळां। ४ ।

१३१६. विषयाची आंतरा दिसे कैवल्याशा। करीतसे कल्पना नानाविध। १ ।
कुटुंब पाईक म्हणवी हरिचा दास। मागे ग्रासोग्रास दारोदारीं। २ ।
जळो त्याचें कर्म जळो त्याचा धर्म। जळो तो आश्रम जाणीवेचा। ३ ।
कल्पद्रुमातळीं काखे घेऊनि झोळी। बैसोनि सांभाळी भिक्षा अन्न। ४ ।
अधम पोटभरी विचार तो न करी। पुढती दारोदारीं हिंडों जाय। ५ ।
पोटालागीं करी नाना विटंबना। संतोषवी मना दुर्जनांच्या। ६ ।
न करी हरीचें ध्यान बैसोनि एकांतीं। जन्माची विश्रांति जेणें होय। ७ ।
द्रव्याच्या अभिलाषें जागे सद्रीपाशीं। नवजे एकादशी जागरणा। ८ ।
उत्तम मध्यम अधम न विचारी। स्तुति नाना करी आशाबद्ध। ९ ।
वैराग्याची वार्ता कैंची देवहता। नुपजे सर्वथा प्रेमभाव। १० ।
नामा म्हणे ऐसें तारी एक्या गुणें। अजा आरोहण गजस्कंधीं। ११ ।

१३१७. पापाचे संचित देहासी दंडण। तुज नारायणा बोल नाहीं। १ ।
सुख अथवा दुःख भोगणें देहासी। सोस वासनेसी वाउगाची। २ ।
पेरि कडु जीरें इच्छी अमृतफळ। अकिवृक्षा केळीं केविं येती। ३ ।
मुसळाचें धनु न होय सर्वथा। पाषाण पिळितां रस कैंचा। ४ ।
नामदेव म्हणे देवा कां रूसावें। मनाला पुसावें आपुलीया। ५ ।

१३१८. देहाचें ममत्व जंव नाहीं तुटलें । विषयीं विटलें मन नाहीं । १ ।
तंव वरी निज सुख कैसेंनि आतुडे । जव वरी न संडे मी तूं पण । २ ।
मीच एक भक्त मीच एक मुक्त । म्हणवी पतित दुराचारी । ३ ।
नामा म्हणे तुझे कृपेविण देवा । कैंचि जोडे ठेवा विश्रांतीचा । ४ ।

१३१९. भक्तिवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखरूप । १ ।
एक एक योनि कोटि कोटि फेरा । मनुष्य देहवारा मग लागे । २ ।
वीस लक्ष योनि वृक्षामध्यें घ्याव्या । जळचरीं भोगाव्या नव लक्ष । ३ ।
अकरा लक्ष योनी किरडामध्यें घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्ष्यांमधें । ४ ।
तीस लक्ष योनि पशुंचिये घरीं । मानवाभीतरीं चारी लक्ष । ५ ।
नामा म्हणे तेव्हां नरदेह या नरा । तयाचा मातेरा केला मूढें । ६ ।

१३२०. वावडी दुरांच्या दुरी उडतसे अंबरीं । हातीं असे दोरी परि लक्ष तेथें । १ ।
दुडीवरी दुडी पाण्या निघाली गुजरी । चाले मोकळ्या करीं परी लक्ष तेथें । २ ।
व्यभिच्चारी नारी परपुरुष जिव्हारीं । वर्ते घराचारीं परि लक्ष तेथें । ३ ।
तस्कर नगरीं परद्रव्य जिव्हारीं । वर्ते घरोघरीं परि लक्ष तेथें । ४ ।
धन लोभ्यानें धन ठेवियेलें दुरी । वर्ते ग्रामांतरी परि लक्ष तेथें । ५ ।
नामा म्हणे असावें भलतियां व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं ठेऊनियां । ६ ।

१३२१. भक्तांविण मोक्ष नाहीं हा सिद्धांत । वेद बोले हात उभारोनि । १ ।
तरी तेंचि ज्ञान जाणाया लागुनि । संतां बोळगोनि वश्य किजे । २ ।
प्रपंच हा खोटा शास्त्रें निवडिला । पाहिजे साधिला सद्गुरू तो । ३ ।
नामा म्हणे सेवा घडावी संतांची । घ्यावी कृपा त्याची तेंचि ज्ञान । ४ ।

१३२२. हरीवीण जिणें व्यर्थचि संसारीं । जग अलंकारीं मिरवीत । १ ।
देवावीण शब्द लटकें करणें । भांडा रंजविणें सभेमाजी । २ ।
आचार करणें देवावीण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण । ३ ।
नामा म्हणे काय बहु बोलों फार । भक्तिवीण नर अभागी तो । ४ ।

१३२३. मी तूं हें कथन सांगसी कावाड । विठ्ठल हे येवढें न सांगसी । १ ।
ऐसें कांहीं सांग जेणें फिटे पांग । नित्य पांडुरंग भजन सोपें । २ ।
मी आणि तूं हें वचन हो खोटें । विठ्ठलीं विनटें दिननिशीं । ३ ।
नामा म्हणे भाव ऐसा धरीं सकळ । तुष्टेल गोपाळ सांवरिता । ४ ।

१३२४. मी माझें भाविता न फिटे हें ओझें । कर्मकांड दुजें आड येत । १ ।
न तुटे हें कर्म न चले हा धर्म । सर्वत्र हें ब्रह्म न कळे तया । २ ।
मी माझें हें ओझें अहंताची वाहे । परतोनी न पाहे मी कवण । ३ ।
नामा म्हणे नाम स्मरे त्या कृष्णाचें । भय कळिकाळाचे नाहीं नाहीं । ४ ।

१३२५. सुवर्ण आणि परिमळ । हिरा आणि कोमळ ।
योगी आणि निर्मळ । हें दुर्लभ जी दातारा । १ ।
देव जरी बोलता । तरी कल्पतरु चालता ।
गज जरी दुभता । हें दुर्लभ जी दातारा । २ ।
धनवंत आणि दयाळु । व्याघ्र आणि कृपाळु ।
अग्नि आणि सीतळु । हें दुर्लभ जी दातारा । ३ ।
सुंदर आणि पतिव्रता । सावधान होय श्रोता ।
पुराणिक तरी ज्ञाता । हें दुर्लभ जी दातारा । ४ ।
क्षत्रिय आणि शूर भला । चंदन फुलीं फुलला ।
स्वरूपीं गुण व्यापिला । हें दुर्लभ जी दातारा । ५ ।
ऐसा संपूर्ण सर्व गुणीं । केवी पाविजे शारंगपाणी ।
विष्णुदास नामा करी विनवणी । मुक्ति चरणीं त्याचिया । ६ ।

१३२६. शब्दामृत मांडे येती भोजना । अभ्यास अज्ञाना तरी फळे । १ ।
मुंगीचे थडकें फुटे जों आकाश । ब्रह्मत्वें सायास नये हातीं । २ ।
मशकाचे ओढी मेरु हाले बुडीं । जीवाचे ते जोडी ब्रह्म मिळे । ३ ।

उदकींची मासोळी सूर्यासी भेटे। वारियाचे कोंडे दृष्टि पडे । ४ ।
चंद्राचे चांदणे घेती जे पालवी। मिथ्या माया देवी नामा म्हणे। ५ ।

१३२७. नामाची लेखनी श्वानाचिये कानीं। धांवतसे घाणी चर्माचिये। १ ।
विंचू म्हणतसे उदार मी दाता। उचित हें देतां नलगे वेळ। २ ।
सूकर म्हणे गृहस्थ मी भला। शेखीं तयाचा डोळा विष्टेवरी। ३ ।
नापिक म्हणे माझी नांदणूक मोठी। थोकटिं माझारीं जन्म गेला। ४ ।
नामा म्हणे माझी वासना हे खोटी। विठ्ठल चरणीं मिठी पडली असे। ५ ।

१३२८. कांडिताचि कोंडा न निघे तांदूळ। शेरा कैंचें फळ अमृताचें। १ ।
कण्हेरीच्या मूळा सुगंध तो नाहीं। कसाबाची गाई जिणें कैचें। २ ।
रूईदूध जरी येईल भोजना। लोभियाच्या धना वेंच नाहीं। ३ ।
निष्फळ हें जिणें भक्तिवीण मन। नामा म्हणे जाण नये कामा। ४ ।

१३२९. बुजगावणे शेतीं माणसें म्हणती। काय त्याचें हातीं शस्त्र शोभे। १ ।
हंसाशीं विरोध करीत कावळा। नेणे त्याची कळा उंचपणें। २ ।
अनामिकासंगें पाठवितां पंडिता। तो तयाचें तत्वतां काय जाणे। ३ ।
नामा म्हणे बापा करूं नका तैसें। विचार कायसे पाहसील। ४ ।

१३३०. बेडूक म्हणतें चिखलाचा मोका। क्षीर मांडूनि रक्ता गोचीड झोंबे। १ ।
जयाची वासना तयासीच गोड। प्रेमसुखचाड नाहीं त्याला। २ ।
खांडा म्हणे मी वाढवितें औंजार। उघडावया कवाड नाहीं कोणी। ३ ।
अम्बलासी तेल माखियलें कानीं। तें म्हणे रानीं थोर सुख। ४ ।
श्वानाचिया कानीं खोविली लेखणी। ते घेत असे धणी घरोघर। ५ ।
गाढवासी लाविली नृप पोळी डाळ। भुंके आळोआळ लाज नाहीं। ६ ।
सूकरा कस्तूरी चंदन लाविला। तो तेथोनि पळाला विष्टा खाया। ७ ।
नामा म्हणे माझी वासना हे खोटी। दृढ धरिली मिठी विठ्ठल पायीं। ८ ।

१३३१. भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव ।
तैसें आचार गौरव । सुकुलिन जनाचे । १ ।
झाड जाणावें फुलें । मानस जाणावें बोलें ।
भोगें जाणावें केलें । जन्मांतरींचें । २ ।
लोभ जाणावा उभय दृष्टी । क्रोध जाणावा भोवया गांठीं ।
लटिका जाणावा बहु गोष्टी । नष्ट प्रकृति ओळखावा । ३ ।
ह्वाही घातलिया जाणावा खरा । ढोकळ जाणावा कली अवसरा ।
परद्वारिणी जाणावी उण्या उत्तरा । कुश्चळी घरोघरा हिंडतसे । ४ ।
मृदंग जाणावा गंभीर नादें । गाणें जाणावें सुस्वर शब्दें ।
ओंकार जाणावा अक्षरभेदें । शाहाणा शब्दें ओळखावा । ५ ।
विष्णुदास नामा करी विनंती । या उत्तराची न मानावी खंती ।
केशवाचा प्रसाद आहे माझे चित्तीं । देवा काय करिसी तें न कळे । ६ ।

१३३२. आपुलें तें हित आपण नेणती । पुढिलांतें सांगती ब्रह्म ज्ञान । १ ।
नेणोंनि परब्रह्म जाणते पैं झाले । अभावीं गुंतले मायाजाळीं । २ ।
जीव आणि शीव एकरूप म्हणती । सेवेसी अंतरती केशवाचे । ३ ।
नामा म्हणे तोचि केशवातें जाणतां । केशव म्हणतां मुक्त होय । ४ ।

१३३३. हरिभक्तीचा उभारिला ध्वज । परमार्थाचें बीज न कळेची । १ ।
काय करूं देवा जळो त्याची बुद्धी । जया नाहीं शुद्धि परलोकींची । २ ।
मुद्रा धारण अंगीं तुळशीच्या माळा । परि नाहीं कळवळा स्वहिताचा । ३ ।
बहुरूपी वेष मिरविताती देहीं । परमार्थाची नाहीं आठवण । ४ ।
उपजीविकेलागीं घालिती पसारा । ज्ञान ते चौबारा विकीतसे । ५ ।
राजमान्य व्यापारी मोठे अधिकारी । पुढें दावी कुसरी संगीताची । ६ ।
भला भला म्हणती मान तुकविती । फुगो लागे चित्तीं गर्व तेथें । ७ ।
घातमात करी नटे नानापरी । चंचळ परनारी भुलवीतो । ८ ।

आपुलें लाघव दाऊनि वाडें कोडें । दुसऱ्यासी पुढें होऊं नेदी । ९ ।
लटकें पैशुन्य बोले दोष गुण । तेणें भयें कोण राहों शके । १० ।
दुर्जनाचे भयं जाती साधुवृंद । जैसी का श्वापदें व्याघ्रभयें । ११ ।
ऐसें नाम विटंबूनि करी हरीकथा । तेणें परमार्थां विघ्न झालें । १२ ।
सुगंध चंदन जवादि कस्तुरी । विष्टेचेचि थडी पाडिली जैसी । १३ ।
नामा म्हणे माझी हरिकथा माउली । विश्रांति साउली शिणल्याची । १४ ।

१३३४. हरिदासपणें उभवीला ध्वज । परि तें वर्मबीज न कळेची । १ ।
धरी बहु वेष वृथा करी दोष । नाम ब्रह्मरस अंगीं नाहीं । २ ।
दुसरा हरिदास देखुनियां रंगीं । धांवोनियां वेगीं ग्रासों पाहे । ३ ।
दुसरियाचें पद ऐकोनियां कानीं । क्रोधें पेटे वन्हि पर्वतींचा । ४ ।
बोले नानायुक्ति वश करी सभा । दुसरा रंगीं उभा राहों नेदी । ५ ।
साडेपंधरा सोनें होतें पालवण्या । परि झालें हीण डांक लागें । ६ ।
द्यावें दिव्यौषध रोगियाचें हित । केलिया कुपथ्य वांयां जाय । ७ ।
चतुर्विध अन्न षड्रस पक्वान्नें । विटाळलें जाण श्वानमुखें । ८ ।
ऐसें म्हणतां माझी मळेल पैं वाचा । परि हा वैष्णवांचा धर्म नव्हे । ९ ।
संसारसागरू हरिकथा तारूं । तरिजे विचारू दुरी ठेला । १० ।
जे कथा ऐकती पसरोनी बाहा । शांति क्षमा दया येती तेथें । ११ ।
शांति क्षमा दया येती भेटावया । तेथें मोक्ष व्हावया विलंब काय । १२ ।
आनंद नामाचा ऐकुनि गजर । ब्रह्मादिक हरिहर येती तेथें । १३ ।
खुंटला अनुवाद मावळला शब्द । अनिर्वाच्य बोध प्रगटला । १४ ।
वैकुंठ सांडून धांवे चक्रपाणि । कीर्तनाचा ध्वनि ऐकुनियां । १५ ।
तेथें श्रोते वक्ते होतील निष्पाप । ऐशी पुण्यरूप हरिकथा । १६ ।
शून्याचें निःशून्य जेथें हरपलें । एकाग्र मन झालें ध्यान तेथें । १७ ।
नामा म्हणे माझी हरिकथा माउली । मोक्षपान्हा घाली भक्तालागीं । १८ ।

१३३५. एकचि हें तत्त्व एकाकार देशीं। एक तो नेमेसी सर्व जनीं। १ ।
ऐसें ब्रह्म पाहा आहे सर्व एक। नलगे तो विवेक करणें कांहीं। २ ।
मिथ्या हें डंबर माया मथितार्थ। हरि हाचि स्वार्थ वेगीं करीं। ३ ।
नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद। नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं। ४ ।

१३३६. व्यर्थ या व्युत्पत्ति लावितांसी श्रुति। विषयांची तृप्ति काय चाड। १ ।
मायेचा हा फांसा मोहजाळ सोसा। यांयां कामाविसा होसी झणीं। २ ।
टाकीं टाकीं असत्य विठ्ठल हेंचि सत्य। होईल सर्व कृत्य एका नामें। ३ ।
नामा म्हणे दैवत एक तो अच्युत। सांगितलें हित खेचर विसें। ४ ।

१३३७. देवा धर्मीं नाहीं चाड। त्यासी पुढें आली नाड। १ ।
जैसें डोंगरींचें झाड। त्याचें जन्म झालें वाड। २ ।
नामा म्हणे भक्ति गोड। स्वानंद नेणती ते मूढ। ३ ।

१३३८. पावावया ब्रह्मपूर्ण। सांडुनि देईं दोषगुण। १ ।
सर्वांभूतीं समदृष्टि। हेचि भक्ति गोड मोठी। २ ।
यावेगळें थोर नाहीं। बरवें शोधुनियां पाहीं। ३ ।
येणें संसार सुखाचा। म्हणे नामा शिंपीयाचा। ४ ।

१३३९. ज्यालागीं जोडिलें तें न येती तुजलागीं। यम कासाविसी करी तये वेळां। १ ।
तूं तरी अज्ञान न देखसी डोळा। झालासि गोळा धनगरांसी। २ ।
चिरीरी घेतो सांपडलिया हातीं। अवघी त्याची पाळती टाकोनियां। ३ ।
संतीं न म्हणावें वचन निष्ठुर। वेगीं ठाका द्वार केशवाचें। ४ ।
नामा म्हणे शरण रिघा हरि पायीं। तया शेषशायी न विसंबें। ५ ।

१३४०. लव निमिष म्हणतां आहे नाहीं पाहतां। क्षण एक संपादितां विषयो हा। १ ।
स्वहित तें आचरा हित तें विचारा। नामीं भाव धरा जाणतेनो। २ ।
संपत्तीचे बळें एक जहाले आंधळे। वेढिले कळिकाळें स्मरण नाहीं। ३ ।
एक विद्यावंत जातीचा अभिमान। ते नेले तमोगुणें रसातळां। ४ ।

मिथ्या मायामोह करूनि त्यास । वेंचिलें आयुष्य वांयांविण । ५ ।
नामा म्हणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवीं केशवा मायबापा । ६ ।

१३४१. चांदणें नावडे चोरा । सद्‌बुद्धि नावडे रांडच्या पोरा ।
वृक्ष नावडे कुंजरा । सत्य कुचरा नावडे । १ ।
चंदन जाणावा सुगंधाची धृति । कर्पूर जाणावा उत्तम याति ।
हंस जाणावा चालतिये गति । कोकिळ श्रुति ओळखावी । २ ।
लांव जाणावी उफराटिये दृष्टी । क्रोधी जाणावा भौंवयांसीं गांठी ।
लटिक्या जाणा बहुता गोष्टी । नष्ट कुचेष्टी ओळखावा । ३ ।
नारी जाणावी भ्रतारभक्ति । आचारें जाणावी महा सति ।
धनुर्धर जाणावा संधान युक्ति । संत तापसी ओळखावा । ४ ।
जयीं घातलिया निवे खरा । ज्ञान जाणे तोचि चतुरा ।
शिंदळी जाणावी नीच उत्तरा । कुसळी घरोघरा फिरतसे । ५ ।
इतुकिया बोलाची न मानावी खंति । विठ्ठलचरणीं ठेवूनियां मति ।
प्रसन्न होईल लक्ष्मीपति । म्हणे विष्णुदास नामा । ६ ।

१३४२. देह पडे तंव देहाचा अभिमान । परि न करी मी अज्ञान आत्महित । १ ।
मी माझें म्हणतां गेले नेणों किती । रंक चक्रवर्ति असंख्यात । २ ।
क्षणक्षणा देहीचें आयुष्य पैं झडे । वासना ते वाढे नित्य नवी । ३ ।
मोहाचीं खाणोरी मिळालीं चोरटीं । खाऊनि शेवटीं घर घेती । ४ ।
जोंवरी संपत्ति तंववरी हे सखे । गेलिया तें भुंके सुणें जैसें । ५ ।
नामा म्हणे केशवा मी तों तुझा दास । मज आहे विश्वास तुझ्या नामीं । ६ ।

१३४३. भुल्ले हे लोक काळाचें भातुकें । सुरशक्रादिकें पाहतांती । १ ।
देवा तुझी माया अगम्य अगाध । प्रपंचाचा वेध सुटों नेदी । २ ।
माझें घरदार माझा हा संसार । मी मोठा चतुर म्हणतसे । ३ ।
आपणा देखतां जाती तें पाहती । मीपणाची भ्रांति सुटों नेणे । ४ ।
नामा म्हणे आतां काय त्यां बोलावें । भोंवत असावें चौऱ्यांशींला । ५ ।

१३४४. विषय सेवितां तुज । नव्हे पुढील काज ।
न भेटे तुज । गरूडध्वज निश्चयेंसी । १ ।
काय करिसी खटपट । वांयां मार्ग दुर्घट ।
वरपडा होसील कष्ट । परि तरो नेदिती । २ ।
सुटकेचें मूळ जाण । रामकृष्ण नारायण ।
येणें तुटेल भवबंधन । जन्मा न येसी सर्वथा । ३ ।
साधन इतुकेंचि पुरे । न लगती मंत्रांचे भार ।
ते बुडविती साचारे । परि तरों नेदिती । ४ ।
नामा म्हणे ते पामर । नेणतीच हा मार्ग सार ।
हरि वाचे नाहीं उच्चार । तो जाणावा महादोषी । ५ ।

१३४५. मायेचा हा फांसा अहंकार वळसा । परि हृषिकेशा भजतीना । १ ।
नव्हे हे सुटिका हा बोल लटिका । केशवासी एका न भज कारें । २ ।
होतील त्यां मुक्ती पुरतील त्यां आर्ती । चरण हे चिंतीं विठ्ठलाचे । ३ ।
नामा म्हणे केशव सर्वांभूतीं देव । ऐसा धरीं भाव भजनशीळ । ४ ।

१३४६. कां सिणसी प्राणी मायेच्या बंधनें । वांयांचि व्यसनें अनहितासी । १ ।
भजें यादवराया लागें त्याच्या पायां । आणिक उपायां करूं नको । २ ।
सर्वभावें हरिभजन तूं करी । भक्ति हे पुढारी तारील सत्य । ३ ।
नामा म्हणे मांडीं दया मांडीं माया । भजन लवलाह्या हरीचें करीं । ४ ।

१३४७. वासनेचा त्याग करारे सर्वथा । भावें त्या अनंता शरण रिघा । १ ।
कृपेचा सागर नुपेक्षी निर्वाणीं । कलिकाळापासुनि सोडवील । २ ।
भक्तजन पाळक अनाथाचा कैवारी । ब्रिदें चराचरीं वर्णिताती । ३ ।
शरीरसंपत्तीचा सोडा अभिमान । मन करा लीन कृष्णरुपीं । ४ ।
आसनीं शयनीं चिंतितां गोविंदु । तेणें तुटे कंदु भवव्याधि । ५ ।
परदारा परनिंदा परधन पर पीडन । सांडूनि भजन हरीचें करा । ६ ।

सर्व भूतीं कृपा संतांची संगति। नाहीं अर्थाअर्थी जन्मा येणें। ७ ।
शुकसनकादिक प्रल्हाद जनक। परीक्षिती मुख्य बिभिषण। ८ ।
भीष्म रुक्मांगद नारद उद्धव । शिबि कवि देव इत्यादिक। ९ ।
शास्त्रांचें हें सार वेदां गव्हार । नाम परिकर कलियुगीं ।१०।
नामा म्हणे नको साधन आणिक। दिली मज भाक पुंडलिकें ।११।

१३४८. पहा परदारा जननिये समान । परद्रव्य पाषाण म्हणोनि मानी। १ ।
निंदेसी तूं मुका होऊनि तत्त्वतां। परद्वेषीं निरुतां न घालीं दृष्टि। २ ।
ऐसें दृढ मनीं धरूनि राहसी। तरी माझें पावसी निजपद। ३ ।
पराकारणें प्राण वेंचि जो सर्वथा। जाणे परव्यथा कळवळोनि। ४ ।
परसुख संतोष धरी जो मानसीं। जरी तुज परलोकासी जाणें आहे। ५ ।
देहाचा अभिमान न धरावा चित्तीं। धरावी उपरति उपशमु। ६ ।
सर्वकाळ प्रीति संतांचि संगति। गावीं अनुरागें प्रीति नामें माझीं। ७ ।
सर्वांभूतीं सर्वदा ऐसी समबुद्धि। सांडावी उपाधि प्रपंचाची। ८ ।
सर्वकाळ परमात्मा आहे सर्वदर्शी। हे भावना अहर्निशीं दृढ धरीं। ९ ।
संतसमुदाय मिळती जेथें जेथें। जावें तेथें तेथें लोटांगणीं।१०।
येणें तूं तरसी नामा म्हणे जाण। तुज सांगितली खूण निर्वाणींची।११।

१३४९. संग खोटा परनारीचा। नाश होईल या देहाचा। १ ।
रावण प्राणासी मुकला। भस्मासुर भस्म झाला। २ ।
गुरुपत्नीशीं रतला। क्षयरोग त्या चंद्राला। ३ ।
इंद्रा अंगीं सहस्र भगें। नामा म्हणे विषयासंगें। ४ ।

१३५०. लावण्य सुंदर रूपानें बरवी। पापीण जाणावी ते कामिनी। १ ।
देखतां होतसे संगाची वासना। भक्ताच्या भजना नाश होय। २ ।
ऐसी जे घातकी जन्म कासयासी। चांडाळीण तिसी नरकप्राप्त। ३ ।
नामा म्हणे तिचें पाहूं नये तोंड। पापीण ते रांड बुडवी नरा। ४ ।

१३५१. वात्सल्य जिचें हिनवट अती। माउली धन्य ती आहे नारी। १।
तिर्येवरी मन कदापी नच जायें। भजना न होये कदाचळ। २।
ऐसिये माउली परउपकारी। घात हा न करी भजनाचा। ३।
नामा म्हणे तिचे चरण वंदावे। वदन पहावें माउलीचें। ४।

१३५२. गुरुच्या वचनें होईल पैं ज्ञान। न कळे प्रेम खूण विठोबाची। १।
वेदीं विचारा पुराणातें पुसा। विठोबाचा कैसा प्रेम भाव। २।
साधकासी सिद्धि होईल पैं प्राप्ति। न कळे निरूति प्रेम खूण। ३।
नामा म्हणे सोडा जाणींवेचा सीण। विठोबाची हे खूण जाणे संत। ४।

१३५३. प्रीति नाहीं गवें वर्जियेली कांता। परि तिची सत्ता जगावरी। १।
तैसे दंभधारी आम्ही तुझे भक्त। घालूं यमदूत पायांतळीं। २।
रायाचा तो पुत्र अपराधी देखा। तो काय आणिका दंडवेल। ३।
बहात्तर खोडी घोडा देवमणी कंठीं। तैसा आम्हां जगजेठी नामा म्हणे। ४।

१३५४. घरीं नांदतो बरवेपरी। म्हणुनि केलीसे दुसरी अंतुरी।
नित्य भांडण तया घरीं। आणिक कांहीं न देखों। १।
दुसरी न करावी बाईल। भंड फजिती होईल।
बोभाट वेसदारा जाईल। बायकाच्या पाणवथ्या। २।
धाकटीकडे पाहतां कोडें। वडील धडधडा रडे।
मेल्या तुझें गेलें मढें। तिकडे कारे पहातोसी। ३।
वडील बाईल म्हणे उण्या। धाकटी बाईल केली मुण्या।
लाज नाहीं तुझ्या जिण्या। काळतोंड्या बैसलासी। ४।
वडील बाईल धरी दाढी। धाकटी ओढून धरी शेंडी।
सांपडलासी चमडझाडी। लाशी चरपडा झालासी। ५।
सवती सवतीचा करकरा। उभा शिणलों दातारा।
भेटी करी वनींच्या व्याघ्रा। परी संसारी उबगलों। ६।

सवती सवतीची कैशी धरणी। कौतुक पहाती शेजारिणी।
तया पुरूषाची विटंबनी । थोर जाचणी तयाशी। ७ ।
नामा म्हणे गा श्रीहरी । दोघी बायका ज्याचे घरी।
त्याचे नसावें शेजारीं । थोर दुःख तयाशी। ८ ।

१३५५. मी माझें म्हणतां अर्थ जोडितां साहीचक्र गेले।
नळ नीळ पुरूपार्थी सारिखे तेही काळें ग्रासियले।
कपील महामुनी सिद्ध विचारितां सगररायें पैं भंगा गेले ।
कुमार अंत:पूर सांडूनियां ते भक्तराज काय झाले रे। १ ।
संसार स्वप्न जाणुनियां शरण रिघे पंढरीराया रे । ध्रु० ।
दुंदुभिरायें धर्म चालविला तेणे शांतीचा सागर म्हणविले ।
अजपाळ जैपाळ राजा दशरथ सूर्यवंशीं ते जन्मले।
जळींचे तरंग जळींच निमाले नेणो तेथें काय झालें ।
राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न सांगपां ते काय झाले रे। २ ।
सूर्यवंशीं राजा हरिचन्द्र जन्मला स्वप्न तेणें काय साच केलें ।
स्त्रीपुत्रातें विकुनियां तेणे ब्राह्मणा सुखिया पैं केलें।
शिवी चक्रवर्तीनें आपुलें प्राण देउनी ।
जीव ते भक्तराज काय झाले रे। ३ ।
शरीराचें मुद्गलें सामास कवण वेंचि ऋषि भोजनासी आले।
स्त्रीपुत्रातें वेचूनियां तेणें अतिथा सुखी केलें।
सत्व पहावया कैलासींचा राणा कांतीपूरनगरी उजू ठेले ।
श्रीयाळ पोटींचें बाळक दिधलें सांगपां तें काय झाले रे। ४ ।
कौरवां पांडवां अति दळ संग्राम अठरा अक्षौहिणी रणासी आले।
नव वेळ नारायण आले गेले परी अकरा रूद्र गणतीसी आले।
छपन्नकोटी यादवें तीं कृष्ण भालुका तीर्थी निमाले।
नामा म्हणे ऐसे कल्पनेचे अवघे परंपरी भजिन्नले। ५ ।

१३५६. तत्त्वमसी वाक्य उपदेशिलें तुज। तें तूं जीवीं कां अद्वृन धरिसी। ध्रु०।
त्रिभुवनापरता धांवतोसी दुरी। आधीं तूं आपुली शुद्धि करी।
उदय अस्तु झाला कवणीये घरीं। पिंडा माझारीं पाहेपां। १।
जागृतीमध्यें कवण जागतें। दोहीं माजीं स्वप्न कोण देखतें।
सुषुप्तीमध्यें कोण नांदतें। मग अनुवादतें तें कवण। २।
जागृती वरोनी करीं चिंतन। सुषुप्तीमाजीं रीघे ज्ञान।
दोन्हीं माजीं स्वप्न देखे कवण। जीव कीं मन सांगपां। ३।
निद्रा मरण हें एक स्थान। दोहींचा देखणा जाणें आपण।
लहान सुईच्या इंधनाहून। आढळले मन पांचासीं। ४।
इंद्रियें चपळ चेइलीं। जागत होतीं तीं कां परतलीं।
जाऊनियां कवणा घरीं लपालीं। मना मिळालीं कवणें गुणें। ५।
सांगतां तेथें अनुवाद कैंचा। नाहीं तूं पण खुंटली वाचा।
विष्णुदास नामा बोलिला साचा। परम पदीं बैसलासे। ६।

१३५७. चेईला तो जाणा रे सद्गुरुवचनीं निर्धारि।
विपरीत भावना विसर पडिला कंठीं जया परिहार रे। १।
आपणा पैं पहावया कवण लावूं दिवा रे।
चंद्र सूर्य जेणें प्रकाशें तो मी कैसा पाहूं येई रे। २।
अंत त्यासी नाहीं रे स्थान मान कांहीं रे।
चेईला तेणें ओळखीला येरासी अगम्य भाई रे। ३।
पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर नाहीं दाही दिशा रे।
महाप्रळयीं सप्त सागर एक होती अनुभविया तो तैसा रे। ४।
दाही दिशा व्यापूनियां तो अंधकार महा रे।
रवि प्रकाश जाहल्या आपेआप निरसला रे। ५।
काष्टीं पावक उपजला तोही तया सम रे।
नामा म्हणे केशीराजा चेईल्या आम्हां तुम्हां रे। ६।

१३५८. राष्ट्र करी पाप राजानें भोगावें। राजियाचें तें सर्व पुरोहितां। १।
बोले धर्मशास्त्र जाणती सर्वही। परी तें कोणाही न कळे वर्म। २।
शिष्यें केलें पाप भोगावें गुरूनें। स्त्रिनें केलें घेणें पुरूषासी। ३।
नामा म्हणे जन मायेंत गुंतले। सेखीं खाती झाले संसाराचे। ४।

## ❊ हरिजागर ❊

१३५९. कैलास भुवनीं। देव बैसले सिंहासनीं।
आपण भवानी। कर जोडुनी उभी असे। १।
भक्तिरस द्यावा। तेथील अनुभव घ्यावा।
नित्य हरिजागरू सांगावा। कोण फळ तयाचें। २।
तंव चंद्रचूड संतोषला। देवी प्रश्न बरवा केला।
अमृतबोध प्रवर्तला। दुजें बोलती व्यापकें। ३।
या हरिजागराचें फळ। तुज सांगेन सोज्वळ।
महादेव ऐसें बोलिले। प्रेमभावें गिरिजेसी। ४।
परिसा हरिजागरू। गिरजेसी सांगे महेश्वरू।
नवविधा भक्तीचा प्रकारू। शिवतत्त्वीं बोलतों। ५।
प्रथम अश्विनीचा भरू। पूर्ण तिथि जी शंकरू।
करूनी व्रतांचा स्वीकारू। मास दीनपर्यंत। ६।
मग मिळोनि संतसज्जन। करावें हरिजागरण।
गीतवाद्य सुलक्षण। नृत्य विलास तांडव। ७।
मग सारोनि देवासी मार्जन। वरी गंगोदकें स्नान।
मग वस्त्रें परिधान। देवासी करावी। ८।
यज्ञोपवीत अलंकार। करोनि पूजा नमस्कार।
आणि नैवेद्य नानाप्रकार। भगवंतासी अर्पावा। ९।
सहास्तृप्त घृत पूर्ण। वरी षड्रस पक्वान्न।
भावें सर्वांसी पृजांन। नमस्कार भावें करावा। १०।

मग करावी वैष्णवांची पूजा। मनीं भाव न धरावा दुजा।
स्वयंभ मूर्ति मीच सहजा। सदा संतां जवळिकें।११।
संत मार्जनादि भेदु। जेंवी मिळणी गंगासिंधु।
अखंड वाचे परमानंदु। हरिकीर्तन करावें।१२।
त्या हरिजागराचें महिमान। दुजें नाही समाधान।
सकळ तीर्थ केलिया पुण्य। परी सरी न पवशी।१३।
सकळ तीर्थांची परवडी। दान देतां पृथ्वी थोकडी।
या हरीजागराची प्रौढी। ते तयाहुनि अधिक।१४।
पहिले पक्षीं मज अर्पिला। दावा विष्णु थोर झाला।
दुजा पक्षु सांगाजी वहिला। म्हणोनि नमस्कारिलें शंकराशी।१५।
परिसे गिरिजे देवी। कथा सांगेन बरवी।
फळ पावती मानवी। अंत:करणीं कल्पिलें।१६।
दुजा पक्षु प्रथम तिथी। वैश्वानरेसी प्रीत्यर्थी।
बीज ब्रह्मया सांगती। ऋषीसहित उपचारू।१७।
पंचमी अष्टमी नागकुळा। शेषादिका सकळां।
प्रीत्यर्थ पावो नागकुळा। षष्टी स्वामी कार्तिक।१८।
भानु सप्तमीं जागरीं। जैसा समुद्र सरिता सागरीं।
अष्टमीची अवधारीं। माझारीं मृत्युलोक।१९।
नवमीची षष्ठी योगिनी। आणि चार कोटी कात्यायनी।
दुर्गेसहित भवानी। दशमी यम पवित्र गुणी।२०।
तेहतीस कोटी एकादशी। ब्रह्मा हरिहर त्रयोदशी।
नंदी धेनु तेरसी। आणि चतुर्दशी परियसा।२१।
पौर्णिमा चंद्रतारा। इंद्रादिकां देवां सकळां।
इत्यर्थ पावो देवां सकळां। जे बोलिया वेदश्रुति।२२।
संतोषोनि उमापती। ऐसें पुराणें बोलती।
या हरिजागराची स्थिती। तुजप्रति सांगितली।२३।

हें सकळ मीच भोक्ता । येर परिवार देवता ।
भ्रांति मीच भाविता । भावेंविण न कळे मी ।२४।
जेथें भाव तेथें देवो । आन न धरावा संदेहो ।
विश्वसृष्टी एकचि पहा हो । तरी मी असें जवळीकें ।२५।
विष्णुदास नामयासी । हरिचें नाम सदा मानसीं ।
राम हा मंत्र उपदेशी । भवसागर तरावया ।२६।

१३६०. संसार परजनीं । दूर दिधलें मज साजणी ।
द्वारकापुर पाटणीं । माझें माहियेर ।१।
थोर उत्कंठा मनीं । वाट पाहें प्रतिदिनीं ।
मज नेत कां न कोणी । तया माहियेरा ।२।
चित्तीं न लगती व्यापार । मनीं हेंचि वारंवार ।
आड ठाकले गिरी डोंगर । तया माहियेरा ।३।
माझिये सासुरें निष्ठुरें । दुरळ बोलिलें उत्तरें ।
तंव तंव मी तूतें स्मरें । विठ्ठ बापु माहियेर ।४।
येथें कोणी नाहीं माझें एक । जें त्यासि बोलूं सुख दु:ख ।
हें मन उतावेळ देख । तया माहियेरासाठीं ।५।
कामक्रोध भावे दीर । बोलती अति निष्ठुर ।
तेवेळीं त्यजिजे संसार । ऐसें वाटतसे मना ।६।
या वो संसारीं नसिजे । संगु अवघाची सांडिजे ।
नि:संग होऊनि राहिजे । तया माहियेरा ।७।
या वो प्राणाचे संकटीं । आत्मा ठेवूनियां कंठीं ।
मग चालवीं घरराहटी । म्हणिजे काम रात्रंदिवस ।८।
याचे क्रूर बोल न होती । तेणें मी असें निर्वुज चित्तीं ।
निरोप धाडूं कवणा हातीं । तया माहियेरा ।९।

तंवचि वो शिणिजे । जंव यानें न वोळंगीजे ।
याचें बीज पाविजे । नामें एकें विठ्ठलें । १० ।
आतां बहु काय बोलिजे । यासि मुवेळा न पुसिजे ।
पुण्यनामें जाईजे । तया माहियेरा । ११ ।
माझी सखी जे कां भक्ति । मज तेचि संबोखिती ।
तियें लाविलें शुद्धमती । साह्य ते मज चुकों नेदी । १२ ।
सत्य भावो मज सांगाती । येर लटकिया व्युत्पत्ति ।
मी वो जाईन हरखेंजतीं । तया माहियेरा । १३ ।
कृष्ण माउली भेटेल । शीण अवघाचि हरेल ।
सुख आनंदु न मायेल । या या त्रिभुवनीं । १४ ।
या बहु जन्माचा शीण वो जाईल । विठोदर्शनें दुःख हरेल ।
नामा सुखिया होईल । केशव चरणीं । १५ ।

१३६१. देव दाखवी अगा नाहीं गुरू । जेथें जाय तेथें दगड शेंदुरू । १ ।
देव दगडाचा बोलेल कैंचा । कोणे काळीं त्यास फुटेल वाचा । २ ।
देव देव करितां शिणलें माझें मन । जेथें जाय तेथें पूजा पाषाण । ३ ।
नामा तोचि देव हृदयीं पाहे । नामा केशवाचे न सोडी पाय । ४ ।

१३६२. आलेनो संसार सोडवणें करा । शरण जा उदारा पांडुरंगा । १ ।
प्रपंच न सरे कदा कल्पकोडी । वासनेचि बेडी पडे पायीं । २ ।
व्यर्थ मायादेवी गर्भवासी गोवी । नश्वर भोगवी नाना योनी । ३ ।
नामा म्हणे पहा विचारूनि मनीं । स्मरावा निर्वाणीं पांडुरंग । ४ ।

१३६३. मान्त्रिक हे वैराग्य अर्थाचें हें मूळ । आशा हें केवळ अनर्थ जाण । १ ।
अंतरापासोनी नसतां विवेक । निभ्रांताचे टक आशेवरी । २ ।
राजस तामस करोनियां गोळा । होतसे अंधळा दाटोनियां । ३ ।
नामा म्हणे ऐसे उदंड उपाय । विठोबाचे पाय अंतरती । ४ ।

१३६४. अद्वैत सुख कैसेनि आतुडे। जंववरी न मंडे मीतूपण। १।
शब्द चित्र कथा सांगती पाल्हाळ। मन नाहीं केवळ विठ्ठलदेवीं। २।
अणुचें प्रमाण असतां दुजेपण। मेरूतें समान देईल दु:ख। ३।
नामा म्हणे सर्व आत्मरूप पाहीं। तरीच ठावींच्या ठावीं निवशील। ४।

१३६५. शिशुपाळादिकां काढें शुद्ध भाव। उद्धरी केशव उंच नीच। १।
काय कामा पुत्र कोणा आले जाणा। सेखीं त्या रावणा कैवल्यदानीं। २।
महादुष्ट शंखासुरें नेले वेद। शेवटीं गोविंदें सोडविले। ३।
पित्याचिये हातीं पुत्र वध करी। कृपाळु बा हरी नामा म्हणे। ४।

१३६६. पांडुरंगा नमूं परात्परा नमूं। सगुणास्मी नमूं साक्षिभूता। १।
समस्त संबंध साधियेले हरी। रावणादि वैरी उद्धरिले। २।
नामरूपातीता नाहीं भेटाभेट। म्हटलें आहे नीट नामा म्हणे। ३।

१३६७. सहस्रनामाची घालितां लाखोली। तरला हा कोळी वाल्मिक तो। १।
पुराणप्रसिद्ध गोष्टी हा ऐकाव्या। प्रत्यक्ष देखाव्या कोणे ठायीं। २।
अंगे अनुभवा आपण आणाव्या। तरीच वानाव्या संतांपुढें। ३।
नाहीं तरी मज वाटे कानकोंडें। सुधा म्हणे तोंड चवी नेणों। ४।
नामा म्हणे असे पोटामध्यें भूक। तृप्तीचें तें सुख बोलों कैसें। ५।

१३६८. एक अंजनीं उत्पन्न। एका खांबीं अवतरण। १।
ते पावले दोघे जण। हनुमंत नरसिंह आपण। २।
एक भुभु:कार करी। एक सिंहनाद करी। ३।
एक सीताशुद्धी करी। एक प्रल्हाद कैवारी। ४।
एक बाळब्रह्मचारी। एक अर्धांगीं सुंदरी। ५।
एक रुद्राचा अवतारु। दुसरा नामचा दातारु। ६।

१३६९. उचितानुचिता मज पंढरीनाथा। न बोलें सर्वथा वर्मे तुझीं। १।
बिभिषणा तुवां दिधली नगरी। कीर्ति चराचरीं वाखाणिती। २।

ध्रुव प्रल्हाद अंबऋषि नारद । हरिश्चंद्र मुचकुंद करोनियां । ३ ।
नामा म्हणे आतां जन्मजन्मांतरीं । करीन ऋणि हरी तुज आतां । ४ ।

१३७०. त्रिभंगि कैसा झालासी गव्हारा । गोवळांसीं खेळसी पंढरीच्या राण्या । १ ।
विश्वामाजी तुझो बोभाट मोठे । जन्ममरणाचे संकल्प तुटे । २ ।
अकळ करणी नकळे लिहिलां धरणीं । सिंधुमही करूनि नाम तुझें । ३ ।
नामा म्हणे कीर्ति काय वानूं देवा । भक्तांचा कुडावा ब्रीद तुझें । ४ ।

१३७१. वेदां जन्मस्थान शास्त्रां समाधान । काय वुझावण दाखविसी । १ ।
जगादि अनंत अवतार घेसी । चरित्रें दाविसी भक्तांपुढें । २ ।
पतीतपावन तूंचि नारायण । सत्वर धावणें दामोदरा । ३ ।
नामा म्हणे भवबंधविमोचका । वैकुंठ नायका पांडुरंगा । ४ ।

१३७२. चोरूनि खादलें दहीं दुध लोणी । जिहीं चक्रपाणि खेळविला । १ ।
अखंड उन्मत्तें मतिमंद मूढें । गोळणीपाशीं रडे रूपें दावीं । २ ।
शकुनीचा पुत्र शिवद्वेष करी । संकट मुरारी निवारिसी । ३ ।
उद्धरिल्या सर्व गोप गवळणी । लीला दाखवूनि नामा म्हणे । ४ ।

## मुमुक्षूंस उपदेश

१३७३. तुम्हा स्वहित करणे आहे । सेवा राघोबाचे पाय । १ ।
दुष्टबुद्धी दुरी करा । तोडा अविद्येचा थारा । २ ।
निर्मळ करा अंतःकरण । लावा राघोबासी ध्यान । ३ ।
शुद्ध करा तुमचे मन । तुम्हा जवळी नारायण । ४ ।
नामा म्हणे दृढ धरा । तारू निर्वाणीचा खरा । ५ ।

१३७४. मृगजळडांहो कां भ्रमसी वांयां । वेगी लवलाह्या शरण रिघे । १ ।
भजे तूं विठ्ठला सर्वांभूती भावें । न लगती नांवे आणिकांची । २ ।
होईल सुटका घडेल भजन । नाम जनार्दन येईल वाचे । ३ ।
नामा म्हणे घडे भजन विठ्ठली । ऐसीये निमाली भक्ती करी । ४ ।

१३७५. विष्णुवीण ध्यान। भूतांचें पूजन।
अनामिक जन। तेथील जे। १।
नेणती वेद। काढिती जे अभेद।
ते पशु शब्द। श्रुती बोले। २।
न पुजी ब्राह्मण। नाहीं वृंदावन।
नेणें तें कीर्तन। कृष्ण महिमा। ३।
रामकृष्ण मूर्ती। पूजील हस्तीं।
जाये तो अधोगती। ऐसा नरु। ४।
देवासि न पुजी। अघोरी तो सहजीं।
संध्यास्नान काजीं। नेणें कांहीं। ५।
नामा म्हणे काज। कृष्ण विष्णु भज।
संसाराचे चोज। करूं नको। ६।

१३७६. विठ्ठलाचे पाय मनीं धरोनि राहें। मग संसार तें काय करील तुज। १।
संसाराचें भय नाहीं हरिच्या दासा। विठो आम्हा सरिसा निरंतर। २।
निरंतर वसे हरि भक्तांपाशीं। विसंबेना त्यासी कदाकाळीं। ३।
नामा म्हणे ऐसा विठ्ठल सांडोनि। व्यर्थ काय जनीं शिणताती। ४।

१३७७. जेथें भक्तीचा जिव्हाळा। तेथें न लगे कांही कळा। १।
आचरणें देव भेटे। तरी तें व्याधा वडलें कोठें। २।
जरी म्हणा प्रौढपण। ध्रुव बाळ केवळ सान। ३।
बळ पाहिजे विद्येचें। तरी ते गजेंद्रासि कैचें। ४।
जाती कैचें लाहे। तरी विदुर नीच नोहे। ५।
सत्ता पाहिजे शौर्याची। तरी ते उग्रसेना कैची। ६।
रूप रेखा व्हावी साच। तरी ते कुब्जेलागीं कैचें। ७।
धनवंता भेटे हरी। तरी तो सुदामा भिकारी। ८।

सोडुनि द्यावा अभिमान । तरी तो अहंकारी रावण । ९ ।
देव भेटतो निष्कामें । तरी त्या गोपिका सकाम । १० ।
नामा म्हणे आवडती । देवा होय मुख्य भक्ती । ११ ।

१३७८. ज्याचिये मनीं नाहीं आणिक काम । त्याचा योगक्षेम तूंचि होसी । १ ।
सर्व भाव तुज भाविती दातारा । त्याचिया संसारा तूंचि होसी । २ ।
आह्रिक परत्र जें कांहीं देसी । तेंहि तूंचि होसी नारायणा । ३ ।
नामा म्हणे माझी भक्तीची माऊली । केशवा पाऊली आहिके भाव । ४ ।

१३७९. जन्मांनि संसारीं कांतां भरोवरी । अंतरला दुरी पांडुरंग । १ ।
मन जैसें पिसें हिंडत सुनाट । चुकोनियां वाट माहेराची । २ ।
नामा म्हणे देवा काये करूं यासी । तुजविण कोणासी सांगों आतां । ३ ।

१३८०. न लगती डोंगर चढावे । हळुच पाऊल धरावें । १ ।
विठ्ठलाचे पाय बरवे । गंगा विनविते स्वभावें । २ ।
नामा म्हणे तीर्थ बरवें । मुकुटीं धरिलें सदाशिवें । ३ ।

१३८१. मन हें चंचळ स्थिर नोहे कदा । विषयाच्या स्वादा भांबावतें । १ ।
याचिलागीं मोठा सुलभ उपाव । नाम मुखीं गावें वेळोवेळां । २ ।
चालतां बोलतां विषय भोगितां । नाम वाचे येतां नाहीं बाधा । ३ ।
लौकिकीं निर्मळ थोरावती कीर्ती । सायुज्यता अंती ठेविलीसे । ४ ।
योग याग तपें मोठीं अवघड । कीर्तनीं जोडे जोड सर्व सिद्धी । ५ ।
नामा म्हणे नाम जिवाचें जीवन । शंकराचें ध्यान अखंडित । ६ ।

१३८२. लक्ष चौऱ्यांशी सोसुनियां श्रम । दुर्लभ मनुष्यजन्म पावला ।
सर्वांभूतीं हरी आहे निरंतर । वोळखी तूं करी संतसंग । १ ।
नामा म्हणे जंव न कळे काळवेळ । चिंती तूं उपाव सुटिकेचा । २ ।

१३८३. बाप कवणाचा माय कवणाची । सोयरीं धायरीं तेंही कवणाचीं । १ ।
जंव संपत्ति देखति तंवचि मानिति । सरलिया कवणाचें कवण म्हणती । २ ।

स्तनपान देऊनी वाढवी माऊली । तेही अंतकाळीं वेगळी ठेली। ३ ।
नामा म्हणे पाप पुण्य हे सांगाती । येर अवघे भ्रांति अरे मना । ४ ।

१३८४. एकवेळ नयनीं पहावा। मग जाईजे भलत्या गांवा । १ ।
आठवाल वेळोवेळां। विठोबा आहेरे जवळां । २ ।
हृदयीं मांडूनियां ठसा । नामा म्हणे केशव ऐसा । ३ ।

१३८५. रामनाम वाचे बोल। तया पुरूषा नाहीं मोल । १ ।
धन्य तयाचें शरीर । वरी जना उपकार । २ ।
ऋणियां तो तारी। विश्व व्यापक तो हरि । ३ ।
नामा म्हणे स्वामी। सुखें वसे अंतर्यामीं। ४ ।

१३८६. हडबडलीं पातकें। घेतां रामनाम एक। १ ।
नाम घेतां तत्क्षणीं। चित्रे सांडिली लेखणी । २ ।
घेऊनि पूजेचा संभार । ब्रह्मा येतसे समोर। ३ ।
नामा म्हणे जरी हें लटकें। तरी छेदावें मस्तक। ४ ।

१३८७. न लगे मंत्रसार न लगती तपें। राम नाम सोपें मूळ मज। १ ।
ज्यांचेनि स्मरणें तरली गणिका। वैकुंठीच्या लोकां प्राप्त जाली ।२।
राम नाम मंत्र जपरे तूं मना । तुटती यातना यमलोकींच्या । ३ ।
नामा म्हणे मंत्र जपे हा परम । तो देह उत्तम तिहीं लोकीं ।४ ।

१३८८. रामा राजीवलोचना। करुणा निधी भक्तजना।
यातायातीनिवारणा । तूं पावना स्वामिया। १ ।
जगद्रूपा जळदगहना। जगद्गुरू जगज्जीवना।
काय वाणूं तुझीया गुणा । आवड्या जनां आवडसी । २ ।
रामा त्र्यंबकभजना। दशकंठ तूं छेदना।
मधुकैटभ निर्दळणा । गरुडवाहना वासुदेवा । ३ ।

रामा दशरथनंदना। योगीजन-मनरंजना ।
अभयवरद वैष्णवजना। बिभिषणा स्थापियेलें। ४ ।
जयजय श्रीवत्सलांछना। ब्रह्मपदाचिया भूषणा।
अहिल्याकष्ट निर्दळना। नारायणा परियेसिं। ५ ।
म्हणउनी तुझें मी पोसणें। ऐकें सीतापती रघुनंदनें।
शरण आलो येणेंचि कारणें। नामा म्हणे विष्णुदास। ६ ।

१३८९. राम मंत्राचिया आवृत्ति। घडती जयासी पुढतोपुढती।
त्याचा जन्म धन्य ये क्षितीं। सर्व कुळाशीं तारक। १ ।
राममंत्र आवडे जीवा। हाचि उद्धार सर्व जीवा।
शिवासही विसांवा। पार्वतीसहीत । २ ।
रामकृष्ण उच्चारें। तरती जड पामरें ।
ऐसें हें व्यासें निर्धारें। नानाग्रंथीं सांगितलें। ३ ।
नामा जपे नाम मंत्र। आणिक नेणे नाना शास्त्र।
रामनामे नित्य वक्त्र। हरी रंगें रंगलें। ४ ।

१३९०. राम म्हणतां रामचि होसी। भाक घेई मजपाशी। १ ।
लवण समुद्रीं जागा मागे। तेंहि समुद्र झालें अंगे। २ ।
वात दीपासंगें गेली। तेहि दीप अंगे झाली। ३ ।
नामा सांगे भाविक लोकां। नाम घेतां राहूं नका। ४ ।

१३९१. अवचट देह लाधला प्राणिया। भक्तिवीण वांयां गेला जाण। १ ।
धिक् त्यांचे जिणें जन्मला कासया। जरी पंढरिराया विसरला। २ ।
रामनामी रत नव्हेचि बापुडें। जननिये सांकडें घातलें तेणें। ३ ।
ऐसा जन्म नको नको गा श्रीरामा। म्हणे तुझा नामा विष्णुदास। ४ ।

१३९२. रामनाम म्हणतां संसाराचें भय। म्हणती त्याच्या होय जिव्हे कुष्ट। १ ।
अमृत सेवितां कैंचें ये मरण। जाणती हे खूण अनुभवी। २ ।

ज्याची एकवृत्ति रामनामीं प्रीती । असतां कैसे होती गर्भवास । ३ ।
नामा म्हणे नामीं दृढ भाव धरा । आत्महित करा जाणते हो । ४ ।

१३१३. उत्तम भक्त खळ चुडींसी कारण । त्याचें परिहरण रामनाम । १ ।
कामसंदीपन दोषआचरण । त्याचें परिहरण रामनाम । २ ।
दुर्वासना गहन दुर्बुद्धि आचरण । त्याचें परिहरण रामनाम । ३ ।
नामा म्हणे कारण संसारतारण । जरी मनीं निधान रामनाम । ४ ।

१३१४. मी म्हणतां अहंता होईल पूर्णता । भजन सर्वथा न घडे येणें । १ ।
आपुलें आपण विचारावें धन । हरि हाचि पूर्ण भजें कां रे । २ ।
हेंचि भजन थोर करीं निरंतर । नाम हें सधर मनें गिळी । ३ ।
नामा म्हणे अपार नाम पारावार । श्रीराम सुंदर जप करीं । ४ ।

१३१५. भवसिंधूचा पार तरावयालागीं । साधन कलियुगीं आणिक नाहीं । १ ।
अहर्निशीं नाम जपा श्रीरामाचें । जें सकळ धर्मांचे मुगुटमणि । २ ।
न चले वर्णाश्रम धर्म आचरण । न घडे व्रत दान तप कोणा । ३ ।
नव्हे तिर्थाटन पुराण श्रवण । नव्हे ब्रह्मज्ञान शास्त्रबोध । ४ ।
नव्हे ध्यान स्थिती भावेंविण वांजा । न घडे देवपूजा एकनिष्ठ । ५ ।
नामा म्हणे नाम राघोबाचें गाता । ब्रह्म सायोज्यता घर रिघे । ६ ।

१३१६. राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान । रामें घडे यज्ञ कोटी देखा । १ ।
न लगती साधनें नाना मंत्र विवेक । रामनामीं सुख रंगीं कारे । २ ।
नामा म्हणे नाम हेंचि वचन आम्हां । नित्य ती पौर्णिमा सोळा कळी । ३ ।

१३१७. शंभु उपदेशी भवानिसी । रामनाम जपे मानसीं । १ ।
दोन्ही अक्षरें रसाळें । महा पातकां करी निराळें । २ ।
बीजमंत्र रामनाम । फळ शतकोटी रामायण । ३ ।
नामा विनविलो रघुनंदना । विनंति परिसा दशरथनंदना । ४ ।

१३९८. म्हणा श्रीराम जयराम । भवसिंधु तारक नाम । १ ।
नाम पतीत पावन । नाम जिवाचें साधन । २ ।
नाम शिवाचें ध्यान । नाम नारदा गायन । ३ ।
नामा म्हणें हरीचें नाम । नाम तारक परब्रह्म । ४ ।

१३९९. ज्यासी लागली रामनामीं गोडी । त्यानें केली प्रौढी परमार्थाची । १ ।
कलि माजी नाम सुलभ सोपारें । यालागीं आदर नामीं धरा । २ ।
आणिक साधनें आहेती उदंड । साधितां वितंड कष्ट तेथें । ३ ।
सोंवळें ओंवळें उंच नीच वर्ण । नाहीं येथें गुणदोष कांहीं । ४ ।
नामा म्हणे सर्व सिद्धांतांचा भाव । प्राणियांचे दैव कोण जाणे । ५ ।

१४००. तोंडीं हें बोंरडें मोह ममता आधीं । विषयबाधा व्याधी गुंफों नको । १ ।
असे घराश्रमीं भजे सर्वांभूतीं । मी माझें पुढती म्हणों नको । २ ।
तूं तंव लटिका आलासी कोठुनि । मी माझें म्हणोंनि म्हणतोसी । ३ ।
नामा म्हणे मूळ राम परब्रह्म । जगाचा विश्राम त्यासी भजें । ४ ।

१४०१. एकचि क्षरलें एकचि देखिलें । ब्रह्म हें संचले हरिनामें । १ ।
एक एकाकार सर्वही आकार । राम हा साकार सर्वांघटीं । २ ।
असोनि निराळा सुमनाचा वास । तैसा हृषिकेश जिवां सकळां । ३ ।
नामा म्हणे सुमन कळिकाळें एक । तेंचि निजसुख येई जना । ४ ।

१४०२. भावेंचि भजन जनीं जनार्दन । नित्य हें वचन रामनाम । १ ।
खुंटतील योनी तुटेल यातना । भक्ति नारायणा पावेल तुझी । २ ।
स्मरें सदा का रे न लगती पाल्हाळ । वसिजे गोपाळ सर्वांभूतीं । ३ ।
नामा म्हणे ब्रह्म सर्व हरी । येकु चराचरीं जनार्दन । ४ ।

१४०३. नाम एकचि तारक । रामनामें शुद्ध मुख ।
येणें उद्धरती तिन्ही लोक । कुळांसहित वैकुंठ । १ ।

धन्य धन्य तें कुळ। रामनामें नित्य निर्मळ।
जो उच्चारी सर्वकाळ। धन्य जन्म तयाचा। २।
एक हरी एक तत्त्व। तेथें धरोनियां शुद्ध सत्व।
नाना काय करिसी कवित्व। राम नाम उच्चारीं। ३।
नामा जपे नाम मंत्र। हातीं न घे आणिक शस्त्र।
रामकृष्ण हें वक्त्र। उच्चार इतुकेंचि पुरे आम्हां। ४।

१४०४. अखंड मुखीं रामनाम। धन्य तयाचाचि जन्म।
स्नान संध्येसी नेम। तो पुरुष महापवित्र। १।
धन्य धन्य तयाचा जन्म। रामार्पण अवघें कर्म।
तोचि तरला हाचि नेम। रामकृष्ण उच्चारणीं। २।
अनंत जन्मांचें सांकडें। तेणेंचि उगविलें कोडें।
जप तप येणें नावडे। रामकृष्ण उच्चारणीं। ३।
नामा म्हणे नाममात्रें। अवघीं निवारली शस्त्रें।
रामकृष्ण नाम वक्त्रें। उच्चारी तो धन्य। ४।

१४०५. सुंदरनामें सुखधामें श्रीरामाचीं। शंकर राजा हा गांडी जाणे त्यांची।
टळेल पीडा पापिया यमदुताची। १।
रसने रंगें या राघवाचे नामे। मिथ्या चाळा कां करिसी रिकामे।
रघुपती स्मरतां तूं निवसी अंतर्यामीं। २।
किती करीसी या विषयाचा सोस। नामें तरले धर नामीं विश्वास।
रंगी रंगला नामया विष्णुदास। ३।

## संत नामदेवकृत प्रभु रामचंद्रांची आरती

१४०६. श्रीराम जयराम जयजय राम, श्रीराम जयराम जयजयराम।
आरती ओंवाळु, आरती ओंवाळु पाहु सुंदर मेघशाम। धृ०।

आकाशी धरिले ठाण (मेघवर्ण, श्यामवर्ण) हाती धनुष्य बाण, हाती धनुष्य बाण मारुति पुढे उभे, मारुती पुढे उभे दोन्ही कर जोडून । १ ।
भरतशत्रुघ्न भाई चवऱ्या ढाळिती भाई चवऱ्या ढाळिती ।
सिंहासनी आरूढले सिंहासनी आरूढले जानकीपती । २ ।
बंधु लक्ष्मण करी सेवा रामचंद्रांची, सेवा रामचंद्रांची ।
चौदा वर्षे आहार निद्रा चौदा वर्षे आहार निद्रा तमा नाही त्यासी । ३ ।
विष्णुदास नामा म्हणे मागणे हेची देवा मागणे हेची ।
अखंडीत सेवा घडो रामचंद्रांची, अखंडीत सेवा घडो रामचंद्रांची । ४ ।

१४०७. गुळ गोड न लगे म्हणावा । तैसा देव न लगे वानावा । १ ।
सेवी तोचि चवी जाणें । येरा सांगतां लाजिरवाणें । २ ।
नामा म्हणे या खुणा । तुम्ही ओळखा पंढरिराणा । ३ ।

१४०८. पाणी तें देखणें वायु तेंचि शब्द । गोविला गोविंद आकारामाजीं । १ ।
प्रणव ओंकार तेचि आत्मा होती । स्वछंदें बोलती देखण्यासी । २ ।
देखणें आपण शब्द तो आपण । आपली ते खूण आपण तोचि । ३ ।
आपुला संवाद आपणचि आला । आपण विराला आपणामाजी । ४ ।
जीव तो देखणें शिव तोची शब्द । येक रूप नाद खेवण्याचे । ५ ।
अहं हें देखणें सोहं शब्द होणें । ऐक्यतेसि पाहाणें निश्चय तो । ६ ।
नामा म्हणे निश्चय सबळ । तोचि ब्रह्मगोळ नाचविता । ७ ।

१४०९. मार्गी चालतां उगें न चालावें । वाचेसी म्हणावें रामकृष्ण । १ ।
हरि वा हरि मुकुंद मुरारी । माधव नरहरि केशिराज । २ ।
ऐसा छंद वाचे सर्वकाळ जयां । नामा म्हणे तयां दोष कैंचे । ३ ।

१४१०. देवा सन्मुख दीपमाळा । कोणी भक्त हा उजळा । १ ।
तेल घाला रे फारसें । नाम म्हणा रे उल्हासें । २ ।
नामा दीपमाळा उजळी । तेणें भक्ति त्यास झाली । ३ ।

१४११. निर्वाणींचा हे मांगितलीं खूण । कैवल्य चरण विठोबाचे । १ ।
वेद शास्त्र स्मृति वदती पुराणें । पाहुनि जाणणें हेंचि सत्त्य । २ ।
क्रिया कर्म धर्म ज्यालागि करणें । ते खूण निर्वाण हेंचि असे । ३ ।
जप तप अनुष्ठान कां करिजे साधन । तेंचि प्रत्यक्ष निधान हेंचि असे । ४ ।
नामा म्हणे मज कळलें अनुभवें । न सोडीं हे जीवें चरण तुझे । ५ ।

१४१२. वैष्णव तो वळी । सदाशिव चंद्रमौळी । १ ।
त्याचा भक्त तो रावण । मारूनि छेदिला अभिमान । २ ।
आणिक तो बाणासुर । छेदिला शिवासमोर । ३ ।
अनिरूद्धा समयीं ख्याती । केली तयाची फजिती । ४ ।
भस्मासुर भस्म झाला । जाळुनियां भस्म केला । ५ ।
मारूनियां मुक्त केले । परि ते भक्त नाही झाले । ६ ।
नामा म्हणे देवादिदेव । भजावया पंढरिराव । ७ ।

१४१३. सुख तें आपुलें चांगंगां वांटिलें । पालटें घेतलें दुःख त्यांचे । १ ।
नेत्य नवी त्याची सोसितां सोसणी । नयेंचि अझोनि वीट मना । २ ।
ऐसा तूं निर्लज्ज पाहे आत्मघाती । कैसी तुझी खंती न वाटे तुज । ३ ।
लक्ष चौऱ्यांशी सोसितां यातना । भोगिसी पतना ज्यांच्यासंगें । ४ ।
यातें भजसी सांग पुढती कोण्या मोहें । विचारूनी पाहें तुझा तूंचि । ५ ।
सदा चिंतातूर होऊनि दीनरूप । संकल्प विकल्प करिसी किती । ६ ।
ाथिलाची छंदु नाही त्या दुराशा । धांवसी दाही दिशा तळमळीत । ७ ।
द्रियें वापुडीं दिसती केविलवाणी । विषयालागोनि लोलिंगत । ८ ।
यांची तूं हे आशा करिसी निरंतरी । झालासी भिकारी कृपणाचा । ९ ।
ालें काळभय हाकीत टाकीत । मूढा तुझें हित कोण करी । १० ।
त्रिभुवनी समर्थ वळी जगजेठी । रिघें त्याचे पाठी म्हणे नामा । ११ ।

१४१४. सत्ता पैं परिपूर्ण जयाचें रूपडें। तेथेंचि माजीवडें मन करीं। १।
होईल उद्धार सुटेल संसार। सर्व मायापूर दुरी होय। २।
कंटाळा कायेचा दुरावा मायेचा। हेंचि जप वाचा स्मरे राम। ३।
नामा म्हणे करी सर्व हरी हरी। राम हें उत्तरीं वाखाणी पां। ४।

१४१५. नित्य नेम आम्हां चिंतन श्रीरामा। आणिक त्या नेमा नेघों नेघों। १।
वळघलों हरि भूत भाव निर्धारीं। दिसे चाराचरी हरिरूप। २।
जें जें पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टी। हरिरूपी भेटी हेंचि दिसे। ३।
नामा म्हणे विठ्ठल सर्वांभूती आहे। आणिक उपाय न लगती। ४।

१४१६. एकें हातीं टाळ एकें हातीं दिंडी। म्हणा वाचा उदंडी रामनाम। १।
श्रीहरीसारिखा गोसांवी पै चांगु। फेडिला पैं पांगु जन्मांतरीचा। २।
ऐसें नृत्य करी वेडें बागडें। वदन वांकुडें करूनियां। ३।
चुकलें पाडस कुरंगिणी शिवसिती। तैसा हृषिकेशी न्याहाळी तूं तें। ४।
धेनु पान्हाय हुंबरे वत्सातें। तैसा वोरस तूं तें केशिराज। ५।
नामा म्हणे इतुकें न करवे निर्दैवा। तरी वाचेसि केशवा उच्चारी पां। ६।

१४१७. क्रिया कर्म धर्म तिहीं केलें सांग। जिहीं पांडुरंग देखियेला। १।
ओळखोनि मनें धरिला मानसीं। उभा अहर्निशीं हृदयकमळीं। २।
निजानंदबोधें नामाचेनि छंदें। डोलती आनंदें वोसंडत। ३।
नाही देहस्मृति निमाली वासना। मावळली कल्पना भावाभाव। ४।
अखंड विदेही रजतमावेगळे। भोगिती सोहळे प्रेमसुख। ५।
त्याचिया द्वारींचा झालोंसे सांडोवा। म्हणोनि केशवा पढिये नामा। ६।

१४१८. गुण दोष त्याचे म्हणतां स्वाधिजे। निर्वासना किजे चित्त आधीं। १।
गाऊं नाचूं आम्ही आनंदें कीर्तनी। भुक्ती मुक्ती दोन्ही नको देवा। २।
मनाची पैं वृत्ति बुडे प्रेमडोहीं। नाठवती देहीं दुजा भाव। ३।
सगुणीं निर्गुणीं एकचि आवडी। चित्तीं दिली बुडी चिदानंदीं। ४।
नामा म्हणे देवा मागणें ऐसी सेवा। द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं। ५।

१४१९. तुमचें तीर्थ आम्हीं सेवावें। तेणे तें पावावें परब्रह्म। १ ।
विश्वाकारवीं ब्रह्म म्हणवितां तुम्ही । म्हणों जी माय आम्ही पिता तुम्ही । २ ।
तो तुमचे चरणींचा तो नाहीं आम्हां। विष्णुदास नामा नसे तेथें। ३ ।

१४२०. अवघे हो एका अवघे श्रवणीं। अवघेंचि होऊनि एकचित्त । १ ।
विठोबाचें नाम अवघेंचि गोमटें । विचारीं नेटेंपाटें आपुल्या मनीं। २ ।
अवघी हेचि क्रिया अवघें हेंचि कर्म। अवघा हा स्वधर्म सत्य जाणा। ३ ।
अवघें हे सगुण अवघें हें निर्गुण। अवघें हे परिपूर्ण शुद्ध बुद्ध । ४ ।
अवघा हा आचार अवघा हा विचार। अवघा हा संसार सर्व काळ । ५ ।
अवघा जेणें दुरी ठाके भवभ्रम । निरंतर नाम गाय नामा। ६ ।

१४२१. अवघी चित्तवृत्ती एकवटोनि जेणें। अवघा धरिला मनें पांडुरंग। १ ।
अवघें सुख एक तयासि फावलें । अवघें सफळ झालें जन्म त्याचें। २ ।
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें। ज्याचें विठ्ठलीं ध्यान मन जडलेंसे। ३ ।
नित्य विठ्ठल नाम गर्जती सप्रेम । अवघे नित्य नेम झाले त्यांचे। ४ ।
अवघा इष्ट मित्र बंधु माता-पिता। केला आवडता पांडुरंग। ५ ।
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय । मिळोनि धरा पाय विठोबाचे । ६ ।

१४२२. अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें। राहे अंगसंगें समागमें । १ ।
समागमें असे सर्व साक्षी देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे। २ ।
जो मुखीं नाम न आळस उच्चारी। प्रीती मानी हरि हास्यमुखें । ३ ।
कळपाकीं सर्व देतील प्राणिया। नामा धरी पाया बळकट । ४ ।

१४२३. नामचें कळिकाळीं विठावली पाहीं। तोचि लवलाहीं ध्यायिजेसु। १ ।
स्मरण विठ्ठल चित्त पांडुरंग । नाही तया मग जन्ममरण। २ ।
आपणचि नांदे भक्तांचिया घरीं। आपणचि करी सर्व कृत्य । ३ ।
नामा म्हणे तो देव पंढरीनिवास। कळिकाळासी त्रास पाहों नेदी। ४ ।

१४२४. भीष्मासी आपण पाडियलें रणीं । गोविंदें निर्वाणी भेटी दिल्ही । १ ।
कर्ण विदारिला अर्जुनाच्या बाणीं । गोविंदें निर्वाणी भेटी दिल्ही । २ ।
हरिश्चंद्र वाहे डोंबाघरीं पाणी । गोविंदें निर्वाणी भेटी दिल्ही । ३ ।
परीक्षिती बैसे मरण आसनीं । गोविंदें निर्वाणी भेटी दिल्ही । ४ ।
नामा म्हणे तुम्ही देव धरा मनीं । गोविंद निर्वाणी भेटी देई । ५ ।

१४२५. हरीस श्रवणीं ध्या वो नित्य तुम्ही । दसावेल ध्यानीं अवघा राम जनींवनीं । १ ।
नयनीं सखा पहा कृष्ण न्याहाळुनि । प्रकाशले तेज रवि गेला लपोनी । २ ।
हरिचरणीं लावी मन दर्शन । झालिया जाती त्रिविधताप हरपोन । ३ ।
तुळसीचा सुगंध मस्तकीं धरा । नामा म्हणे चरण दृढ धरा । ४ ।

१४२६. जिव्हे केशवाचें करितां कीर्तन । मिथ्या वदूं नको एक रामाविण । १ ।
म्हणऊनि हरिरंगी रंगा । नाम घेतां महापातकें जाती भंगा । २ ।
चित्तीं चिंतितां होई सद्रूप मिथ्या । विषयीं लुब्ध झालिया काय सुख । ३ ।
भजन करा तुम्ही अच्युताचें । नामा म्हणे एकचित्तें साचें । ४ ।

१४२७. पूर्ण परिपूर्ण पंढरी हे पेठ । आपण वैकुंठ समचरण । १ ।
ऐसें कांहीं करा नाम हेंचि धरा । विठ्ठल अपारा जप करा । २ ।
करितां साधन नागवी अहंकार । विठ्ठल उच्चार पुण्य ओघें । ३ ।
नामा म्हणे घेई विठ्ठल कुळदेवो । सर्व हाचि भावो केशव ऐसा । ४ ।

१४२८. व्रत तप न लगे करणें सर्वथा । न लगे तुम्हां तीर्था जाणें तया । १ ।
आपुलेचि ठायीं असा सावधान । करा हरिकीर्तन सर्वकाळ । २ ।
न लगे तें कांहीं वर्जावें अन्न जीवन । लावा अनुसंधान हरीचे पायीं । ३ ।
न लगे योग याग न लगे संगत्याग । असों द्या अनुराग हरीचे पायीं । ४ ।
न लगे निरंजनी करणें वास तुम्हां । दृढ धरा प्रेमा हरीचे नामीं । ५ ।
नामा म्हणे नाम दृढ धरा कंठीं । तेणें देईल भेटी पांडुरंग । ६ ।

१४२९. तप थोर देखिलें संसारी। जो अखंड कीर्तन करी।
त्याच्या तपा पुढारिलें हरि। हें निर्धारें जाणा हो। १।
धन्य धन्य विष्णुदास। ऐसा हरिनामीं सौरस।
ते पितरांसहित वैकुंठ। सर्वकाळ क्रमिती। २।
जप तप ज्ञान विठ्ठल। तयासी नाहीं काळवेळ।
टाळी वाजवितांचि निर्मळ। महादोष हरतील। ३।
जेथें रामकृष्ण उच्चार। सकळ मंत्रांत मंत्रसार।
गांचांही वदनीं शंकर। नित्य रामनाम जपतसे। ४।
गो हा पुंडलिकें उभा केला। आपण दृष्टिसमोर बैसला।
कीर्तनें त्रैलोक्य तारिला। स्वानंदानें पितरांसहित। ५।
। लगे करावे यज्ञयाग। न लगे आणिक मंत्रलाग।
एक सेविलिया पांडुरंग। अनंत तीर्थे घडतील। ६।
ंचक्रोशी प्रदक्षिणा। नित्य नमस्कारीं विठ्ठल चरणां।
री घडेल पृथ्वी प्रदक्षिणा। कोटीच्या कोटी अनंत। ७।
ाप्तपुरी द्वादश लिंगें। कीर्तनें डोलती लागवेगें।
से भक्त तारिले पांडुरंगें। विटेवरी उभा नीट राहोनी। ८।
ामा सांगे गुह्य गोष्टी। विठ्ठल तारक एक सृष्टी।
हरी देखिलिया दृष्टी। वैकुंठपद पाविजे। ९।

४३०. तुझिया नामें घननीळा। मुक्ती दिधली अजामेळा।
रणीं उद्धरिली शिळा। स्मरण मात्रें केलिया। १।
मकृष्ण केशव विठ्ठल वाचे उच्चारा। तेणें हरती महापातकें।
मुक्ती देई अवधारा। २।
मन्यु बाळक तान्हें। त्यानें मांडिलें निर्वाण।
ाचें ऐकोनि नाम स्मरण। क्षीरसागर दिधला। ३।
रण्यकश्यप दैत्य बळी। त्यानें पुत्र गांजिला छळी।
त्यां सोडविला वनमाळी। स्मरण मात्र केलिया। ४।

द्रौपदी सभेसि आणिली। नग्न करू आरंभिली।
तिसि वस्त्रें पुरविली। स्मरण मात्र केलिया। ५ ।
ऐसा कृपाळू अनंत। तो तुम्ही स्मरा हृदयांत।
अंती देईल मुक्तिपंथ। विष्णुदासनामा म्हणे। ६ ।

१४३१. धीर धरीं सत्य हें तो नारायण। शुद्ध आचरण न सांडावें। १ ।
लौकिकाची कांही न धरावी लाज। हेंचि निज काज साधावें तें। २ ।
दंभ अभिमान सर्व त्यजोनियां। शरण त्या सखिया जावें आता। ३ ।
निंदा करिती तो मानावा आदर। स्तुति तें उत्तर नायकावें। ४ ।
न धरावी चाड मानसन्मानाची। आवडी भक्तिची रूढवावी। ५ ।
नामा म्हणे हेंचि रूढवावें मानसीं। क्षण एक नामासी विसंबूं नये। ६ ।

१४३२. जंव हंस काया नव जाय सांडोनि। तंव घेई ठाकोनि रामनाम। १ ।
अंत काळवेळीं तुझें नव्हे कोण्ही। मी माझें म्हणवुनि भुललासी। २ ।
राहें निरंतर राघवाचे द्वारीं। तेणें भवसागरीं तरसी बापा। ३ ।
नवमास मायें वाहिलासि उदरीं। आस केली थोरी होशील म्हणोनि। ४ ।
स्तनपान देऊनि मोहें प्रतिपाळी। तेहि अंतकाळी दूर ठाके। ५ ।
सर्वस्व स्वामिणी म्हणवीतसे कांता। तेहि केश देतां रडतसे। ६ ।
म्हणे म्यां मेल्याचें मुख नाहीं देखिलें। तेणें तंव पाळिलें अर्थे प्राणें। ७ ।
गाई घोडे म्हैसी आणिक त्या दासी। धन त्वां सायांसी मेळविलें। ८ ।
तुझिया धनाला पार नाहीं लेखा। एकलाचि मूर्खा जासी अंतीं। ९ ।
हातींच्या मुद्रिका कानींचे ते नग। करोनि लगबग काढिती वेगीं। १० ।
अंगींची लुगडीं फेडोनियां घेती। तुज बांधोनियां नेती यमदूत। ११ ।
भूमिभार झाला म्हणती वेग करा। नातळती शरीरा इष्ट मित्र। १२ ।
स्मशाना नेऊनि भडाग्नि देऊनि। येती परतोनि सकळ जन। १३ ।
एकलेंचि येणें एकलेंचि जाणें। पहा दृढ ज्ञानें विचारोनि। १४ ।

पापपुण्य दोन्ही अंतींचीं सांगातीं। येरें तीं राहती जेथिंचीं तेथें। १५।
ऐसा हा संसार माया वेष्टियला। म्हणोनि दुव्हाविला योगीजनीं। १६।
विष्णुदास नामा विनवीतसे तुम्हां। झणीं परब्रह्मा विसरूं नका। १७।

१४३३. जड तेंचि बळें आयुष्याची गती। काळ माप उमी मवीतसे। १।
माप तें लागलें माप तें लागलें। माप ते लागलें झडा झडा। २।
मनोमय साक्ष माणिकाप्रमाणें। तूंचि नारायण काळ खंडी। ३।
नामा म्हणे जावें शरण केशवा। सळेचा जो ठेवा न पवसी। ४।

१४३४. अतिथी आलिया द्यावें अन्नदान। अर्पी जीव प्राण परमार्थी। १।
तोचि एक नर श्रीहरिसमान। करी दुजा कोण नाही ऐसा। २।
दीनासी सन्मान करितां आदर। त्याच्या उपकारा पार नाही। ३।
नामा म्हणे ऐसे असावे भाविकां। सर्वांभूतीं देखा ऐक्य पाहे। ४।

१४३५. भूमिदानें होसी भूमिपाळु। कनकदानें कांति निर्मळु।
चंदनदानें सदा शीतळु। जन्मोजन्मीं प्राणिया। १।
अन्नदानें दृढायुषी। उदकदानें सदासुखी।
मंदिरदानें भुवनपालखी। सुपरिमळु उपचारां। २।
वस्त्रदाने सुंदरपण। तांबुलदानें मनुष्यपण।
गोपीचंदने ब्राह्मणपण। अतिलावण्य सुंदरता। ३।
जे वृक्ष लाविती सर्वकाळ। तयावरी छत्रांचे झल्लाळ।
जे ईश्वरीं अर्पिती फळ। नानाविध निर्मळ। ४।
ऐसा दानाचिया पंक्ति। वेगळाल्या सांगों किती।
एका ध्यारे लक्ष्मीपति। विष्णुदास नामा म्हणे। ५।

१४३६. निंदील हें जन सुखें निंदूं द्यावें। सज्जनीं क्षोभावें नये बापा। १।
निंदा स्तुति ज्याला समान पैं झाली। त्याची स्थिती आली समाधीला। २।

शत्रुमित्र ज्याला समसमानत्वें। तोचि पै देवातें आवडला। ३ ।
माती आणि सोनें ज्या भासे समान। तो एक निधान योगीराज। ४ ।
नामा म्हणे ऐसे भक्त जे असती। तेणें पावन होती लोक तिन्ही। ५ ।

१४३७. एक तत्व त्रिभुवनीं। दुसरें न धरी तूं मनीं। १ ।
म्हणे कां नरहरी नारायण। मग तुज गांजील कोण। २ ।
दोन मनीं जरी तूं धरिसी। तरी वांयां दंडिला जासी। ३ ।
त्रिविध भक्ति चराचरीं। तयामाजिल एक तूं करीं। ४ ।
चहूंवेदीं जें बोलिले। तें तूं करीं बा उगलें। ५ ।
पंचइंद्रियांचा संग। त्यांचा नको करूं पांग। ६ ।
साहि चक्रीं मन पवन। तेथें नव्हे आत्मनिधान। ७ ।
सप्तस्वरीं करीं कीर्तन। आणिक न लगे साधन। ८ ।
अष्टहि गुणीं सात्विक पूजा। भावें भजा गरूडध्वजा। ९ ।
नवहि द्वारें दंडिती। पुनरपि कोठें कैंचि भक्ती। १० ।
दाही दिशा अवलोकितां। दिवस गेले मांजितां। ११ ।
अकरा रूद्र जाले जरी। तरी एकचि श्रीहरि। १२ ।
बारा मास आणि पक्ष। व्यर्थ जाती दे तूं लक्ष। १३ ।
तेरा गुणांचे तांबूल। समर्पावें पूगीफळ। १४ ।
चौदा भुवनें ज्याचे पोटीं। त्याचें नाम धरा कंठीं। १५ ।
पंधरा दिवसां एकादशी। करा जागर उपवासी। १६ ।
षोडश उपचारें पूजा। भावें भजा गरूडध्वजा। १७ ।
सत्रावी जीवनकळा। तिचा घे कां रे सोहळा। १८ ।
अठरा पुराणें वाणिती। निरंतर कृष्ण कीर्ति। १९ ।
म्हणे विष्णुदास नामा। शरण जावें पुरूषोत्तमा। २० ।

१४३८. हरिनामीं उदास तो पतित निष्ठुर । तया यमकिंकर गांजितील । १ ।
तोचि हरिचा दासु नामीं ज्या विश्वासु । तया गर्भवासु नाहीं नाहीं । २ ।
मार्ग सांडोनियां आडमार्गें जाती । ते व्याघ्रा वरपडे होती क्षणामाजी । ३ ।
नामा म्हणे जिहीं नामीं आळस केला । तो येवोनि गेला व्यर्थ एक । ४ ।

१४३९. नाहीं निजा फळे कष्टविसी संता । किती येरझारा कल्पकोटी । १ ।
विठ्ठलाचे नामीं दृढ धरीं भाव । येर सांडीं वाव मृगजळ । २ ।
भुक्ति मुक्ति सिद्धी जोडोनियां कर । करिती निरंतर वोळगण । ३ ।
नामा म्हणे मना मानी पैं विश्वास । मग तुज गर्भवास नव्हे नव्हे । ४ ।

१४४०. सांडीं सांडीं मना विषयाचा चाळ । विठ्ठल विठ्ठल मोहरा बोळंगे वेगीं । १ ।
होईल तुझें हित होसिल पूर्ण भरित । सर्वांभूतीं हित हेंचि दया । २ ।
बोळंगे विठ्ठलरूपा मार्ग हाचि सोपा । विषयाच्या खेपा तुटतील । ३ ।
नामा म्हणे केवळ आम्हां नित्य काळ । दिननिशीं पळ विठ्ठल देव । ४ ।

१४४१. व्यर्थ कां हव्यास करिसी परोपरी । नाम निरंतरी न म्हणा कां रे । १ ।
आयुष्य जाईल क्षणांत सरोन । पावसी पतन कुंभिपाकीं । २ ।
नाम संकीर्तन नाइके स्वभावें । प्रत्यक्ष तें शव जगामाजी । ३ ।
नामा म्हणे ऐसे गेले बहुतेक । सांगे सकळिकां हेंचि आतां । ४ ।

१४४२. मूषक हव्यासें चालूनि भ्रमांतें । मांजर तयातें टपतसे । १ ।
ऐसा तुज काळ टपे वेळोवेळां । वेगीं त्या गोपाळा शरण जाई । २ ।
भानुचेनि मापें आयुष्य जें चळे । ओसरे अवचितां डोळे झांकी । ३ ।
नामा म्हणे का रे निश्चिंती हे मूढा । हरी नाम गोडा सेवीसीना । ४ ।

१४४३. पवित्र आणि पारिकर । उभविलें मंदिर ।
दीपेंविण मनोहर । शोभा न पवे । १ ।
श्यामअंगीं तरुणी । सुंदर होय रमणी ।
पुरुषावीण कामिनी । शोभा न पवे । २ ।

द्रव्येंवीण नर । जरी जाहला सुंदर ।
तो त्याविण चतुर । शोभा न पवे । ३ ।
योगिया आणि कठीण । इंद्रिया नाहीं दमन ।
षट्कर्मेवीण ब्राह्मण । शोभा न पवे । ४ ।
नामा म्हणे सुंदरा । रखुमादेवीवरा ।
तुजवीण दातारा । शोभा न पवे । ५ ।

१४४४. न फिटे हें ओझें मायेचा गुंडाळा । एका तूं गोपाळा शरण जाई । १ ।
तुटेल बिरडें सुटेल हा मोह । केशवींच भाव असो देणें । २ ।
कईंचे हे क्लेश उदासीन वांयां । भजन यादवराया हेंचि सत्य । ३ ।
नामा म्हणे सुफळ भजनचि करीं । सर्वांभूतीं हरि भजनभावो । ४ ।

१४४५. कल्मष हरती नामें जयाचेनि । तें विसरोनि काय करावें । १ ।
संसारतारक विसांवा हरि । गर्भवास मुरारी चुकवी तो । २ ।
बाह्या उभारोनि घेतां राम नामा । नामा म्हणे होसी केशव परमात्मा । ३ ।

१४४६. देवो देवी बोले तूं जीवन भातें । मेहुडें दुभतें जना यया । १ ।
तैसें मनी करा भजनभाव धरा । विषयपसारा टाका वेगीं । २ ।
उपावो न लगे दया ते धरावी । आपुली म्हणावी माय जगीं । ३ ।
नामा म्हणे बाप विठ्ठल तो आमुचा । कुळदेव साचा पुरातन । ४ ।

१४४७. स्वप्नींचिया परी देखिलें अभ्यास । न धरीच विश्वास चित्त तुझें । १ ।
वांझेचिया स्तनीं अमृताची धणी । मृगजळ पाणी तान्हा बोले । २ ।
तरी प्रेमावीण फळती क्रियाकर्म । हातां येतीं वर्मे विठोबाची । ३ ।
दृष्टीतें देखणें श्रवणीं ऐकणें । मनाचें बैसणें एक होय । ४ ।
नामा म्हणे तरीच विठो येऊन भेटे । काया पालटे कैवल्य होय । ५ ।

१४४८. गौळियाचे घरीं कैवल्याचे दानी । परब्रह्म अंगणी क्रीडतसे । १ ।
ऐसें कांही करा आलेनो संसारा । जेणें जोडे सोईरा पांडुरंग । २ ।

करितां त्याचें काज मनीं न धरी लाज। म्हणे हे शरण मज सर्वभावें। ३ ।
गमे बळिचें द्वार पाहे त्याची वाट। म्हणे हा माझा दास अंतरंगु। ४ ।
गोळियांचें उच्छिष्ट मनीं न धरि वीट। आवडी निकट गोपाळांची। ५ ।
तरीच क्रिया कर्म केलें होय सफळ। जरी हृदयीं गोपाळ येऊनि राहे। ६ ।
येरी ते मायावी जग भुलवणी। नित्य विभांडणी सर्वभावें। ७ ।
नामा म्हणे ऐसे संतांचिये सोई। विठोबाचे पायीं मन ठेवीं। ८ ।

१४४९. ब्रह्म ते ब्राह्मण श्रुतीचें वचन। सर्व नारायण सर्वांभूतीं। १ ।
चहूं शिक्षा जनीं गुरू चालू वर्ण। प्रत्यक्ष पुराणें साक्ष देती। २ ।
हेळसुनी निंदी दुरावी ब्राह्मणा। सभेमाजी जाणा दुऱ्हाविती। ३ ।
त्याचें पाप नाहीं खंडण सर्वथा। म्हणोनि अनंता भय वाटे। ४ ।
कोपला प्रहार ब्राह्मणा मारिला। लक्ष वेडावलीं भूषण त्या। ५ ।
क्रोध अग्नि ज्वाळा झगटती जेथें। न उरती तेथें काडिमात्रें। ६ ।
उगेंच ब्राह्मणा सांवें छळियेलें। सर्व शांत झाले आपोआप। ७ ।
अपेक्षिती कोणही तेंचि तें होतें। न बोलावे येथें बोल कांही। ८ ।
अग्नीसी लहान थोर न म्हणावा। पडे परिस्वाहा सर्व कांही। ९ ।
मार्कंडेय बुद्धि छळूनि ब्राह्मण। आयुष्य तें उणें होय माझें। १०।
ब्राह्मणाचें वीर्य मातंगीचे पोटीं। त्याचि एका गोष्टी आशिर्वाद। ११।
आयुष्याचे कल्प सात चौदा होती। ऐकोनि विश्रांति कीर्तनानें। १२।
धन गोत वित्त स्त्रिया आणि पुत्र। सर्व व्हावें हित ब्राह्मणातें। १३।
कुळक्षयो व्हावे ऐसें वाटे जीवा। ब्राह्मणासीं दावा नको बापा। १४।
नामा म्हणे ऐसे धन्य ते ब्राह्मण। धरिले चरण माथां त्यांचे। १५।

१४५०. भक्त विटोबाचे भोळे। त्याचे पायीं ज्ञान लोळे। १ ।
भक्तिवीण शब्दज्ञान। व्यर्थ अवघें तें जाण। २ ।
नाहीं ज्याचे चित्तीं भक्ति। जळो तयाची व्युत्पत्ति। ३ ।
नामा म्हणे ऐसें जाण। नाहीं भक्तासी बंधन। ४ ।

१४५१. पिता शिकवी पुत्रासी। नको जाऊं बापा हरिकथेसी।
तेथें पांचा तोंडांची विवशी। ते वैष्णवें आणिली आहे। १।
तिचिया गळां रूंडमाळा। अंगी स्मशानींचा उधळा।
कंठीं सर्पांचें हळाहळ। गजचर्म पांघुरलें। २।
नको जाऊं बापा तेथें। मागुता न येशी रे येथें।
जे जे पाहूं गेले तियेतें। ते आले नाहीं मागुते। ३।
चंद्र पाहों गेला तियेसी। ओढूनि बांधिला भाळेसी।
तैसा पडसी अभरंवशी। मग मुकशी संसारासी बापा। ४।
वारितां वारितां ध्रुव गेला। तो नेऊनि अढळपदीं घातला।
बळीस देशवटा दिधला। तो घातला पाताळीं। ५।
नारदा दिधली कांसवटी। हनुमान केला हिंपुटी।
रूक्मांगदाची वैकुंठीं। नगरी नेऊनि घातली। ६।
तिचें वैष्णव लहाणें। कळों नेदिती आपुलीं विंदानें।
हरिकथारंगीं नाचणें। नामकल्लोळी। ७।
तीस दहा हात अकरा डोळे। ती किती काळाची न कळे।
भयानक श्रीमुख कमळें। हातीं घेऊनि हिंडतसे। ८।
भस्म डौर त्रिशूळ हातीं। ते न वर्णवे वेदश्रुतीं।
तीसी नाहीं कुळ याती। आपपर ते कैचें। ९।
ते वेदशास्त्रां अगोचर। ती सवें असे एक ढोर।
कोठें न मिळेच बिढार। म्हणोनी स्मशांनी वसतसे। १०।
ऐसी ती थोर लांब। तिसी गांव ना शीव।
कोठेंचि न मिळे ठाव। म्हणोनि समुद्रीं वसतसे। ११।
तेथें सर्पाचें अंथरूण करी। निद्रा उदका भीतरीं।
नया वैष्णवा माझारीं। निरंतरी वर्ततसे। १२।

सांगेन ते परियेसीं । आहे ती संत महंतापाशीं ।
आणि हरिकथेसी । बैसली असे । १३ ।
म्हणवोनी विश्वासें तूं जासी । मुकसी आपल्या संसारासी ।
नामा विनवी श्रोतयांसी । हें बोलणें वेदांचें । १४ ।

१४५२. ऐसा अजारी भक्तांसी आपण । त्यागा अभिमान तुम्हीं जाणा । १ ।
जाणावें प्रत्यक्ष स्वरूप सगुण । सर्व नारायण तोचि दिसे । २ ।
दिसे गोपाळांसी गोपिकांसहित । आनंदे डुल्लत म्हणे नामा । ३ ।

१४५३. भक्तांची आवडी मोठी त्या देवासी । सद्भक्तिप्रेमासी लांचावला । १ ।
काय सांगूं आतां तयाचें कौतुक । जेथें ब्रह्मादिक स्तब्ध ठेले । २ ।
गज आणि गणिका भिल्लिणी कुंटिणी । नेल्या त्या विमानीं बैसवोनि । ३ ।
अजामीळ खळ कोळी तो वाल्मिक । तारिले अनेक एकसरां । ४ ।
धर्माचिये घरीं उच्छिष्टें काढी । जाहला बराडी देवराव । ५ ।
नामा म्हणे कांहीं मागेना तो देव । मुख्य पाहे भाव दृढ त्याचा । ६ ।

१४५४. नित्य प्रेमाचें पेटें बांधीं माझे पोटीं । उतरीं जगजेठी पैलपार । १ ।
निरेभिवरे ऐक्य तीरीं । कां पद्माळा पंढरपुरीं । २ ।
केलिया रविवारीं आंघोळी । महा दोषां होय होळी । ३ ।
पाप जाईल जन्माचे । पद पावाल अच्युताचें । ४ ।
म्हणाल बोलणें कोणाचें । नामया स्वामी केशवाचें । ५ ।

१४५५. हवा हवा म्हणताती श्रुति । परि त्या नेणती भुललीया । १ ।
ह्रिया रूपा नेणती अगा कमळापती । बाळक म्हणती गौळियाचें । २ ।
विष्णुदास नामयानें दावियेल्या खुणा । पंढरीचा राणा श्रीविठ्ठल । ३ ।

१४५६. निर्गुण सगुण नाहीं त्या आकार । होऊनि साकार तोचि ठेला । १ ।
जळीं जळगार दिसे जैसा परी । तैसा निराकारी साकार हा । २ ।

सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण। निर्गुणी सगुण ययापरी। ३।
ऐसा पूर्णपणें सहजीं सहज। सखा केशिराज प्रगटला। ४।
पांडुरंगी अंगें सर्व झालें जग। निववी सर्वांग नामा म्हणे। ५।

१४५७. आपणचों कर्ता आपणचों मित्र। आपण सर्वत्र हरी झाला। १।
साधन साधितां हरि दिसे पूर्ण। प्रपंच हें भान न देखें डोळां। २।
किमर्थ हें टवाळ मायामोह जाळ। वांयांच पाल्हाळ कोरडे करी। ३।
नामा म्हणे सखोल विठ्ठल पूर्ण बोल। उच्चारितां मोल नलगे कांही। ४।

१४५८. देख देख देख पैल पैल। उभा असे पैल विटेवरी। १।
खांळ बुंधींचा आकारू झळके पीतांबरू। सौभाग्य सुंदरू विठ्ठल देव। २।
दान दीक्षा गुरू नामया दातारू। धरावया नागरू केशिराज। ३।

१४५९. काष्टीं अग्नी असे प्रगटे नयनीं। काष्टींही असोनी वेगळाची। १।
तैसें निर्धारितां असे पैं सकळां। दावितां निराळा पांडुरंग। २।
तरू बीजीं जैसें सर्व व्यापक असे। जळाविण नसे फळ पहा कीं। ३।
नामा म्हणे बीज नासिलें तें भोग। तूंचि पांडुरंग आम्हांसाठी। ४।

१४६०. अमराचें ठेवणें विश्वाचें जीवन। सौभाग्य लावण्य रखुमाईचें। १।
धन्य गौळियां जीणें कृष्ण बाळपण। यशोदानंदन क्रीडा करी। २।
अंगें स्थूलपणे ब्रह्म खेळा येणें। लीला सामावणें रोमरंध्रीं। ३।
विष्णुदास नामा दैवेंची लाहाणें। ज्या घरीं खेळणें परब्रह्म। ४।

१४६१. काळा गे दादुला पाहतां आकळू। तो झाला गोवळू नंदाचा गे। १।
काळा गे दादुला काळा गे दादुला। पंढरीं पहा चला विठ्ठल गे। २।
काळा म्हणोनी पाहों गेलों जवळां। सुनीळू सांवळा दिसतसे। ३।
नामा म्हणे सर्व भक्षितो हा काळु। भक्तांचा कृपाळु श्रीविठ्ठल। ४।

१४६२. केशव आराध्य देवाचाही देव। पंढरीचा राव पांडुरंग। १।
पांडुरंगाविण नाही त्रिभुवनीं। भोळा चक्रपाणि वांचूनियां। २।
नामा म्हणे ध्यानीं ध्यावें विठोबासी। अखंड मानसीं भजा देवा। ३।

१४६३. उपमन्यु बाळा स्थापी क्षीरसिंधु। अनाथाचा बंधु नारायण। १।
तुझें नाम मुखीं जपे सर्वकाळ। दिधलें अढळपद त्यासी। २।
अनेक वृत्तांत काय सांगों देवा। अन्याय केशवा कोण मानी। ३।
नामा म्हणे तैसें मी नाहीं मागत। ऐकोनियां मात आलों जन्मा। ४।

१४६४. चंद्र तारांगण नैऋति भास्कर। तटस्थ निर्धार ब्रह्मादिक। १।
ब्रह्मादि सकळ भजनीं तत्पर। तेव्हां हरिहर नाचतसे। २।
कृष्ण विष्णु नाम अच्युत अनंत। सगुण निश्चित स्मरा वेगीं। ३।
नामा म्हणे नको उदंड सायास। तोडीं भवपाश रामनामें। ४।

१४६५. कां करिसी हव्यास इंद्रियांचा सोस। वांयां कासावीस कोण्या काजें। १।
सर्वहि लटिकें माया मोहबंधन। सत्य हे निधान विठ्ठल एक। २।
उगवेल प्रपंच सर्व हें आहाचें। रामकृष्ण वाचे बांध जिव्हे। ३।
नामा म्हणे करणी करावी पैं ऐसी। जेणें त्या विठ्ठलासी पाविजेसा। ४।

१४६६. धिग् तो ग्राम धिग् तो आश्रम। संत समागम नाहीं येथें। १।
धिग् ते संपत्ति धिग् ते संतति। भजन सर्वांभूती नाहीं जेथें। २।
धिग् तो आचार धिग् तो विचार। वाचे सर्वेश्वर नाहीं जेथें। ३।
धिग् तो वक्ता धिग् तो श्रोता। पांडुरंग कथा नाहीं जेथें। ४।
धिग् तें गाणें धिग् तें पढणें। विठ्ठल नाम नाणे नाहीं जेथें। ५।
नामा म्हणे धिग् धिग् त्यांचें जिणें। एका नारायणें वांचूनियां। ६।

१४६७. अभ्यासिले वेद झाला शास्त्रबोध। साधिल्या विविध नाना कळा। १।
प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं। तंव कैसा श्रीहरि करील कृपा। २।
हित तें आचारा हित तें विचारा। नामीं भाव धरा जाणतेनो। ३।

प्रसंगीं पुराणें ऐकिलीं श्रवणीं । त्यांतील कोण मनीं धरील अर्थ । ४ ।
काय तें मांडिलें काय तें मांडिलें । काय तें दंडिलें प्रवृत्तीसी । ५ ।
अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं । त्यांतील कोण ध्यानीं प्रतिबिंबली । ६ ।
स्वप्नींचिया परी देखरी अभ्यास । न धरीच विश्वास चित्त तुझें । ७ ।
वांझेचिये स्तनीं अमृताची धणी । मृगजळ पाणी तहानाबोलें । ८ ।
तरी प्रेमेंविण कळती क्रियाकर्मे । हातीं येतीं वर्मे विठोबाची । ९ ।
दृष्टीचें देखणें श्रवणींचे ऐकणे । मनाचें बैसणें एक होय । १० ।
नामा म्हणे तरी विठो येऊनि भेटे । कायाच पालटे कैवल्य होय । ११ ।

१४६८. नित्य सर्वगत अखंड सगुण । केशवाचे ध्यान करी ब्रह्मा । १ ।
ब्रह्मा सर्वकाळ सांगे साधूपासीं । आणिक हें शेषी तेंचि मानी । २ ।
मनीं जो मानसी नामामृत सार । सेविती सादर नामा म्हणे । ३ ।

१४६९. रकार मकार बांधी कारे तुळी । तापत्रय होळी होऊनि जाय । १ ।
गोविंद मुकुंद हरि परमानंद । केशव छंद नित्य वाचे । २ ।
जपे जगद्बंधु हरिकथा छंदु । विघडे भवबंधु येणें मात्रें । ३ ।
नामा म्हणे केशव न करी निर्वाण । माझा अभिमान आहे त्यासी । ४ ।

१४७०. न लगती कथा व्युत्पत्ति उलथा । वाउग्या चळथा ग्रंथांचिया । १ ।
हरि हरि भजन जनीं जनार्दन । सर्वत्रीं समान भूतदया । २ ।
भावेंचि भजावें हरीतें पुजावें । नित्य हें सेवावें रामनाम । ३ ।
नामा म्हणे गोड नको तें हे वाड । विठ्ठलाचे वेड इतुकें पुरे । ४ ।

१४७१. मंत्रांचा पै मंत्र हरी हरी उच्चार । न लगे तो विचार करणें कांहीं । १ ।
सुफळ नाम गाढें वाचेसी उच्चारूं । केशव हाचि करूं सर्वांभूतीं । २ ।
नाहीं यासी पतन न होईल बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामें । ३ ।
नामा म्हणे भाव सर्वांभूतीं करा । आणिक पसारा घालूं नका । ४ ।

१४७२. नाचतां उडतां उडतां पडतां। नामया अवचितां हातां आला। १ ।
येतां जातां हरि हरि वाटे । नाम तें चोखटें स्मरा मुखीं । २ ।
हांसतां खेळतां घरीं दारीं पारीं। मुखीं हरि हरि म्हणं कां रे। ३ ।
खातां जेवितां अन्नतृप्ति सारी। सांडी सांडी हरि सर्वकाळ। ४ ।
नामा म्हणे नामीं आस्ति नास्ति ठसा। केशव हरि सन्मुख तुम्हा दिसे। ५ ।

१४७३. हरिविण देह मळीण सर्वथा। मंगळाची कथा रामकृष्ण। १ ।
कथा करी कोणी ऐकती जे जन। वैकुंठ भवन हातां आलें। २ ।
वेदशास्त्रां सार नामाचा उच्चार। अंतीं पैल पार पाववितो। ३ ।
जन्मोनियां जगीं अलिप्त असावें। नाम तें स्मरावें म्हणे नामा। ४ ।

१४७४. आतां आहे नाहीं पहातां क्षण एक। संपत्तीचें सुख विषय हा। १ ।
हित तें आचरा हित तें विचारा। नामीं भाव धरा जाणतेनो। २ ।
संपत्तीच्या बळें एक झाले आंधळे। वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं। ३ ।
एक विद्यावंत जातीच्या अभिमाने। नेलें तमोगुणें रसातळा। ४ ।
मिथ्या मोह करोनि हव्यास। वेंचिलें आयुष्य वांयांविण। ५ ।
नामा म्हणे कृपा करुनि ऐशा जीवा। सोडवीं केशवा मायबापा। ६ ।

१४७५. आम्ही विठोबाचें दूत। यम आणूं शरणागत। १ ।
मुखे नाम हातें टाळी। महापापा करूं होळी। २ ।
करूं हरिनामाचा घोष। कुंभपाक पाडूं वोस। ३ ।
करूं हरीकथा कीर्तन। तोडूं यमाचें बंधन। ४ ।
एवढा प्रताप नामाचा। रीघ नव्हे कळीकाळाचा। ५ ।
ऐसा नामा यशवंत। विठोबाचा शरणागत। ६ ।

१४७६. ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म। गवसे परब्रह्म नामें एका। १ ।
लहान थोरांसी करितों प्रार्थना। दृढ नारायणा मनीं धरा। २ ।
सर्वांप्रति माझी हेचि पैं विनंती। आठवा श्रीपति आपुले मनीं। ३ ।

केशव नारायण करावें आचमन। तेंचि संध्या स्नान कर्म तया। ४ ।
नामा म्हणे हेंचि करा नित्य भजन। ब्रह्मार्पण साधन याचे पायीं। ५ ।

१४७७. ब्राह्मण व शूद्र वैश्य नारीनर। सर्वांसी आधार नाम सत्य। १ ।
नामाविण गति नाहीं हो आणीक। वैकुंठनायक बोले मुखें। २ ।
परी तेंचि नाम पाहावें शोधुनी। चौऱ्यांशी खाणी चुके तेव्हां। ३ ।
नामदेव म्हणे सद्गुरूपासोनी। नाम घ्या शोधुनि भावयुक्त। ४ ।

१४७८. सदाशिवापुढें कोण अनुष्ठानी। अष्टांग लावूनि नमस्कारी। १ ।
नाम यज्ञ जप ऋषेवर घ्याती। शीतळ ते होती काळकुट। २ ।
सर्वांमाजी श्रेष्ठ नाम कलियुगीं। रामकृष्ण जगीं नामनौका। ३ ।
नामा म्हणे नाम अखंडित स्मरा। पांडुरंग धरा भजा वेगीं। ४ ।

१४७९. ब्रह्मांडनायक विश्वाचा गोसावी। तो केला पांडवीं म्हणियारा। १ ।
भावाचा लंपट भक्तां पराधीन। सोडोनी अभिमान दास्य करी। २ ।
भाजीचिया पाना संतोषला हरी। जयाचे उदरीं चौदा भुवनें। ३ ।
जनक श्रुतिदेवें धरियेला करीं। दोघांचिये घरीं घेतो पूजा। ४ ।
पुंडलिकें बैसों टाकियेली वीट। तथेंचि वैकुंठ वसविलें। ५ ।
नामा म्हणे तुम्ही विठ्ठलचि धरा। चरणीं तुम्हां थारा देईल देखा। ६ ।

१४८०. येऊनि संसारा। हित वेगीं विचारा। १ ।
स्मरा हृषिकेशी। तो नेईल परलोकासी। २ ।
गणिका नाम उच्चारी वाचे। जन्ममरण चुकलें तिचें। ३ ।
अजामेळ पापराशी। नामें पावला मोक्षासी। ४ ।
दूध मागों गेलें लेंकरूं। तया दिधला क्षीरसागरू। ५ ।
सापत्नी धुरू दवडिला। तो अढळपदीं बैसविला। ६ ।
गजेंद्र स्मरत तांतडी। त्याची चुकविलीं सांकडीं। ७ ।
नामा म्हणे नामबळें। उद्धरती कोटी कुळें। ८ ।

१४८१. कुटिल कुबुद्धि कुपात्र कठोरी । अंगिकारी हरि अश्वत्थामा । १ ।
अश्वत्थामा अंबऋषि दुर्योधन । शेवटी अर्जुन हितकारी । २ ।
मानी भावभक्ति आश्चर्य सकळ । शंकर शीतळ होय नामें । ३ ।
नामा म्हणे आधीं नाममंत्र चोखा । नाहीं भय धोका किमपिही । ४ ।

१४८२. नाम न म्हणे आवडी । व्यर्थ वाचे बडबडी । १ ।
जिव्हा नव्हे ती वाचक । भोगीं आळसें नरक । २ ।
करी आरालिया निंदा । परी न म्हणे गोविंदा । ३ ।
असत्या आवडी । सदा वाचेसी रोकडी । ४ ।
निंदेवांचुनि पातक । सत्य जाणा माझी भाक । ५ ।
गर्जे नामाचे पवाडे । पायां कळिकाळ पडे । ६ ।
निज सहज चैतन्य । नामा म्हणे नाम जाण । ७ ।

१४८३. केशव म्हणतां क्लेश जातांती पैं । त्याहुनि सरतें आणिक नाहीं । १ ।
वेद कां पढसी शास्त्रें कां शिणसी । उदंड वाचेसी हरी म्हणा । २ ।
याहूनि पैं सार नाहीं हो दुसरें । भीष्में युद्धिष्ठीर उपदेशिला । ३ ।
नामा म्हणे धरा केशवीं विश्वास । तुटे गर्भवास नामें एके । ४ ।

१४८४. शेतीं बीज नेतां थोडें । मोटें आणिताती गाडे । १ ।
एक्या नामें हरि जोडे । फिटे जन्माचे सांकडें । २ ।
झाले भोळे जन । सर्व तरती कीर्तनें । ३ ।
नामा म्हणे नेणें मूढे । नाम स्मरावें सावडें । ४ ।

१४८५. तुझें तुज सांकडें पडलें थोर कोडें । तें करी माझीवडे ब्रह्मार्पण । १ ।
म्हा हरी घ्याई मन ठेवीं ठायीं । विठ्ठलाच्या पायीं दिननिशीं । २ ।
अनुभव रहणी विठ्ठल निशाणी । घडेल पर्वणी नित्यकाळ । ३ ।
नामा म्हणे सुघड मन करीं वाड । इंद्रियांची चाड धरूं नको । ४ ।

१४८६. सर्वाभूतीं भजन हेंचि पैं चोखडें । ब्रह्म माजीवडें करोनि घेई । १ ।
सफळ सर्वदा जप हा गोविंदा । न पावाल आपदा नाना योनी । २ ।
नाम संजीवनी अमृतसरिता । परिपूर्ण भरिता सिंधु ऐसा । ३ ।
नामा म्हणे चोखडें नाम हेंचि गाढें । चुकवील कोडें जन्ममरण । ४ ।

१४८७. निगुण सगुण ऊर्मी तूं या होमीं । नाम हृषिकेशी घालीं मुखीं । १ ।
गोविंद हरे कृष्ण विष्णु हरे । अच्युत मुरारे जनार्दन । २ ।
करीतां नामपाठ चुकती भवजाळ । तुटेल ते जाळे माया मोह । ३ ।
नामा म्हणे ऐसा उपाव सुगम । दिननिशीं नेम राम म्हणें । ४ ।

१४८८. केशवाचें प्रताप गोसावी हासे । दास्यत्व करोनि सर्वस्व पोशी । १ ।
अर्जुनाचा सारथी बळीचा सांगाती । द्रौपदीच्या आकांतीं धांवोनि पावे । २ ।
चातका जलधरू मच्छा जीवन नीरू । प्रल्हादा कैवारू दास म्हणोनि । ३ ।
नामा म्हणे तुम्ही न करा आळसु । नाममंत्र दिवसु अभ्यासिजे । ४ ।

१४८९. पांडुरंग प्राप्त होईल सकळ । चरणकमळ ध्यारे मनीं । १ ।
मनीं मानसिक न करावा कधीं । नाम घ्यारे आधीं केशवाचें । २ ।
केशवाचें नाम पावन पवित्र । महाभाष्यसूत्र हेंचि सांगे । ३ ।
नामा म्हणे तुम्ही करावें कीर्तन । पंढरीचे ध्यान चुकों नका । ४ ।

१४९०. केशवासी पाहे केशवासी ध्याये । केशवासी गाये सर्वकाळ । १ ।
केशव हाचि वृत्तिसह मन । केशवासी ध्यान सर्वकाळ । २ ।
सबाह्य अंतरीं सांडिना कोणासी । जाणों अंतरासी साक्षभूत । ३ ।
नामा म्हणे तुम्ही केशव होउनि । पंढरी पाटणीं नांदा बापा । ४ ।

१४९१. वेदांचें महिमान जनीं जनार्दन । आणिक वचन तेथें नाहीं । १ ।
भूतदया धरा भक्तिभावें करा । भजन हरिहरां वेद सांगे । २ ।
सर्व हेंचि सार ब्रह्ममय खरें । आणिक दुसरें न दिसे आम्हां । ३ ।
नामा म्हणे समर्थ वेद तो आमुचा । सांगे नित्य जपा रामकृष्ण । ४ ।

१४९२. साधन साधितां होताती आपदा । ह्मणोनी गोविंदा स्मरें कारें । १ ।
कृष्णकथा सार सांगे कां सधर । तुटेल येरझार जन्ममरणा । २ ।
निष्फळ निखळ भावी तूं सफळ । भजन केवळ सर्वांभूतीं । ३ ।
नामा म्हणे भक्ति होईल विरक्ति । तुटेल यातायाती जन्ममरण । ४ ।

१४९३. भवसिंधुचा पार तरे तो पोहणार । वळिया परमधीर धन्य तोची । १ ।
नामाची सांगडी लावूनि अभ्यास । हृदयीं प्रेमरस वोसंडती । २ ।
सत्वाचा सुभट असंग एकट । वैराग्य उद्‌भट निर्वासन । ३ ।
कामक्रोध जेणें घातले तोडरी । निर्दाळिले वैरी लोभदंभ । ४ ।
रजतमाचे जेणें तोडीले अंकुर । केला अहंकार देशधडी । ५ ।
नामा म्हणे जया नामीं अनुसंधान । तोचि परमधन्य त्रिभुवनीं । ६ ।

१४९४. नाहीं भक्ती नामीं तो वांझ मानवी । तोचि जाणा लोकीं दुष्टनष्ट । १ ।
प्रपंची कुकर्मी गढोनियां ठेले । न निघती बोलें संतांचिया । २ ।
काढितां त्या वाटे प्रपंच्याचें दुःख । विषयाचें सुख हर्ष बहू । ३ ।
पुत्र वित्त कांता मानी भरवंसा । पडे मोहफांसा जन्मवरी । ४ ।
नामदेव म्हणे अंतीं आहे कोण । कळा नामाविण नानापरी । ५ ।

१४९५. तुटे मायाजाळ वियडें भवसिंधु । जरी लागे छंद हरिनामाचा । १ ।
येर कर्मधर्म करितां या कळीं । माजी कोण बळी तरला सांगा । २ ।
न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा । ३ ।
नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्णकथा । ४ ।
न साधे हा योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें । ५ ।
नामा म्हणे साधन न लगे आणिक । दिधली मज भाक पांडुरंगें । ६ ।

१४९६. आलिया संसारीं आत्माराम मुखीं । घेतलिया सुखी त्रिभुवनीं । १ ।
जपोनियां नाम आपुलेंचि आधीं । मग सोहंसिद्धि सर्व साधे । २ ।
सर्व हरी मग नाहीं दुजा भाव । प्रपंचिक गर्व दिसेचिना । ३ ।
नामदेव म्हणे सर्वदा साधनें । भरे जन वन परब्रह्में । ४ ।

१४९७. व्यापक तें नाम तेव्हांच होईल। जेव्हां ओळखेल मीपणासी। १ ।
आपुलेंचि नाम न ओळखिलें। व्यापक साधिलें जायेचिना। २ ।
आपुलीच ओळख आपणासी पडे। मग सर्वत्र जोडे नाम तेव्हां। ३ ।
नामाविण नाम तेंचि होय विभ्रम। नामदेव म्हणे संतां पुसा। ४ ।

१४९८. आसनीं शयनीं जपतां चक्रपाणी। लाविली निशाणी वैकुंठीची। १ ।
कैंचें बंधन आह्मां जीवन्मुक्तां। गाणी गुण गातां विठोबाचे। २ ।
भवसिंधूची जिव्हां झाली पायवाट। जे गर्जती उद्भट नामघोष। ३ ।
प्रेमें वोथरत नामें पिटू टाळी। नाम हृदयकमळीं विठोबाचें। ४ ।
नाहीं काया क्लेश न करीं सायास। दृढ धरीं विश्वास हरिनामीं। ५ ।
नामा म्हणे साधन न लगे अनेक। दिली मज भाक पांडुरंगे। ६ ।

१४९९. विठोबाचे पाय जन्मोनी जोडावे। संबंधी तोडावे कामक्रोध। १ ।
ऐक्य सुख घ्यावें एकविध भावें। प्रेम न संडावे आवडीचे। २ ।
अनंत जन्मा यावें ऐसें भाग्य व्हावें। एक वेळां जावें पंढरीसी। ३ ।
वृत्तिसहित मन पायींच ठेवावें। अद्वैत भोगावें प्रेमसुख। ४ ।
देहीं देहभाव प्रकृति दंडावे। सांडणें सांडावे ओंवाळुनी। ५ ।
नामा म्हणे ऐसें घेतलें माझ्या जिवें। विठोबा पुरवावें आर्त माझें। ६ ।

१५००. तुझाचि अहंकार तुजचि नाडील। मागुता मांडील संसारु हा। १ ।
सांडीं सांडीं मोहो विषय टवाळ। वाचेसी गोपाळ उच्चारीं रे। २ ।
सर्व हें धुरेर मायेचें घरकुलें। अहंकारें नाथिलें नाना योनी। ३ ।
नामा म्हणे भजन हरीचें करी। नित्य ते सेवी चरणरज। ४ ।

१५०१. मुक्तिप्रद आहे एक विठ्ठल नाम। आतां क्रियाकर्म कवणालागीं। १ ।
राहें राहें राहें तूं मना निवांत। घ्याईं अखंडित नारायणा। २ ।
संत समागम साधीं हें साधन। पावसी निर्वाण नित्य सुख। ३ ।
नामा म्हणे भज श्रीगुरूच्या पायीं। तरी वर्म ठायीं पडेल जाण। ४ ।

१५०२. करितां वेदाध्ययन ज्योतिष। नामाचा तो लेश नये हाता । १
बहुत व्युत्पत्ति सांगति पुराण । व्यर्थ तें स्मरण नाम नव्हे। २
अनंत हे नाम जयांतूनि आलें। त्यांतचि विरालें जळीं जळ । ३
तें नाम सद्‌गुरुकृपेविण कोणा । साधन साधेना जपें तपें । ४
नामदेव म्हणे स्वतः सिद्ध नाम । गुरूविण वर्म हातां न ये । ५

१५०३. ज्ञान ध्यान जप तप साधन। तें प्रत्ययातें नाम नये कोणा। १
गुरूपदीं जावें आधीं हो शरण । मी हें माझें ओळखून घ्यावें नाम। २
तयाचें तें मूळ पाहोनियां त्यांतें। मिळवावें द्वैत अद्वैतीतें। ३
द्वैत द्वैतातीत तें स्वयंभू संचलें। तेंचि नाम आलें त्रिभुवनीं। ४
नामदेव म्हणे परब्रह्म तें नाम । द्वैत क्रियाकर्म नाहीं तेथें। ५

१५०४. सद्‌गुरूवांचूनि नाम नये हातां । साधन साधितां कोटीगुणें। १
जैसा कांतेविण करणे संसार । तैसा हा व्यापार साधनाचा । २
जंव सद्‌गुरू नाहीं केला भ्रतार । साधन विचार व्यर्थ गेला। ३
नामदेव म्हणे सद्‌गुरूपासोनी । नाम घ्या जाणोनी नाना कांहीं । ४

१५०५. वैष्णवांमाजीं एक बळी। पृथु झाला दुजा महीतळीं।
हरि नांदे प्रल्हादाजवळी। नारदें वनमाळी दान घेतला । १
बिभिषणें पूजिला लंके हरी । भीष्में देखिला द्वारकेभितरीं ।
अर्जुनें केला साहकारी। सारथि हरि पांडवांचा। २
उद्धवें तप केलें समर्थ। अक्रूर नित्य वंदनार्थ।
गाई गोपिका गोपाळांत। तो स्तन पीत यशोदेचे । ३
नंदा वसुदेवा लाधलें। बळिदेवें ऐसेंचि पुण्य केलें।
उग्रसेनें तप साधिलें। रत्न साधिलें रूक्मिणीनें। ४
गरूड हनुमंत शेषादिक। नित्य झाले हरीचे सेवक ।
चरणींच्या उदका शिवादिक । नित्य मस्तक खालाविती। ५

ऐसा दुर्लभ हरिराजा। वर्णितां होती चतुर्भुजा।
जड जिवां तारिल केशव माझा। उभारोनि भुजा सांगे नामा। ६।

१५०६. सदा विचरता जनीं वनीं गनीं। मुखीं चक्रपाणी जपतसे। १।
विरक्ताची मात असे कोण्या गुणें। नामाचें चिंतन योगिराज। २।
तेव्हां योगियासी कीर्तनाचे ध्यास। मुक्ती चारी त्यास हात जोडी। ३।
पंढरीस उभा राहे पांडुरंग। तीर्थ चंद्रभागा नामा म्हणे। ४।

१५०७. गौतम वसिष्ठ आणि विश्वामित्र। भारद्वाज अत्रि कश्यपादि। १।
बळि हनुमंत बिभिषण नळ। दुष्ट अजामिळ वाल्हा श्रेष्ठ। २।
उद्धव अर्जुन अंगद अगस्ति। सर्वांभूती भक्तिभाव ऐक्य। ३।
नामा म्हणे सदा साधुसंत जन। जनीं जनार्दन आह्मां एक। ४।

१५०८. पत्रावळी काढी वैकुंठनायक। धांवुनियां शुक आला तेथें। १।
दाटी पाहुनि द्वारीं मानसीं विचारी। जावया भीतरी काय काज। २।
हा वाहे प्रसाद स्वहस्तें अनंत। वेंचोनियां शीत घाली मुखीं। ३।
घंटानाद वाजे लक्ष द्विजपंक्ती। अक्षयी वाजती वेळोवेळां। ४।
ऐकोनि विस्मित ऋषिसमुदाव। पुसे धर्मराव देवाजीसी। ५।
सांगतसे खूण वैकुंठनायक। ब्रह्मनिष्ठ एक आला येथें। ६।
तेथुनि उठले धर्म नारायण। बाहेर येऊन पाहताती। ७।
शुकाचिया मिषें व्यासाचा नंदन। सांगतसे खूण जगदीश। ८।
धरोनियां करीं नेला तो भीतरीं। नामा म्हणे करी पूजा त्याची। ९।

१५०९. नामाची आवडी तोचि जाणा देव। न धरा संदेह मनामाजी। १।
ऐसें मी हें नाहीं बोलत नेणता। आणूनि संमता संतांचिया। २।
नामा म्हणे तया आणिक साधन। ऐसें हें वचन बोलों नये। ३।

१५१०. पळघडी आयुष्य हातोंहातीं गेलें। आंगीं आदळलें मरण तुज। १।
आझुनी का निदसुरा दैवहत मना। आपुली सुचना न करिसी। २।

का रे तुज भ्रांती पडलिसे मूढा । वेढिले चहूकडा काळसेने । ३ ।
नाना रोगें तुझी काया निरोधिली । नरकें भरली नवही द्वारें । ४ ।
शालीली पोसीली म्हणसी माझी सखी । तुज नी पारखी होती जाण । ५ ।
नामा म्हणे शरण रिघे रिघे तया । आठवी त्या पाया विठोबाच्या । ६ ।

१५११. संसाग वेऊनि काय पुण्य केलें । बाळपण गेलें वायांवीण । १ ।
तरुणपणी हा नाठवे श्रीहरि । वृद्धपणी सेवा कैसी हो करी । २ ।
परि हा नरजन्म गेला असे वायां । पंढरीच्या राया नोळखता । ३ ।
आलो मी संसारी गुंतलो व्यापारी । अझूनि कां श्रीहरि नोळखसी । ४ ।
सहस्र अपराध जरी म्यां रे केले । तारी वो विठ्ठले म्हणे नामा । ५ ।

१५१२. वर्गवर्गे बोलती श्रुतिचिया मती । पाविजे ते गति वेगळी असे । १ ।
तुज न पविजे शब्द ब्रह्मज्ञान । पाविजे ते वर्म वेगळे असे । धृ० ।
जाणीव खटपट बोलती सैराट । पाविजे ती वाट वेगळी असे । २ ।
एक ते तर्कीचे चकोरची वक्ते । जे शास्त्र समजाविते लोकाचारी । ३ ।
एक चतुर वक्ते वित्पन्न श्रोते । ते संत रंजविते लोकामाजी । ४ ।
नामा म्हणे जी हीं तुज जाणितले । त्यासीच फावले भक्तिसुख । ५ ।

## मनास उपदेश

१५१३. अं अलगटा माझिया तूं मना । किती रानोराना हिंडविसी । १ ।
विठोबाचे पायीं दृढ घाली मिठी । कां होसी हिंपुटी वायांविण । २ ।
क्रिया कर्म धर्म तुज काय चाड । जवळी असतां गोड प्रेमसुख । ३ ।
संकल्प विकल्प सांडी तूं समूळ । राहे रे निश्चळ क्षणभरी । ४ ।
आपुलें निजहित जाण तूं त्वरित । वासनारहित होई वेगीं । ५ ।
नामा म्हणे मज पहिलेंच कळतें । सोसणें न लागतें गर्भवास । ६ ।

१५१४. अं मना यातना सोसिल्या बहुवसा । येतां गर्भवासा वेळोवेळां । १ ।
विठोबाचें नाहीं घडलें भजन । भोगिले दारुण गर्भवास । २ ।

आतां तरि हित विचारी आपुलें । जंव आहे लाधलें मनुष्य देह । ३ ।
मागीलहि जन्म गेले पैं अनंत । नव्हेचि पैं तेथें ज्ञान भक्ति । ४ ।
म्हणउनी भक्तिप्रेम जो अंतरला । तो येई आपुला साधोनियां । ५ ।
कृपा तुवां दीनानाथा पंढरिराया । दिधलें इंद्रिया भजनालागीं । ६ ।
नयनीं पाहे मूर्ति जिव्हे त्रणीं कीर्ति । संतांच्या संगतीं निरंतर । ७ ।
तुळसीची माळ मकरंद घेऊनि । जावें लोटांगणीं देवद्वारीं । ८ ।
इतुकें करितां न लगति सायास । इणीं करिसी उदास सीणवणी । ९ ।
नामा म्हणे आतां येतों काकुलती । सांडि हे संगती वासनेची । १० ।

१५१५. दाही दिशा मना धांवसी तूं सैरा । न चुकती येरझारा कल्पकोटी । १ ।
विठोबाचे नामीं दृढ धरीं भाव । येर सांडीं वाव मृगजळ । २ ।
भुक्तिमुक्ति सिद्धि जोडोनियां कर । करिति निरंतर वोळगणें । ३ ।
नामा म्हणे मना धरीं तूं विश्वास । मग गर्भवास नव्हे तुज । ४ ।

१५१६. हें गे आयुष्य हातोहातीं गेलें । आंगीं आदळलें जन्ममरण । १ ।
कां रे निदसुरा दैवहत मना । आपुली सूचना न करिसी । २ ।
कां रे तुज भ्रांति पडलीसे मूढा । वेढी चहूंकडा काळ सैन्य । ३ ।
नानारोगें तुझी काया वेधियेली । नरकाचीं भरलीं नवही द्वारें । ४ ।
पाळिलीं पोशिलीं आप्त माझीं सखीं । अंतीं तुज पारखी होती जाण । ५ ।
नामा म्हणे तुज येतों लोटांगण । तारील नारायण भरवशानें । ६ ।

१५१७. उत्कंठित तप एक विठ्ठल नाम । आतां क्रियाकर्म कोणालागीं । १ ।
राहें रे तूं मना राहें रे निवांत । ध्यायीं अखंडित नारायण । २ ।
संतसमागमें साधीं हें साधन । पावसी निर्वाण नित्य सुख । ३ ।
नामा म्हणे तूं सहज सुखरूप । होऊनि निर्विकल्प विचारी पां । ४ ।

१५१८. क्षण एक मना बैसोनि एकांतीं । विचारीं विश्रांति कोठें आहे । १ ।
लक्षचौऱ्यांशींच्या करितां येरझारा । शिणलासि गव्हारा वेळोवेळां । २ ।

अझूनि तुज लाज न वाटे पैं कैसी। नरकाचे द्वारांसि जावें किती। ३ ।
दुर्लभ आयुष्य मनुष्य देहिचें। जातसे मोलाचें वांयांवीण । ४ ।
खापराचे साठीं सांडिला परिस। गहिंवरें फुटतसे हृदय माझें । ५ ।
पुत्रकलत्रादिक सुखाचीं सोयरीं । त्यांची ममता थोरी धरिली तुवां। ६ ।
अनुदिनीं पाळितां अनुभवेंचि पाहें। कोण सुख आहे तयाजवळीं। ७ ।
जगाचा जीवलग मायबाप आपुला। तो तुवां दुराविला केशिराज । ८ ।
स्वप्नींचिया धना लुब्धलासि काय। आलें काळभय हांकित तुज । ९ ।
संतापाचें सदन शोकाचे पुतळे। ते त्वा मानियले हितकारी ।१०।
कैची सुख निद्रा इंगळाचे शेजे । प्रत्यया आणूनि तुझें तूंचि पाहीं ।११।
तुज राखेल कोण येवढिये संकटीं । रिघसी ज्याचे पोटीं मरणाभेणें ।१२।
आदिमध्यअवसानीं सोडविल निर्वाणीं । तया चक्रपाणि सेविं वेगीं ।१३।
जो जो क्षण लाविसी हरिभजनाकडे। तो तो गांठीं पडे सार्थकीं रे ।१४।
नामा म्हणे तुजचि येतों काकुळती । सोडिरे संगती वासनेची ।१५।

१५११. वासनेची करणी ऐकें तूं मना । या केली रचना ब्रह्मांडाची। १ ।
निर्गुण चैतन्य सदा सुखरासी। त्या दिली चौऱ्यांशीं लक्ष सोंगें। २ ।
ऐसी हे लाघवी खेळे नाना खेळ । तेथें तूं दुर्बळ काय करिसी । ३ ।
क्षण एक चंचळ क्षण एक निश्चळ । क्षण एक विफळ सावध करी । ४ ।
क्षण एक कृपाळ क्षण एक निष्ठुर। क्षण एक उदार कृपण करी। ५ ।
क्षण एक सात्विक क्षण एक राजस । क्षण एक तामस करोनि सांडीं। ६ ।
क्षण एक प्रवृत्ति क्षण एक निवृत्ति। क्षण एक विश्रांति तप्त करी। ७ ।
क्षण एक आवडे क्षण एक नावडे । क्षण एक विघडे घडलें सुख। ८ ।
ऐसी हे लाघवी पाहतां क्षणभंगुर। ब्रह्मादि हरिहर ठकिले जेणें । ९ ।
नामा म्हणे तरीच इचा संग तुटे । दैवयोगें भेटे संतसंग ।१०।

१५२०. वेदीं तोचि शास्त्रीं सर्वांठायीं तोचि। पुराणांत तोचि अंत:करणीं। १ ।
नाम सदा ध्यावीं नाम सदा ध्यावीं। रामनाम ध्यावीं अरे मना। २ ।
नामा म्हणे देह नाहीं पुनरूपें। केशवनाम सोपें उच्चारीं बापा। ३ ।

१५२१. अरे मना गांस करिसी किती। हे तंव वांयां धनसंपत्ति।
आयुष्य भविष्य नाहीं तुझिये हातीं। हें अवघें अंतीं जायजणें। १ ।
एक अर्बुद साठ कोटि देखा। तीस लक्ष दहा सहस्त्र लेखा।
सात शतें नवमास मापा। तया हिरण्यकश्यपा काय झालें। २ ।
चौदा चौकड्या लंकानाथा। नव्याण्णव सहस्त्र राया दशरथा।
तेही गेले मृत्युपंथा। मागें सर्वथा नुरलेचि। ३ ।
चौदा कल्प मार्कंडेया पडे। तैं लोमहर्षणाचा एक रोम झडे।
बकदालभ्याचे निमिषें मोडे। गेले येवढे अरे मना। ४ ।
बकदालभ्याचे पुरे आयुष्य। तैं वटहंसाचें उपडे पिच्छ।
तयासि होता मृत्युप्रवेश। तो एक श्वास भृशुंडीचा। ५ ।
मरणांत पुरे भृशुंडीचा। तैं एक दिवस कूर्माचा।
नामा विनवी केशवाचा। वेगीं विठोबाचा पंथ धरा। ६ ।

१५२२. गणपति पूजिले ते दोंदिल भले। वैष्णव न भले अरे मना। १ ।
सीतळा पूजिली ते म्हैसे भले। वैष्णव न भले अरे मना। २ ।
मैराळ पूजिले ते वाघे भले। वैष्णव न भले अरे मना। ३ ।
सूर्या पूजिले ते घोडे भले। वैष्णव न भले अरे मना। ४ ।
नामा म्हणे जे कां विठ्ठलीं भजिले। ते वैष्णव भले सत्य मना। ५ ।

१५२३. धांवत धांवत जाईन वोरले। दाटला उल्हासें कंठ माझा। १ ।
अंतरींचें गुज सांगेन आपुलें। हृदयीं दाटले प्रेमअश्रु। २ ।
पीतांबर धरूनी सांगेन एकांती। जीवींची सर्व खंती तयापुढें। ३ ।

संतसमागमें दावीं कवतुकें । पाठवी भातुकें देऊनियां । ४ ।
नामा म्हणे मज आहे भरवंसा । मना तूं विश्वास दृढ धरीं । ५ ।

१५२४. नको नको मना हिंडों वांगतागी । कष्ट झाले भारी त्यांयांवीण । १ ।
कल्पना सांडोनि संतासंगें राहीं । सर्व त्यांचे पायीं सुख आहे । २ ।
ज्याचिया दर्शनें शोक मोह जळे । पाप ताप पळे काळभय । ३ ।
जवळीच देखती पायाळावांचून । तें सुख निधान वैकुंठींचें । ४ ।
नामा म्हणे आली शेवटील घडी । तो घेई आवडी हाचि एक । ५ ।

१५२५. पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीचि होसी । केशव न होसी अरे मना । १ ।
आप ध्यासी तरी आपचि होसी । केशव न होसि अरे मना । २ ।
वायु ध्यासि तरी वायुचि होसी । परी केशव न होसि अरे मना । ३ ।
आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी । परी केशव न होसि अरे मना । ४ ।
नामा म्हणे जरी केशवासी ध्यासी । तरी केशवचि होसी अरे मना । ५ ।

१५२६. संसारीं असतां जीवन्मुक्त आम्ही । विठ्ठल हे नामीं विनटलों । १ ।
काया क्लेश करणें शरीर दंडणें । न लगे हिंडणें दाही दिशा । २ ।
कोण वाहे मंत्र बाउगी खटपट । गाऊं निष्कपट रामनाम । ३ ।
नामा म्हणे मज आहे हा भरंवसा । मना तूं विश्वासा दृढ धरीं । ४ ।

१५२७. शोधोनियां चारी वेद । सार काढोनियां भेद । १ ।
मना जाण जाण जाण । विठोबाची प्रेमखुण । २ ।
सहा शास्त्रांचें संमत । मंथूनि काढिलें यथार्थ । ३ ।
याज्ञिकांची जीवनकळा । उन्मनीचा जो जिव्हाळा । ४ ।
नामा म्हणे माझे बापे । साधियलें संतकृपें । ५ ।

१५२८. लाजों नको मना हांस्य कोणा । संसार पाहुणा दो दिवसांचा । १ ।
कोंडीं नाहीं आई म्हणोनि गाई नको त्योनि । इतुकिये भ्रांती पडूं नको । २ ।

बाळकाचे बोल माउली प्रीति करी। तैसी कीर्ति हरी परिसे चित्तें। ३।
भलतिया परी बोले त्या श्रीहरी। तो भवसागरीं तारील जाणा। ४।
येणें तारूण्यपणें भ्रमलासि झणीं। भोगिसी पतनी जन्मांतरीं। ५।
तूं होय मागता हरि होय दाता। शरण जाई अनंता म्हणे नामा। ६।

१५२९. बोलिलें वेदांनीं एकिलें सिद्धांनीं। बोल नेति नेति अनिर्वाच्य। १।
तोचि हा बोल बोलरे मना। बोल नारायणा समर्पावे। २।
माझा मायबापें सोडवूनि गळा। केशवीं बांधला बोला बोल। ३।
नामा म्हणे बोल बोलतांहि बोला। खेचरें दाविला प्रेमभक्ति। ४।

१५३०. मन धांवे सैरावैरा। मन मारूनि केलें एकमोहरा। १।
मन केलें तैसें होय। धांवडिलें तेथें जाय। २।
मन लांचावलें न राहे। तत्त्वीं बैसलें कधि नव जाये। ३।
नामा म्हणे सोहंशब्दी। मन वेधलें गोविंदीं। ४।

१५३१. सुख दुःख जिवाचें सांगेन आपुलें। हृदय फुगलें फुटों पाहे। १।
धरूनि पीतांबर नेईन एकांतीं। सांगेन जिवींची खंती तया पुढां। २।
संतसमागमें खेळवील कौतुकें। प्रेमाचें भातुकें देऊनियां। ३।
अंतरींची आवडी तोचि जाणे एक। जिवलग जनक पंढरीरावो। ४।
नामा म्हणे ऐसा आहे पैं भरंवसा। मना तूं विश्वासा दृढ धरीं। ५।

१५३२. परब्रह्म विश्वाकारें अवतरलें भक्तिकाजा।
मूर्ति सुनीळु सांवळी केशिराजु स्वामी माझा। १।
गोविंदा रे तुझें ध्यान लागो मना।
पाहिजे प्रेमपद निर्मळ होत ज्ञाना। २।
मन हें वोवरी असे सुमनाचे चित्रशाळी।
दोन्ही चरण सुकुमारे वरीं अष्टदळ कमळी। ३।
संध्याराग रातले सुनीळ दिशातळवटीं।
ध्वजवज्रांकुश चिन्हें साजती गोमटीं। ४।

इंदिरा तिथें थांकली तिच्या सुखा नाहीं पारू।
ते चरणीं स्थिर झाली म्हणोनि म्हणती लक्ष्मीवरू। ५।
घवघवीत वांकी चरणीं ब्रिदाचा तोडरू।
नखप्रभा फांकली तिनें लोपला दिनकरू। ६।
सृष्टि घडीत मोडीत उत्पत्ति स्थिति प्रळय अवघें नवें।
तो चतुर्मुख ब्रह्मा चरण पूजितो स्वभावें। ७।
देवाधिदेव शंभू कैलासींचा राणा।
गंगा मुगुटीं धरिला तिचा जन्म अंगुळीं चरणा। ८।
दैत्यकुळीं जन्मला देव पळती ज्याचेनि धाकें।
पावो पाठीसी लागला म्हणऊनि दारवंटा राखे। ९।
शेष वर्णितां श्रमला वेद परतले माघारीं।
नामा म्हणे अरे मना याचे चरण धरीं झडकरी।१०।

१५३३. मनाचें मनपण सांडितां रोकडें। अंतरींच जोडे परब्रह्म। १।
नाथिला प्रपंच धरोनियां जीवीं। सत्य तें नाठवीं कदाकाळीं। २।
अझूनि तरी सांडीं नाथिलें लटिकें। तरसील कवतुकें म्हणे नामा। ३।

## साधनांची दुष्करता

१५३४. मुख्य मातृकांची संख्या। सोळा अक्षरें नेटक्या। १।
समचरणीं अभंग। नव्हे ताळ छंदो भंग। २।
चौक पुलिता विसर्ग। गण यति लघु दीर्घ। ३।
जाणे एखादा निराळा। नामा म्हणे तो विरळा। ४।

१५३५. सोळा त्या समाधि आंठ पांच साहलें। तेथें नरहरि देव नांदे। १।
बारा गुंफे माजीं भ्रमर गुंफे मध्यें। तेथें आत्मा शुद्ध ज्ञान नांदे। २।
गोल्हाटाचा भेद असेची आवबा। शुद्ध ज्ञानदिवा अलक्षतो। ३।
नामा म्हणे आम्हां तेजाच्या उजेडा। देव केला घोडा बैसावया। ४।

१५३६. समाधिस्थ मना राहे समाधान। नि:शब्द म्हणणें याचिलागीं। १ ।
राम ते समान नव्हती समाधान। समाधि बैसणें एकाचित्तें। २ ।
उन्मनी उपासना प्रेमाची दाटणी। आत्मरूप जनीं दिसतसे। ३ ।
नामा म्हणे रूप डोळ्यांतील बाहुली। तिचि जगीं जाहली जगदाकार। ४ ।

१५३७. वामांगीं बाहुली तूर्या तेथें कळा। ते लक्षी पाउलां रामरूप। १ ।
माया निजरूप दक्षिणांगीं वसे। तूर्येचा हा भास मावळला। २ ।
मी माया म्हणतां पाहे आपणातें। आत्माराम तेथें ज्ञानजळीं। ३ ।
नामा म्हणे ज्ञान माया ते आपण। दृष्टीचें देखणें आत्मरूप। ४ ।

१५३८. सत्य ज्ञानानंद गगनाचें प्रावर्ण। नाहीं रूप गुण गुणातीत। १ ।
नाद ना भेद ना छंदे निरंतर। दोहींच्या विचारें ब्रह्म नांदे। २ ।
येकवटी ब्रह्म आत्माराम रूप। तें पाहा स्वरूप लावण्याचें। ३ ।
नामा म्हणे केले चैतन्य जवळ। मांडियेला खेळ संतीं तेथें। ४ ।

१५३९. चैतन्याचा खेळ एकवट ब्रह्म। निर्गुणासी गुण रूप जाहलें। १ ।
चैतन्य त्या कळा रूपा आले संत। निर्गुणाचा हेत रामकृष्ण। २ ।
खेळ मांडियेला गोल्हाट शिखरीं। गोलांगुळांगुळीं समाधिस्थ। ३ ।
समाधी साधन अखंड उन्मनी। औटपीठ ध्वनी नाद होय। ४ ।
नामा म्हणे तेथें चौक्या ज्या रंगल्या। अरंग मिरवल्या संतसंगें। ५ ।

१५४०. दृष्टीचें देखणें तेंचि रूपमाया। शब्द बोलावया ज्ञान झालें। १ ।
ज्ञानाची जी जागा हृदयीं पाहावी। सत्रावीसी दावी खेळ तेथें। २ ।
सत्रावी जीवन माया तिचे पोटीं। ज्ञान झाली दृष्टि देखावया। ३ ।
देखणें सिद्धांत बोलणें वेदांत। शब्द तोचि हेत सत्रावीचा। ४ ।
नाद आणि भेद देखणें सिद्धांत। बोलणें वेदांत हेंचि दोनी। ५ ।
हेत तो अहंकार दोहींतें नाचवी। अविद्येसी दावी निजसुरा। ६ ।
नामा म्हणे सिद्ध देखणें हा जन्म। डोळ्या माजीं वर्म बोलिलें तें। ७ ।

१५४१. अंतःकरणीं विष्णु तोचि आत्मा असे। चंद्रमा भासे मन तेंची। १।
बुद्धि ब्रह्मदेव चित्त नारायण। अहंकार जाण रूद्ररूप। २।
ज्ञान आत्मे पांच जानीं ओळखावे। पांच ते पाहावे कर्मस्थानीं। ३।
नामा म्हणे कैसें दाखऊं उघडें। वाटतसे कोडें मज आतां। ४।

१५४२. काया काशी पुरी आत्मा विश्वेश्वर तो। शांती भैरव रक्षितसे सत्राविचा।
बोध भागीरथी देखा। मग मनकर्णिका स्नान करा। १।
श्रोत्र चक्षु जिव्हा घ्राण आणि त्वचा। हा पंच गंगेचा संगम जाला।
ज्ञान तो माधव जान दृष्टी पाहे। अखंडित साहे त्याचे पाई। २।
काम क्रोध लोभ दंभ अहंकार पंचक्रोशी। पार वस्ती त्याची परमार्थ केदार।
वैराग्य मारुती निश्चय सांगाती दंडपाणी। ३।
शोधावें अंतर तेंचि अंतगृहीं लिंगें। ठाईं ठाईं तेंचि तत्त्वें।
पंच कणें शोध करा। येकवृत्ती भाव धरा चित्तीं म्हणे नामा। ४।

१५४३. षड्चक्र भेदोनी जातां ऊर्ध्वपंथें। ध्वनि अनुहात उमटे तेथें। १।
तये ध्वनीमाजी मग्न होय मन। योगसिद्धि जाण कैसी घडे। २।
तेही बोलांडितां सिद्धि आडव्या येती। घेऊनियां जाती आपुल्या पंथें। ३।
तेथें गुंतोनियां विचरती योगीजन। योगासी साधून काय होतें। ४।
आधिं तो साधितां कष्टाचे संभार। होय चकनाचूर शरीराचा। ५।
साधितीया पुढें ऐसीं विघ्नें येती। ठेऊनि मागुती फिरती मागें। ६।
वारियाची मोट कैसी बांधवेल। भलत्यासी मागतां वाटेल हें लटिकें। ७।
नामा म्हणे तुम्ही सोडोनियां भक्ति। करितां नाना युक्ति मूर्खजन। ८।

१५४४. साधनाच्या माजी एक गजगजू। साधी त्यासी उजू होय पहा। १।
नासिकाचें वारें कोंडोनियां प्राणें। उपराटें जाणें ऊर्ध्वपंथें। २।
गुदस्थानीं टांच देऊनियां जाण। कासावीस प्राण होती पहा। ३।
गोल्हाट भेदिता कोल्हाटीच नाहीं। विठोबाची ग्वाही नामा म्हणे। ४।

१५४५. मायेसी हलले भावासी त्यागिलें। जाऊनि राहिलें काकापासीं। १ ।
काकी मुख दावा काकी मुख दावा। काकी मुख दावा बाईयांनो। २ ।
काकीचें श्रीमुख गोरक्षा लाधलें। काकीनें पोखिलें गोरक्षासी। ३ ।
नामा म्हणे आम्हां काकी पैं वोळली। सत्राची दिधली दोहावया। ४ ।

१५४६. मुंगीस तों मार्गु सांपडे गोडीचा। योगीया लक्षीचा ज्ञान ज्योती। १ ।
तरीच ओळखीजे केशवचरण। त्या जन्ममरण मग कैंचें। २ ।
मत्स्य नानापरी क्रीडा खेळे जळीं। आनंदकल्लोळीं योगीराय। ३ ।
नामा म्हणे तोचि केशव जाणता। तया नाहीं व्यथा गर्भवासु। ४ ।

१५४७. पृथ्वी माजी पाहतां नाहीं त्यां देखिला। हस्तिसी उडवील ऐसा कोणीं। १ ।
शोधितां शोधितां आलों पंढरीसी। तेंथें ज्ञानोबासी देखियेलें। २ ।
मोक्षमार्गी देवें हा गजराज बांधला। तो ज्ञानी उडाला गोल्हाटासी। ३ ।
पृथ्वीमाजी पाहातां ज्ञानीच कोल्हाटी। ढिसाळ हे दृष्टि तृणप्राय। ४ ।
उडोनियां तेणें दर्शन घेतलें। हस्तीसी जिंकिलें ज्ञानदेवें। ५ ।
याचिया इशाळे करील जो मूर्ख। पाहूनियां दुःख कष्टी होय। ६ ।
धन्य ज्ञानदेव योग साधूनियां। भक्ति आचरोनियां दावी लोकां। ७ ।
नामा म्हणे सर्व खटपट मांडोनि। पांडुरंग मनीं भावें ध्यावा। ८ ।

१५४८. तेरा माजी तीन सात साक्षात्कार। आठवा निर्धार असीपद। १ ।
नवमापासूनि दशमाचे अंतीं। बारावा निश्चिती योग जाणा। २ ।
प्रथम अक्षरीं मध्यमा सूचना। नाम नारायणा अंतकाळीं। ३ ।
नामा म्हणे तुम्ही नाम स्मरा मनीं। वैकुंठभुवनीं वास होय। ४ ।

१५४९. देव दगडाचा भक्त हा मायेचा। संदेह दोघांचा फिटेकैसा। १ ।
ऐसे देव तेंहि फोडिले तुरकीं। घातले उदकीं बोभातीना। २ ।
ऐसिया देवासी वाहिले टिळे डोळे। भक्त बाळे भोळे नागवीले। ३ ।
ऐसीं ती दैवतें नको दावूं देवा। नामा म्हणे केशवा विनवितसें। ४ ।

१५५०. वेडावलं वाचा वेदाची बोलतां। देवा पाहूं जातां अनिर्वाच्य। १।
अनिर्वाच्य वाचा बोलावया गेली। जिव्हा हे चिरली भूधराची। २।
भूधराची जिव्हा झालिसे कुंठित। नामा म्हणे अंत नलगे त्याचा। ३।

१५५१. पुष्पांगी परिमळु दुध घृत मंजु। ऊंस तो रसाळु बीज नाहीं। १।
तैसें परब्रह्म आहे तें निर्वाण। वर्णिता पुराण न पडे ठायीं। २।
दीपाचीही दीप्ति दर्पणाची कांति। तैसी ब्रह्ममति कवण जाणे। ३।
नामा म्हणे जैसें सर्वांघटीं आकाश। केशव परमहंस तैसा जाणे। ४।

१५५२. एक तत्व एकाकार सर्व देशीं। एक ते नेमेसी सकल जनीं। १।
ऐसें ब्रह्म पहा आहे सर्व एक। नलगे विवेक करणें कांहीं। २।
मिथ्या हें डंबर माया मथितार्थ। हरि हाचि स्वार्थ वेगीं करी। ३।
नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद। नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं। ४।

१५५३. ब्रह्मीं ब्रह्म एक मुळीं नाहीं जग। सर्व मायायोग कल्पनेचा। १।
स्थावर जंगम सर्व मायोपाधि। जाण पां त्रिशुद्धि आत्मज्ञानें। २।
रवीच्या कीरणें जैसें मृगनीर। तैसें ब्रह्मीं कीर विश्व झालें। ३।
नामा म्हणे विठ्या एक निज खूण। स्वरूपीं तल्लिन होऊनि राहें। ४।

१५५४. संसार पाल्हाळ सांगसी परिकर। नाम तें श्रीधर न म्हणसी। १।
कैसें तुज उद्धरण होईल गव्हारा। भजन तया हरिहरा करीं वेगीं। २।
योनी नानाविधा पावसी आपदा। हाचि खेळ सदा स्मरतोसी। ३।
नामा म्हणे लटिकें प्रपंचासी मुके। राम हेंचि मुखें जप करीं। ४।

## मागणे

१५५५. केशवाचें मज पाहूं द्या श्रीमुख। लागलीसे भूक नयनांसी। १।
कस्तुरी कुंकूमें भरोनियां ताट। अंगी वरवंट गोपाळासी। २।
जाई जाई पुष्पें गुंफियेल्या माळा। घालोनि घननीळा आवडीनें। ३।
नामा म्हणे हरि पंढरिचे राणे। श्रीमुख पारणे होत असे। ४।

१५५६. पांडुरंगा तुझी पाहतसे वास। चरण रात्रंदिवस चिंतीतसे। १ ।
तान्हें वत्स घरि बांधलेंसे दाव्या। हृदयीं स्मरे धावा माऊलीचा। २ ।
नामा म्हणे विठो तू माझा सोयरा। झणी मज अव्हेरा अनाथनाथा। ३ ।

१५५७. असे सदा माझें मन पंढरीनाथा। न सोडी सर्वथा चरण तुझे। १ ।
यासि काय करूं सांगा मी गोपाळा। कां स्नेह लाविला पूर्वींहुनि। २ ।
हृदयिची वृत्ति मनेंसि मिळोनि। अवघी तुझे चरणी सुखावली। ३ ।
नामा म्हणे केशवा धरिली तुझी सेवा। सुख अनुभवा आलें मज। ४ ।

१५५८. निरंतर येणें गहे समाधान। मग प्रारब्ध भोगणें गोडवाटे। १ ।
हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम। बुद्धी हे निष्काम धरीन देवा। २ ।
नामा म्हणे तुझीं पाऊलें चिंतीत। झालों कृत कृत्य जन्मोजन्मीं। ३ ।

१५५९. पैल पिकली पंढरी। विठ्ठल रायाची नगरी। १ ।
पाहा पाहा एकलें निरूतें। विश्व केलें हे मागुतें। २ ।
केशव खळेदान देतां। नामा झालासे मागता। ३ ।

१५६०. बाहेरीभीतरीं तुजचि मी देखें। चित्त तेणें सुखें वेडावलें। १ ।
संतसंगें मज पालट हा झाला। पाहतां विठ्ठल रूप तुझें। २ ।
मीपणासहित आनंदीं बुडालें। न निघे कांहीं केलें चित्त माझें। ३ ।
नामा म्हणे एक उरलीसे वासना। स्वामीसेवकपणा देईं देवा। ४ ।

१५६१. मन माझें आंधळें कपटाचें कवाड। भक्ता केंवि उघडे ज्ञानेंविण। १ ।
काय करूं देवा माझिया मी दैवा। अभक्तांसी भाव केंवि होय। २ ।
हें माझें म्हणती कुबुद्धि लेंकुरें। मागें काळ वैरी पाहतसे। ३ ।
नामा म्हणे केशवा मांडीं तुजा भाव। तुझें पायीं ठाव देईं देवा। ४ ।

१५६२. मी असे तेथें मग तूं कैंचा। हा उपजत ठायींचा तोडीं वेलू। १ ।
आपुलें करोनि ठेवीं तुझे चरणीं। न मानिती कोणी क्षिती माझी। २ ।

सेवा तुझी देईं हेचि दुजेपण। येर तो अभिमान खंडीं माझा। ३ ।
नामा म्हणे देवा हेचि माझिया जीवा। सुखरूप केशवा विठ्ठलराजा। ४ ।

१५६३. तूं एक सज्ञान मी एक अज्ञान। तुझें नाम जाण विस्तारीलें। १ ।
आतां करिसी काय आतां करिसी काय। सांपडली सोय रामचंद्रा। २ ।
चरणीं जें आहे ती माझी माय। ईश्वरू तो वाहे शिरकमळीं। ३ ।
नामा म्हणे देवा न सोडीं मी भावा। जन्मोजन्मीं सेवा द्यावी तुझी। ४ ।

१५६४. दास्यत्व न वडेची तुझें। आयुष्य वेचिलें वीण काजें।
धरणीं झालें पैं ओझें। तुझ्या प्राप्ति वांचोनि। १ ।
पुनरपी जन्मा येईन मागुता। कवण जाणे कैसी व्यवस्था।
तुज मी ध्याईन अनंता। ऐसा लाभ कैं होईल आतां। २ ।
तुझ्या नामाचा वोरसु। तेणें चुकला गर्भवासु।
नामा विनवी विष्णुदास। देईं सौरसु आपुले नामीं। ३ ।

१५६५. स्वामी एक वाचा तुजचि मागेन। करीं निज सेवका जगद्वंद्य। १ ।
देउनि प्रेमातें पाळिसी तूं बाळें। न करिसी जीवावेगळें क्षणभरी। २ ।
बळी भीष्म नारद उद्धव रुक्मांगद। हनुमंत प्रल्हाद अंबऋषि। ३ ।
नामा म्हणे हेंचि देईं जन्मोजन्मीं। मी दास तूं स्वामी केशिराजा। ४ ।

१५६६. हेंचि माझी संध्या हेंचि माझें ध्यान। तुझ्या पायीं मन लागो देवा। १ ।
हेंचि माझी रिद्धि हेंचि माझी सिद्धि। अखंड समाधी पाय तुझे। २ ।
नामा म्हणे हेंचि देईं गा श्रीपती। कथेची विश्रांति जन्मोजन्मीं। ३ ।

१५६७. माना तेंचि तान सांगे हरिजन। यम नेम नेणें दोन गोष्टी। १ ।
गोष्ट ते कोणती म्हणाल तुम्ही जरी। वाचे हरि हरि म्हणतसों। २ ।
नामा म्हणे आम्ही मागतों देवासी। कीर्तनीं उपवासी करावें देवा। ३ ।

१५६८. आम्हां विषा जोग तुझिया कीर्तनें। पांगुळलीं मनें योगियांचीं। १ ।
न बोलवे वाचा न बोलवे कांहीं। आपेंआप पाहीं ठाकलोंसे। २ ।
ऐसें तुझें नाम हें गोड गा देवा। घालीं या केशवा हृदयामाजी। ३ ।
नामा म्हणे आम्हां सांपडलें वर्म। नित्य वाचे नाम रामकृष्ण। ४ ।

१५६९. सगुण निर्गुण श्रुति ज्या बोलती। तो तूं माझे चित्तीं पंढरीराया। १ ।
आहेसि तितुकें तूंचि सर्वांगत। मी काय अनाथ वूर्ण तुज। २ ।
चरणींची आवडी न संडावी मनें। यापरि पोसणें मायबापा। ३ ।
साक्ष भीमरथी संत पुंडलीक। नामयातें आणिक नलगे कांहीं। ४ ।

१५७०. बाहेरीं भितरीं पाहतां दिसे एकु। उभा असे व्यापकु पंढरीराव। १ ।
पंढरीचा राणा विटेवरी जाणा। जीवींचिया खुणा भक्तां सांगे। २ ।
गुंतलों संसारीं भरलों कर्मभांडारीं। विषयामाझारी मोहियेलें। ३ ।
नामा म्हणे केशवा माझें उणें न पाहीं। चरणसेवा देईं जन्मो जन्मीं। ४ ।

१५७१. कंठाधिस्थ हें मन माझें पंढरिनाथा। न सोडीं सर्वथा पाय तुझे। १ ।
यासि काय करूं सांगा जी विठ्ठला। स्नेह कां लाविला पूर्वींहूनि। २ ।
कांसवीचीं पिलीं राहोनि निराळीं। दृष्टि पान्हावली अमृतमय। ३ ।
तैसा मी जवळुनि असेन हो दूरी। दृष्टि मजवरी असों द्यावी। ४ ।
तान्हें वत्स घरीं वनीं धेनु चरे। परतोनि हुंबरे क्षणक्षणां। ५ ।
नामा म्हणे सलगी करीन निकट। झणें मज वैकुंठपद देसी। ६ ।

१५७२. ऐशा विचारें समाधान करीं। गोविंद श्रीहरी नारायण। १ ।
सर्वकाळ ऐसी वदो ही वैखरी। आणीक अंतरीं नाठवावें। २ ।
आणिकासी गुज न बोले वदन। वदो नारायण सर्वकाळ। ३ ।
रामकृष्ण माझ्या देवाचें स्तवन। शास्त्रेंही पुराणें भाट ज्याचीं। ४ ।
नामा म्हणे आतां ऐसें करीं देवा। हृदयीं केशवा राहें माझ्या। ५ ।

१५७३. भुक्ति मुक्ति मागों तुज। माझे हांसती पूर्वज। १।
मज प्रेम पहिजे देवा। न मागें आन कांहीं हेवा। २।
चाड धरीन ब्रह्मज्ञानीं। तरी मज व्यर्थ व्याली जननी। ३।
मोक्ष मागूं तुजप्रति। संत छळवादें हांसती। ४।
होऊं सिद्धीचा साधिता। देवें सांडिलें सर्वथा। ५।
नामा म्हणे तूं जाणसी। माझा भाव हृषीकेशी। ६।

१५७४. काय देतील ते नर। दिलें नाहीं रघुवीरें। १।
आजि दिलें उद्यां नाहीं। ऐसियासी मागों कांहीं। २।
हात पसरूं ऐसें धुरे। दिलें कल्पांतीं न सरे। ३।
नामा म्हणे देवाधिदेव। समर्थ दाता पंढरीराव। ४।

१५७५. माझें मागणें तें किती। दाता लक्षुमीचा पती। १।
मेघ वर्षे शिळाधारीं। तेथें चातक चंचुभरी। २।
महा डोह गंगाजळ। तृप्त एखादा अंजुळ। ३।
साखरेची साठी। तेथें मुंगी मुखवटी। ४।
नामा म्हणे मी सेवेसीं। तूं तो उदाराचा राशी। ५।

१५७६. माझें व्रत एक चालवीं विठ्ठला। सकळां घटीं तुला देखें ऐसें। १।
तें माझें चित्त पावे समाधान। नाहीं तरी जिणें काय व्यर्थ। २।
तुझी काम्य आणि बुडे महापुरीं। ऐसें होतां हरी लाज कोणा। ३।
मागितलें फार तुज काय देवा। नको बा केशवा मीतूंपण। ४।
नामा म्हणे माझा कैवारी सबळ। असोनियां काळ भोगूं काशा। ५।

१५७७. काय मागूं विठ्ठल धुरे। एक तुळसी दळ पुरे। १।
मागूं मुगुट माथाचा। तरी तो आणिला इंद्राचा। २।
मागूं कुंडलें कर्णीचीं। तरी तीं आणिलीं कर्णाचीं। ३।
मागूं पीतांबर शेला। तरी तो कासेसी कसिला। ४।

मागूं पादुका चरणींच्या। तरी त्या आणिल्या शेषाच्या। ५ ।
मागूं तोडर पायींचा। धाक जाईल असुरांचा। ६ ।
मागूं जातां लक्ष्मीसी। रिद्धिसिद्धि जिच्या दासी। ७ ।
मागूं म्हणे शंख जरी। तरी तो मिरवे तुमच्या करीं। ८ ।
मागों सुदर्शन दळ। त्या शस्त्राचें तुम्हां बळ। ९ ।
मागों वैजयंती माळ। तरी शुन्य दिसेल वक्षस्थळ। १०।
कारण तेंचि मागितलें। नामया केशवें प्रेम दिलें। ११।
नामा म्हणे कांहीं न मागों। तुझे चरणीं लक्ष लागो। १२।

१५७८. भावें तुझे चरण धरिले विठ्ठला। आतां तूं पांगिला करूं नको। १ ।
नलगे मज कांहीं ऋद्धि सिद्धि पाहीं। मुक्तिसुख तेंहि नलगे मज। २ ।
नामा म्हणे मज जन्म दे अनंता। भक्तिविरहिता जन्म नको। ३ ।

१५७९. देव देवी देवतार्चन। तूंचि माझें पूर्णपण। १ ।
न मगें न मगें विठ्ठला। येथुनियां राहें उगला। २ ।
तुझी भक्ति हेचि गोड। आणिक आम्हां नाहीं चाड। ३ ।
जप तप नेम निष्ठा। तुजचि जाणों गा वैकुंठा। ४ ।
यज्ञ याग मंत्र तंत्र। तूंचि आमुचें कुळ गोत्र। ५ ।
येउनि पंढरीराय हरी। आम्हांसि तूं अंगिकारीं। ६ ।
आम्ही करितों कीर्तन। तारावे हे तुवां जन। ७ ।
हेंचि मागणें ह्रो देवा। नामा म्हणे द्यावी सेवा। ८ ।

१५८०. वाणी गांधिपण पाठीं पसारा। घेवोनि संसारा आलों असे। १ ।
पसारे करी पसारे करी। वांयां उभराउभरी करीतसें। २ ।
रस रसायण आणि भाजीपाला। शकुन आम्हां झाला पुरता आहे। ३ ।
वाटे एक खोटें दांडीचें पा नेटें। कवणेपरी न फिटे कुडेंपण। ४ ।
बोलतों पैं खोटें देतों पैं उणें। वायाच शिणें रात्रंदिवस। ५ ।
विष्णुदास नामा विनवी केशवा। तेहिपरी देवा उद्धरावें। ६ ।

१५८१. तुझे चरणीं सुख अनुपम आहे । तें तूं जाणसी काय केशिराजा । १ ।
आम्हां व्हावें नेंचि एकातें मागातें । नकळे जीवेंभावें ब्रह्मादिकां । २ ।
चतुरा शिरोमणी आमुची जननी । जाणते रूक्मिणी चरणमहिमा । ३ ।
चरणींचा प्रताप जाणे गौतमवधु । जे कां शापें बद्ध मुक्तशिळा । ४ ।
चरणींचा प्रताप जाणती वैष्णव । नल कुबेर मणिग्रीव सखे माझे । ५ ।
नामा म्हणे तुझे चरणींची त्रिपथा । भूषण उमाकांता ऐसें झालें । ६ ।

१५८२. द्वारावती भुवना गेलों । शंखचक्र घेउनी आलों । १ ।
वाटे प्रपंचें धरियेलों । रामनामें सोडविलों । २ ।
शंखचक्र भरूनी केणें । द्वारावती केलें पेणें । ३ ।
नामा म्हणे लाभ झाला । फुकासाठीं हरी जोडला । ४ ।

१५८३. अणिका न मागे हें ब्रीद साजे चातका । भूमीच्या उदका न खालवी माथा । १ ।
अणिकापुढें न गाय हें ब्रीद साजे कोकिळेंचे । वसंत ऋतु स्वयें आळवितसे । २ ।
आणिकापुढें न नाचे हें ब्रीद साजे मयुरा । वर्षला घन सारा वळोनियां । ३ ।
एका लक्ष्मीपती वांचूनि न बैसे आणिकापुढें । हें ब्रीद साजे रोकडें गरुडासी । ४ ।
आणिकांची पांगिला न करीं गा देवा । नामा म्हणे केशवा रंक तुझा । ५ ।

१५८४. गर्भवास ऐसा मजसी भिवविलें । गाई बैसवितो व्याघ्रापुढें । १ ।
नको हा संसार नको हा संसार । नको हा संसार देवराया । २ ।
कोपें काळदर्पें धरिलें अजेसी । तेणें कासाविसी सांगों नेणें । ३ ।
नामा म्हणे तुझें केशवा मी बाळ । ऐसा तूं कृपाळ मायबापा । ४ ।

१५८५. तपें केलीं दाटोदाटीं । थोरां पुण्याचिया साटीं । १ ।
जन्मोजन्मींच्या संकटीं । चिठो तुझी झाली भेटी । २ ।
दोन्हीं चरण ललाटीं । नामा म्हणे न सोडीं मिठी । ३ ।

१५८६. बोलावं शब्दं स्वयें कैंची शक्ति । या रंगा श्रीपती त्वां बा यावें । १ ।
येईगा विठ्ठला बाहातसें आतां । या रंगीं अनंता त्वां बा यावें । २ ।

धांवत त्वां यावें धांवत त्वां यावें । या रंगीं नाचावें पांडुरंगा । ३ ।
तिन्हीं त्रिभुवनीं तुझीच करणी । ठाव मागे चरणीं नामदेव । ४ ।

१५८७. शरीर प्राणाचें देऊनि बळिदान । साधावें निधान प्रेमभक्ति । १ ।
हेंचि नित्य मागें तया श्रीवल्लभा । याहूनि दुर्लभ आन नाहीं । २ ।
हरिदासांचा संग हरिकथा अनुराग । हेंचि परमभाग्य पुण्यरूप । ३ ।
सर्वभावें करूनि सर्वभूतीं करूणा । सर्वत्र देखणा विठ्ठलरूप । ४ ।
विषयीं विकृति नामीं नित्य प्रीति । हृदयीं कृष्णमूर्ति वसो सदा । ५ ।
नामा म्हणे मग तो केशव कृपासिंधु । देईल भक्तिबोधु प्रेमसुखें । ६ ।

१५८८. तुझें भक्तिसुख द्यावें मज प्रेम । वसो तुझें नाम माझे मुखीं । १ ।
सद्भक्ति विचार राहो माझे चित्तीं । हेंचि कृपामूर्ति द्यावें मज । २ ।
तुझा दास जनीं म्हणवितों विख्यात । पसरिला हात फिरवूं नको । ३ ।
नामा म्हणे देवा इतुकें द्यावें मज । ऐकोनि केशवराज काय बोले । ४ ।

१५८९. मनीं जें जें देखें परी दृष्टी नेणें । प्रेमाची ते खूण सांगावया । १ ।
काय करूं मायबापा गा विठ्ठला । मज कां अबोला धरिलासी । २ ।
मानसीं वसणें प्रत्यक्ष पाहणें । तुझें नाम गाणें तरी साच । ३ ।
नामा म्हणे किती सांगावें गा तुज । केशवा हें गुज पुरवीं माझें । ४ ।

१५९०. कृपणाचें धन असे भूमि आंत । जेथें जाय चित्त तेथें राखो ध्यान । १ ।
ऐसी मज देवा लावावी सवय । हेंचि मज द्यावें पांडुरंगा । २ ।
जेथें जेथें मन जाईल हें माझें । तेथें तेथें तुझें रूप भासे । ३ ।
नामा म्हणे सर्वांपरी मी अज्ञान । विनवीं आस करून पांडुरंगा । ४ ।

१५९१. आसनीं शयनीं भोजनीं गमनीं । तुझे पाय दोन्ही दावीं मज । १ ।
संसार कल्मष समूळ छेदिसी । दावीं अहर्निशीं पाय मज । २ ।
हरी ध्यानीं मनीं भक्तां तूं परेशा । अनाथा कोंवसा गोंवळिया । ३ ।
नामा म्हणे नाम ऐकों सर्वोत्तमा । संसारींच्या श्रमा वारीं देवा । ५ ।

१५९२. वांकडे पाहणें जया लौकिकासी । मज पंढरिसी वास पुरे । १ ।
उदंड उपास काम्यया करावे । पुरे एका भावें भाविकांसी । २ ।
तीर्थ क्षेत्र मूळ जाणा वाळुवंट । कटीं कर नीट भक्तांसाठीं । ३ ।
नामा म्हणे माझी वैकुंठ पंढरी । तेथें निरंतरी जन्म देईं । ४ ।

१५९३. हरि जळामधीं भिजतील कधीं । तैसें कृपानिधी केलें आम्हां । १ ।
आमुचा विकल्प आमुचा विकल्प । आमुचा विकल्प आम्हां नाडी । २ ।
कामधेनु संगें गाढव बांधिलें । तयाचें तें मोलें तुके केंवि । ३ ।
काय म्यां करावें पाठीलागे भोग । नामा म्हणे योग तुझ्या हातीं । ४ ।

१५९४. रमासिंधु माजी सौंदर्याची धणी । ब्रीदें चक्रपाणी मिरविसी । १ ।
मेघ देहाकृति घनश्याम मूर्ति । नटतसे भक्ती भक्तजना । २ ।
भाक देऊनियां गौळियाचे घरीं । गाई निरंतरी चारीतसे । ३ ।
इंद्र वेडावला मुनि थोर थोर । न कळेचि पार म्हणे नामा । ४ ।

१५९५. काय पांडुरंगा सांग म्यां करावें । शरण कोणा जावें तुम्हांविण । १ ।
पाहतांना वाट भागले लोचन । कठिणच मन केलें तुवां । २ ।
ऐकीली म्यां कानीं कीर्ति तुझी देवा । उठलासे हेवा त्याचि गुणें । ३ ।
अनाथ अन्यायी काय मी करीन । दयावंता खूण सांगसी तूं । ४ ।
नामा म्हणे आस पूर्ण कीजे देवा । रूपडें दाखवा नेटें पाटें । ५ ।

१५९६. वीतभर पोट लागलेंसे पाठीं । साधुसंगें गोष्टी सांगूं न देई । १ ।
पोट माझी माता पोट माझा पिता । पोटानें ही चिंता लाविलीसे । २ ।
पोट माझा बंधु पोट माझी बहीण । पोटानें हें दैन्य मांडिलेंसे । ३ ।
विष्णुदास नामा पोटाकडे पाहे । अझून किती ठायें हिंडविसी । ४ ।

१५९७. पांचमुखीं रुद्र स्वयें करी स्तुति । चहूं मुखीं कीर्ति वर्णी ब्रह्मा । १ ।
देवी देव सर्व विस्मयो पावती । विठोबाची ख्याती कोण वानी । २ ।

परिक्षितीसाठीं प्राण त्यजी सर्व । रावणाचा गर्व स्वयें हाणी । ३ ।
नामा म्हणे तुज सकळ समान । माझे दोष गुण मानी काय । ४ ।

१५९८. आपुले रूपीं मन लयीं निरंतर । सबाह्यभीतर आड राखीं । १ ।
परि तुज मज असावा संवादु । भ्रांति माया बाधु काय करी । २ ।
काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । हे वैरी अपार मारीं माझे । ३ ।
नामा म्हणे आम्ही जन्मजन्मांतरींचे । पोसणे घरींचे दास तुझे । ४ ।

१५९९. भावेंविण भक्ति कशानें करावी । माया मोह वैरी देहामाजी । १ ।
तुझें नाम दिव्य रस जिव्हे स्वाद । नाश काम क्रोध करिती माझा । २ ।
जे जे वस्तुसि मी नित्य नयनीं पाहें । त्या त्या विषयीं मन धांवताहे । ३ ।
नामा म्हणे थोर उबगलों संसारी । काळ वैरी पुढा ग्रासूं पाहे । ४ ।

१६००. मन माझें चोरटें लागलें कुसंगीं । बांधिलें षड्वर्गीं धरोनि त्यातें । १ ।
केउता गेलासि माझ्या कृपावंता । ये गा पंढरिनाथा मायबापा । २ ।
वासनेची बेडी घालोनि माझे पायीं । विषयवज्रघायीं ताडितांसी । ३ ।
आशा तृष्णा माया आणि ते कल्पना । करिताति कामना नानाविध । ४ ।
कामक्रोध दंभ लाविताती कळा । ये माझ्या गोपाळा सोडवणें । ५ ।
नामा म्हणे माझें घेऊनि चित्तवित्त । करी बंधनमुक्त संसारीचें । ६ ।

१६०१. नायिकाचे परी वरी वरी बोडी । परि अंतरीची वाढी उणी नव्हे । १ ।
तैसें माझें मन न राहे समूळीं । प्रपंच कवळी दाही दिशा । २ ।
भक्तिप्रेमभाव वरी वरी दावीं । अंतरीं आठवीं घराचार । ३ ।
ऐसा लटिका जाण असे परोपरी । तारीं भवसागरीं म्हणे नामा । ४ ।

१६०२. लटिकें तरी गायें तुझेंचि नाम । लटिकें तरी प्रेम तुझेंचि आणीं । १ ।
सहजचि लटिकें असे माझे ठायीं । तुझिया पालट नाहीं साचपणा । २ ।
लटिकें तरी हरी करीं तुझें ध्यान । लटिकें माझें मन तुजचि चिंती । ३ ।
लटिका तरी बैसें संतांचे संगतीं । परि नामीं विश्वास सत्य आहे । ४ ।

लटिका तरी वैसें संतांचे संगतीं । परि माझें चित्तीं ध्यान तुझें । ५ ।
ऐसें लटिकें माझें मन सफळ करीं देवा । नामा म्हणे केशवा विनविन आहे । ६ ।

१६०३. [illegible] । भजन ऐसिया पाहसी काय । १ ।
जाणतां नेणतां नाम तुझें देवा । गाईन केशवा तारीं मज । २ ।
विषयीं असक्त भ्रांत माझें मन । कैसें तुझें ध्यान घडेल यासी । ३ ।
नामा म्हणे आतां जाणसी तें करीं । पतितपावन हरि नाम तुझें । ४ ।

१६०४. ममता तुटेना मज केशिराजा । अंगीं भाव दुजा लागे पाठीं । १ ।
शरीरीं तितिक्षा नाहीं क्षमा शांति । यालागीं श्रीपति वांयां गेलों । २ ।
नामा म्हणे देवा तारिसी पतिता । म्हणोनियां सत्ता केली आम्हीं । ३ ।

१६०५. लोभियाचे घरीं लटिकेंचि उपवास । न मरे हृषीकेश म्हणती जगीं । १ ।
तूं तंव भावाचा अंकुर जी देवा । लटिका मी पहावा दास तुझा । २ ।
लटकी पक्षियातें बोभाये कुंटणी । ते त्वां माझी म्हणोनि अंगिकारिली । ३ ।
लटिका अजामेळ पुत्राचेनि मोहें । सोडविला पाहे कैसा तुवां । ४ ।
या अवघ्याहुनि मी लटिका सहस्रगुणें । तारूनि कीर्ति करणें म्हणे नामा । ५ ।

१६०६. लटिका मी गायु लटिका मी नाचनु । संतांसि देखोन लोचन लावीं । १ ।
लटिका माझा भाव लटिकी माझी भक्ति । तूं तंव श्रीपती कृपासिंधु । २ ।
लटिकी माझी क्रिया लटिकें माझें कर्म । परि सतत तुझें नाम गातु असें । ३ ।
लटिकें माझें ध्यान लटिकें माझें ज्ञान । तूं तंव सहजगुण सत्यरूप । ४ ।
लटिकी माझी पूजा लटिकें माझें पूजन । लटिकें माझें भजन भावहीन । ५ ।
लटिकें वत्सप्रेम धेनु हे स्वीकारी । तैसें मज करीं म्हणे नामा । ६ ।

१६०७. मी तो तुझा दास नव्हे उदास । मायामोहपाश तोडीं देवा । १ ।
प्राण जावो परि नको करूं त्याग । करीं अंगसंग अंगिकार । २ ।
अंगीकारीं आतां अजामेळ अंतीं । ममान श्रीपती मम करीं । ३ ।
नामा म्हणे ऐसें वर्णावें म्यां किती । नामें केली ख्याति चराचरीं । ४ ।

१६०८. जन्मल्या पासूनि सोसिले प्रवास। वियोग पहायास झाले आतां। १।
आतां एक करीं धांवणिया धावा। बुडतों केशवा काढीं मज। २।
लाभ नव्हे हानी झाली भागाभाग। तूंचि पांडुरंग पुरविसी। ३।
नामा म्हणे ऐसें सर्वस्वें रक्षिलें। पाषाण तारिले जळामाजी। ४।

१६०९. संसारसंकटें रिघालों पाठिसी। आतां झणीं देसी त्याचे हातीं। १।
ब्रीदें बडिवार ऐकोनियां फार। रिघों आम्ही द्वार विठोबाचें। २।
आणिकहि वार्ता सांगों काय आतां। पंढरीच्या नाथा परिसावें। ३।
अमृत पाजणें प्रीतीनें भक्तासीं। सत्य हृषीकेशी नामा म्हणे। ४।

१६१०. कागदींचें वित्त वेश्येसी दिधलें। तैसें आम्हां केलें नारायणें। १।
जोडोनियां हस्त बोले मद्यापाशीं। तैसें तूं मजशीं केलें देवा। २।
कडू भोपळ्याचा कोणता उपयोग। तैसें पांडुरंगे केलें जाण। ३।
नामा म्हणे ऐसें करू नको देवा। समागम व्हावा पायांसवें। ४।

१६११. वाल्मिकादि भीष्म द्रोण कृपाचार्य। द्रुपदतनया दिली भेटी। १।
उद्धव नारद अंबरिष शुक। वळी ध्रुवादिक आले भेटी। २।
देवी देवऋषि गोपाळांसहित। भाष्यकारें नीत शुद्ध केली। ३।
नामा म्हणे आतां पाहूं नको दोष। पतितास यश तुझे नामीं। ४।

## शरणागतस्थिति

१६१२. सांडोनि अभिमान झालों शरणागत। ऐसियाचा अंत पहासी काई। १।
माझे गुण दोष मनीं गा न धरीं। पतितपावन जरी म्हणविसी। २।
पडलिया पापराशी झणी देसी देवा। हे लाज केशवा कोणास जी। ३।
नामा म्हणे देवा चतुरा शिरोमणी। निकुरा होसी झणीं मायबापा। ४।

१६१३. तूं करुणानिधी रघुराया रे। वंदिन तुझे पायां रे। धृ०।
शरणागत मी निश्चय तुझा। दावि भजन सदुपाया रे। १।

माझा त्वां प्रतिपाळ करावा। निरसुनी दुस्तर माया रे। २ ।
नामा म्हणे ब्रीद आठवी स्वमनीं। अगणित सगुणीं काया रे। ३ ।

१६१४. यमाच्या फांसा पडिला माझें कंठीं । हिंडलों जगजेठी नाना योनी । १ ।
सोडवीं गा देवा दीनदयानिधी । मी एक अपराधी दास तुझा । २ ।
शरण आलियाचे न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण तुज साजे। ३ ।
त्रिभुवनीं समर्थ उदार मनाचा। कृपाळू दीनाचा ब्रीद तुझें । ४ ।
गजेंद्र गणिकेची राखिली तुवां लाज। उद्धरिला द्विज अजामेळ। ५ ।
नामा म्हणे देवा अव्हेरसी मज। जगीं थोर लाज येईल तुला। ६ ।

१६१५. देवा माझें मन ठेवीं तुझे चरणीं । घालीं माझें नयनी रूप तुझें। १ ।
मज या लोकांचा शीण असे मनी। तुजचि चिंती हृदयकमळीं। २ ।
चंदनाच्या वृती वेधले तरुवर । सबाह्य अभ्यंतर काय झालें। ३ ।
सरिता सिंधुमाजी मिळोनि लपाली। सागरची झाली एकसरें। ४ ।
लवण जळाचें प्रसिद्धचि असे । ऐक्यभावें वसे न दिसे कांहीं। ५ ।
नामा म्हणे शरण आलों केशिराजा। ऐसा भावो माझा करीं वेगीं । ६ ।

१६१६. तत्त्व पुसावया गेलों वेदज्ञासी । तंव भरले त्यापासीं विधिनिषेध । १ ।
तया समाधान नुपजे कोणे काळीं । अहंकार बळि झाला तेथें। २ ।
म्हणोनि तुझें नाम धरिलें सर्वभावें। उचित करावें पांडुरंगा। ३ ।
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी। तंव भरले तयापाशीं भेदाभेद। ४ ।
एकएकाच्या न मिळती मतासी । भ्रांत गर्वराशि भुलले सदा। ५ ।
पुराणिकासि पुसें स्वरूपाची स्थिति। तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें। ६ ।
विषयीं ठेवुनि मन सांगती ब्रह्मज्ञान । तेणें समाधान नुपजे कदा। ७ ।
हरिदासासी पुसें भक्तीचा उपाय। तंव तयापाशीं नाहीं भाव कोठें। ८ ।
वाचेनें सांगती नामाचा बडिवार । विषयीं पडीभर सदाकाळीं। ९ ।
ऐसें विचारितां बहुत भागलों । म्हणोनि शरण आलों पांडुरंगा ।१०।
भयाभीत झालों संसार करितां। नामा म्हणे आतां तारीं मज ।११।

१६१७. संतां गांजलों म्हणोनि मज आलें । पाठीसि रिघालों देवराया । १ ।
कळिकाळा वास पाहों न देसी । भरंवसा मानसीं आहे मज । २ ।
नामा म्हणे देवा स्वामिया तूं एक । आवडता सेवक करीं मज । ३ ।

१६१८. यंईना अझुनी श्रीकृष्ण मदना । गोंवळा रक्षणा मायबाप । १ ।
कृपा करा देवा कृपा करा देवा । कृपा करा देवा पांडुरंगा । २ ।
लावुनियां आशा फिरविसी दिशा । प्रेमभाव कैसा दावीं आतां । ३ ।
बाळेभोळे जन करिती विनंती । मोकलिसी अंतीं म्हणे नामा । ४ ।

१६१९. भवव्याघ्र देखोनि भ्यालें माझें डोळे । झालेंसे व्याकूळ चित्त माझें । १ ।
पाव गा विठोबा पाव गा विठोबा । पावगा विठोबा मायबापा । २ ।
तूं भक्त कैवारि कृपाळुवा हरी । येईं गा झडकरी देवराया । ३ ।
नामा म्हणे नेणें आन तुज वांचूनि । जनक जननी केशिराजा । ४ ।

१६२०. कां गा मोकलीलें माझिया विठ्ठला । धांवा तुझा केला मायबापा । १ ।
त्रितापें तापलों बहु गा पोळलों । चिखलीं पडिलों दीनानाथा । २ ।
यालागीं तुजला भाकितों करूणा । धांवसी निर्वाणा पांडुरंगा । ३ ।
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । रूक्मिणीच्या कांता घालीं उडी । ४ ।

१६२१. वाढवेळ कां लाविला । कोण्या भक्तानें गोंविला । १ ।
झडकरी ये बा विठ्ठला । कंठ आळवितां सोकला । २ ।
वाट पाहें दाही दिशा । जिवीं धरोनि भरंवसा । ३ ।
प्राण केव्हां येईल माझा । अलिंगील चतुर्भुजा । ४ ।
नामा गहिंवरें दाटला । देह धरणिये लोटला । ५ ।

१६२२. तूं माय माउली म्हणोनि आस केली । विठ्ठले पाहिली वास तुझी । १ ।
मज कां मोकलिलें कवण निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें । २ ।
तुजविण जिवलग मज कोण होईल । तो माझें जाणेल जड भारी । ३ ।

आम्ही अपराधी तुझे शरणागत। तुजविण हित कोण करी। ४ ।
करुणा कल्लोळिणी अमृतसंजीवनी । चिंतिल्या निर्वाणीं पाव वेगें। ५ ।
नामा म्हणे तुजविण झालों परदेशी । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे। ६ ।

१६२३. मन नेणें तुझ्या नामाचा विश्वास । येर तो हव्यास गोड वाटे। १ ।
तुझें प्रेम नेणें तुझें प्रेम नेणें । सांग काय करणें केशिराजा। २ ।
घातलें संसारीं कर्माचे भांडारीं। कृपा नरहरी करीं मज। ३ ।
नामा म्हणे मी ठावींचाचि अपराधी । केशवा कांहीं बुद्धि सांग मज। ४ ।

१६२४. विठ्ठल माउली कृपेची कोंवळी। आठवितां घाली प्रेम पान्हा। १ ।
तूं माझी माउली मी वो तुझा वत्स। परतों परतों वाट पाहें तुझी। २ ।
माता मोहें कैसी न विसंबे सर्वथा। अंतरींची व्यथा कोण जाणे। ५ ।
नामा म्हणे विठ्ठले कांगे रुसलीसि। केव्हां सांभाळिसी अनाथनाथे। ६ ।

१६२५. डोळुले शिणले पाहतां वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजी। १ ।
तूं माझी जननी सखीये सांगातिणी। विठ्ठले धांवोनि देईं क्षेम। २ ।
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज। क्षुधें पीडलों मज विसरलीसी । ३ ।
तूं माझी कुरंगिणी मी तुझें पाडस । गुंतलें भवपाश तोडीं माझा। ४ ।
तूं माझी माउली मी तुझी तान्हुली । बोरसोनी घालीं प्रेम पान्हा। ५ ।
नामा म्हणे माझी पुरवावी आस। पाजीं तान्हुलया प्रेम पान्हा । ६ ।

१६२६. कृपावंत समर्थ म्हणुनि करीं आर्त । येई न सांवरत पांडुरंगे। १ ।
मज कां विसंबली विठ्ठल माउली। तनु तृषावली जीवनेंविण। २ ।
तूं माझें जीवन नाम जनार्दन । हृदयीं भरीं पूर्ण प्रेमरस। ३ ।
अमृताच्या करें कांसवीच्या भरें । कुरवाळीं त्वरें देह माझा। ४ ।
पूर्ण पान्हा देई निववीं हृदयीं। येई वो कान्हाई सांवळिये। ५ ।
नामा म्हणे पावें जीवा शीण न साहे। वेगीं लवलाहे पाजीं पान्हा। ६ ।

१६२७. तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे । १ ।
तूं माझी माउली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे । २ ।
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे । ३ ।
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घालीं मज पांडुरंगे । ४ ।
कासवीची दृष्टी सदा बाळावरी । तैसी दया करी पांडुरंगे । ५ ।
नामा म्हणे होसी भक्ताचा वल्लभ । मागें पुढें उभा सांभाळिसी । ६ ।

१६२८. असोनि न दिसे लौकिक वेव्हारीं । ऐसें निरंतरीं लपवीं मातें । १ ।
तुझे पायीं माझें असो अनुसंधान । वरी प्रेमजीवन देईं देवा । २ ।
मनाचिये वृत्ति अंतरापासूनि । झोंबो नेदी दोन्ही कामक्रोध । ३ ।
नामा म्हणे ऐसें पाळिशील मातें । तरी मी जीवें तूतें न विसंबें । ४ ।

१६२९. तुझें प्रेम माझे हृदया आवडो । चरण मी न सोडीं पांडुरंगा । १ ।
कशासाठीं शीण थोंडक्याकारणें । काय तुज उणें होय देवा । २ ।
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती । ३ ।
नामा म्हणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें । ४ ।

१६३०. तुझ्या पायीं चित्त रंगलेंसे माझें । नाहीं केशिराजें ऐसें केलें । १ ।
उठवितां काय होईल संताप । मज अभाग्यास मोकलीलें । २ ।
प्रपंच कावाडीं न घाली मज दृढ । नको वाडें कोड झणीं देवा । ३ ।
नामा शिंपियाचा विनवी समस्तां । नको भंगूं आतां प्रेमपान्हा । ४ ।

१६३१. उडाली पक्षिणी गेली अंतराळीं । चित्त बाळाजवळी ठेवूनियां । १ ।
तैसें माझें मन राहो कां ईश्वरीं । मग सुखें संसारीं असेन कां । २ ।
धेनु चरे वनीं वत्स असे घरीं । चित्त वत्सावरी ठेवुनि फिरे । ३ ।
दुडीवरी दुडी सखियांसीं गोष्टि करी । चित्त दुडीवरी ठेवूनियां । ४ ।
विष्णुदास नामा विनवी परोपरी । हें प्रेम श्रीहरी द्यावें मज । ५ ।

१६३२. प्रेमपिसें भरलें अंगीं । गीतछंदें नाचों रंगीं । १ ।
चारा धांवे भक्तया । तैसी माझी रंग छाया । २ ।
बोले बाळक बोबडें । तरी तें जननीये आवडे । ५ ।
नामा म्हणे गा केशवा । जन्मोजन्मीं देई सेवा । ६ ।

१६३३. नामयाचें प्रेम केशवचि जाणे । केशवासी राहणें नामयापाशीं । १ ।
केशव तोचि नामा नामा तोचि केशव । प्रेमभक्ति भाव मागतसे । २ ।
विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं । प्रेमाची शिदोरी मागतसे । ३ ।

१६३४. वारंवार काय विनवावें आतां । समजावें चित्ता आपुलिया । १ ।
तूं काय म्हणसी कंटाळेल हाचि । जाईल उगाचि उठोनियां । २ ।
मजलागीं देवा जासी चुकवोनी । आणिन धरूनि तुजलागीं । ३ ।
दृढ भक्ति भाव प्रेमाचा हा दोरा । बांधीन सत्वर तुझे पायीं । ४ ।
नामा म्हणे बोल काय विठो आतां । भेटावें सर्वथा यांत बरें । ५ ।

१६३५. तूं माय माउली आस केली थोरी । वास निरंतरीं पंढरीये । १ ।
रूप ते दाखवीं एकवेळां मज । धरूं नको लाज केशिराजा । २ ।
आपणा समान करी कोणे काळीं । तंव वनमाळी देव म्हणूं । ३ ।
नामा म्हणे तुज भक्तिचें पिसें । पुरविसी आस दुर्बळाची । ४ ।

१६३६. जननिये जिवलगे येवों पांडुरंगे । शिणलों भेटि वेगे एक वेळां । १ ।
त्राहें त्राहें त्राहें कृपादृष्टि पाहें । येऊनियां राहें हृदयामाजी । २ ।
वासनेच्या संगें शिणलें माझें चित्त । विषयाचे आघात पडती वरी । ३ ।
नाहीं तुझी सेवा केली मनोधर्में । संसार संभ्रमें भ्रांत सदा । ४ ।
नाहीं तुझें नाम गाइलें आवडी । वाळली कुर्वंडी त्रिविधतापें । ५ ।
नामा म्हणे आई धांवें लवलाहीं । बुडतों चिंताडोहीं काढीं मज । ६ ।

१६३७. संसारघडचक्रीं पडिलों महाडोहीं । सोडवण्या येईं पांडुरंगा । १ ।
दवडादवडी धांव दवडा दवडी धांव । नको भक्तिभाव पाहों माझा । २ ।

माझी चित्तवृत्ति अज्ञान हे गाई । व्याघ्रें धरिली आहे अहंकारें । ३ ।
पंचाननीं मज घेतलें वेढोनि । नेताति काढोनि प्राण माझा । ४ ।
गजेंद्रकारणें घातली तुवां उडी । तैसा त्वरित सवडी पावें मज । ५ ।
नामा म्हणे मज तुझाचि आधार । पोसणा डिंगर जन्मोजन्मीं । ६ ।

१६३८. भिऊनि रिघोंजे समर्थाचे पाठीं । विषयांची तों भेटी नको मज । १ ।
तैसा मी शरण आलोंसे केशवें । मज त्वां राखावें पायांतळीं । २ ।
नको उदासीन राखों अभिमान । माझें आगमन विचारीं कां । ३ ।
तुझेनि होईल तेंच मी मागेन । न सोडीं चरण अहर्निशीं । ४ ।
अविद्या अपार संचरली देवा । आम्हासि कुढावा नाहीं कोणी । ५ ।
देवा आतां मज नको गर्भवास । नामा विष्णुदास विनवितसे । ६ ।

१६३९. प्रपंचीं जरी मातें करिसी उदासिन । तरी तुझें ध्यान लागो मना । १ ।
हेंचि तुज मागणें जन्मजन्मांतरीं । न मागतां अंतरीं प्रगट होई । २ ।
इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडीं । प्रेमरसगोडी देईं मातें । ३ ।
नामा म्हणे शरण आलों मी केशवा । हाचि तूं पुरवावा मनोरथ । ४ ।

१६४०. लाज सांडोनियां आलों शरणागत । ऐसियाचा अंत पाहसी झणीं । १ ।
गुण दोष माझे मनीं गा न धरीं । पतितपावन जरी म्हणविसी । २ ।
पडलिया पाथरा लाथ देसी देवा । हे लाजकेशवा कोणास जी । ३ ।
नामा म्हणे केशवा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं मायबापा । ४ ।

१६४१. शरणागतासी नये मोकलावा । हें तरी केशवा जाणतोसी । १ ।
सांगणें नलगे सांगणें नलगे । सांगणें नलगे मायबापा । २ ।
सांगतां समर्थ सर्वांचि विसरे । त्याच्या अभ्यंतरीं नव्हे बोल । ३ ।
नामा म्हणे तैसा नकोचि शाहणा । अठराही पुराणां वेडाविसी । ४ ।

१६४२. काय अपराध पाहसी कोणाचे । धांवे भाविकांचे कामकाजीं । १ ।
काय केशिराजा वाणूं मी दुबळें । शरणागता ळळे पुरविसी । २ ।

पतितपावन ब्रीद चराचरीं । तेथें मी भिकारी कोणीकडे । ३ ।
नामा म्हणे तूंचि करिशी उद्धार । मज देवा पार नाहीं भाग्या । ४ ।

१६४३. जन्ममरणाचें मज भय नाहिसें । तें म्यां हृषीकेशी स्वीकारीलें । १ ।
आतां माझी चिंता तुज कां पंढरीनाथा । असोंदे भलता भलते ठायीं । २ ।
सुखदु:ख भोगणें माझें मीच जाणें । तुज तंव सांसणें नलगे कांहीं । ३ ।
नामा म्हणे माझे हेची मनोरथ । होईन शरणागत जन्मोजन्मीं । ४ ।

## करुणा

१६४४. अनाथाचा नाथ भक्तांचा कैवारी । पुराणीं हे थोरी आयिकीली । १ ।
ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारी दु:खासी केशिराजा । २ ।
त्रितापें तापलों दु:खें आहळलों । कासाविस झालों दयासिंधू । ३ ।
तुजवीण आतां कोणातें मी सांगूं । तोडीं हा उद्वेगु नारायणा । ४ ।
नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरीं त्वरित पांडुरंगा । ५ ।

१६४५. कृपा करोनि त्वां मज प्रसन्न व्हावें । आणि म्या मागावें बुद्धिज्ञान । १ ।
ऐसी भुली मज न घाली पांडुरंगा । बिघड सत्संगा न करी मज । २ ।
मोक्षासी साधन एक ते उपाधि । दाखवुनि बुद्धि भ्रंश केलें । ३ ।
एक पुत्र कलत्र राज्याचा संभ्रम । दावोनी दुर्गम भ्रम केला । ४ ।
नामा म्हणे तुझ्या प्रेमालागीं भक्ति । घेतली म्यां सुती जन्म मरण । ५ ।

१६४६. अनाथासी माझा हांसी नारायणा । करुणावचना बोलविसी । १ ।
पांडुरंगा कृपा करा मजवरी । पामरा उद्धरीं पाहतांची । २ ।
गणिके सत्वर मोक्षपद देसी । उपमन्यु बाळासी क्षीरसिंधु । ३ ।
नामा म्हणे काय याति न विचारी । विदुराचे घरीं खासी कण्या । ४ ।

१६४७. आशा मनीषा तृष्णा कल्पनेचे पाशीं । धांव जगजेठी स्वामी माझ्या । १ ।
गेलासि केउता बाळिलें दुश्चिता । अगा कृपावंता स्वामी माझ्या । २ ।
नामा म्हणे मज नाहीं कोण गत । तारिसी अनंता स्वामी माझ्या । ३ ।

१६४८. वासरूं भोंवे खुंटिया भोंवतें । आपआपणियातें गोविंयलें । १ ।
तैसी परी मज झाली गां देवा । गुंतलों मी भावा लटिकिया । २ ।
नामा म्हणे केशवा तोडीं कां बंधनें । मी एक पोसणें भक्त तुझा । ३ ।

१६४९. वाघाचिया गळां शेळी बांधोनियां । तैसी तुझी माया लोभापर । १ ।
कां मज संसारीं घालितोसि देवा । कैसें तुझिया जीवा गोड वाटे । २ ।
विषयाचे कल्लोळ पाजिसी केवळ । हृदय कोमळ कैसें तुझें । ३ ।
नामा म्हणे मज आदि अंतीं एकु । जननी जनकु पंढरीरावो । ४ ।

१६५०. कल्पतरु तुझें नाम नारायणा । माझी हे करुणा येऊं द्यावी । १ ।
लक्ष्मीचा पती उणें काय तुज । देणें किती मज असे देवा । २ ।
जरि म्हणसील तुझें कर्म हीन । घेउनी सुदर्शन कर्मा मारी । ३ ।
सर्व खेळ तुझा कर्म तुज स्वाधीन । चालवी पायांविण पांगुळ ते । ४ ।
कर्ता हर्ता तूंचि हृषीकेशी देवा । बोल ते आणिसी आम्हांवरी । ५ ।
नामा म्हणे देवा चित्तावर घेसी । काय न करिसी रंका रावो । ६ ।

१६५१. कां बा घातलें संसारीं । आतां कष्टां वेगळें करी । १ ।
करा देवा अंगिकार । आतां फेडा माझा भार । २ ।
माझें वागवी बा ओझें । दिधलियाचें क्षेम कीजे । ३ ।
नामा धरितसे पाय । देवा आतां उशीर काय । ४ ।

१६५२. तुजविण आम्हां कोण हो पोशिता । अहो जी कृपावंता पंढरीराया । १ ।
न करीं विठ्ठला आतां लाजिरवाणें । मी तुझें पोसणें पांडुरंगा । २ ।
काकुळती कोणा येऊं हो मी आतां । अनाथाच्या नाथा विठ्ठला तूं । ३ ।
एकवेळ आतां पाहें मजकडे । नामा म्हणे वेडें रंक तुझें । ४ ।

१६५३. माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा । १ ।
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा । २ ।
अनाथाचा नाथ होसी तूं दयाळा । किती वेळांवेळां प्रार्थूं आतां । ३ ।
नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां वरी । ४ ।

१६५४. देहाभिमानें पुरविली पाठी। कांहीं जगजेठी नये कृपा। १ ।
स्वात्मसुखासाठीं स्तुति करी ब्रह्मा। व्याधा निजधामा स्थिर पद। २ ।
काय करीतसे मातृपितृभक्ति। नया जगत्पति पावतसे। ३ ।
नाचती वैकुंठीं सर्व ऋषेश्वर। नामा म्हणे पार नाहीं नाहीं। ४ ।

१६५५. तुरुनि आलों तुझे भेटी। मांगावया जीवींची गोष्टी। १ ।
मजशीं बोल तरी कांहीं। दृष्टी उघडुनि मजकडे पाहीं। २ ।
अरे तूं कृपाळु दीनांचा। महा उदार थोर मनाचा। ३ ।
भक्तें पुंडलिकें गोंविलासी लोभें। प्रीतीच्या प्रेमें बळलासी वल्लभें। ४ ।
युगें अठ्ठावीस भरलीं। धणीं अझुनी नाहीं पुरली। ५ ।
प्राण होती कासाविस। नामा म्हणे कां उदास। ६ ।

१६५६. तुवां येथें यावें कीं मज तेथें न्यावें। खंती माझ्या जीवें मांडियेली। १ ।
माझें तुजविण येथें नाही कोणी। विचारावें मनीं पांडुरंगा। २ ।
नामा म्हणे वेगीं यावें करुणाघना। जातो माझा प्राण तुजलागीं। ३ ।

१६५७. गरुडावरी हरी बैसोनियां यावें। आम्हांसि रक्षावें दीनबंधू। १ ।
अच्युता केशवा मुकुंदा मुरारी। येईं लवकरी नारायणा। २ ।
ऐकोनियां धांवा धांवला अनंत। उभा गरुडासहित मागें पुढें। ३ ।
वैजयंती माळ किरीट कुंडलें। नामयानें केलें निंबलोण। ४ ।

१६५८. अज्ञान बाळक कोमाइलें क्षणी। जाणते जननी तान भूक। १ ।
तैसें मजलागीं होऊनि कृपाळ। करीं गा सांभाळ अनाथाचा। २ ।
वत्सालागीं धेनु येतसे वोरसें। पान्हा स्तनीं जैसें वोसंडती। ३ ।
नामा म्हणे तुज हे न साहे उपमा। मी कुडी तूं आत्मा केशवराजा। ४ ।

१६५९. स्वप्नीं तरी कैसा न पडसी डोळां। सुंदर सांवळा घवघवीत। १ ।
चरणीं गर्जती तोडर नेपुरें। रेखित कस्तुरी निढळांमाजी। २ ।
शंख चक्र हातीं गळां वैजयंती। कुंडलें तळपती श्रवणांमाजी। ३ ।
नामा म्हणे स्वप्नीं तरी तूं बा येईं। पांडुरंगे माई कृपावंते। ४ ।

१६६०. पक्षिणी प्रभातीं चार्‍यासी जाये । पिलूं वाट पाहे उपवासी । १ ।
तैसें माझें मन करी वो तुझी आस । चरण रात्रंदिवस चिंतीतसे । २ ।
तान्हें वत्स घरीं बांधलेंसे दावा । तया हृदयीं धांवा माउलीचा । ३ ।
नामा म्हणे केशवा तूं माझा सोइरा । झणीं मज अव्हेरा अनाथनाथा । ४ ।

१६६१. रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवीं । अनुदिनीं आठवीं चरण तुझे । १ ।
ने रे पांडुरंगा आपुलिया गांवा । तूं माझा विसांवा जिवलग । २ ।
मी एक बापुडें रंकाहूनि रंक । त्रिभुवननायक कीर्ति तुझी । ३ ।
मी तुझें पोसणें दास पैं दुर्बळ । तूं दीनवत्सल स्वामी माझा । ४ ।
तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा । सांभाळीं समर्था ब्रीद तुझें । ५ ।
नामा म्हणे विठो झालों कासाविस । पुरवीं माझी आस मायबापा । ६ ।

१६६२. बाळका स्तनपान माता करवितें । टाकिलें परतें चरणीं लोळे । १ ।
हातीं घेउनि शिपटी माय लागे पाठीं । चरणीं घाली मिठी परतें नोहे । २ ।
तैसें माझें मन तुजलागीं देवा । न विसंबे केशवा क्षणभरीं । ३ ।
चातका नलभे पाणी तृषाक्रांत मनीं । वाट पाहे गगनीं जीवनाची । ४ ।
निराळीं पियुषें वर्षे तयालागीं । आठवितां वेगीं मेघराया । ५ ।
वाळलें हें तृण नसंडी हो क्षीर । तैसें भक्तीं स्थिर मन राहे । ६ ।
नामा म्हणे या जन्माचिया साठीं । चरणीं घालीं मिठी परता नोहें । ७ ।

१६६३. युक्तिप्रयुक्तीचें प्रमाण मी नेणें । केशवचरण ध्यातों मनीं । १ ।
आणिक साधन काय म्यां करावें । ब्रह्मादिक देव मौन ठेले । २ ।
आतां मी कायसा करावा आधार । चरण निर्धार देवपूजा । ३ ।
नामा म्हणे तुझा अंत नाहीं पार । काय म्यां पामर जाणों आतां । ४ ।

१६६४. जाणीव शाहणीव वाहियलें ओझें । तेणें चरण तुझे अंतरले । १ ।
आतां नेणतेंचि करीं मज हरी । लौकिका बाहेरी घालीं मज । २ ।
तुझिया नामाचें लागोंदे गा पिसें । देहीं देह न दिसे ऐसें करीं । ३ ।
नामा म्हणे तुज एकातें मी जाणें । रहित कारणें कल्पनेसी । ४ ।

१६६५. तुझें रूप माझ्या दाखवीं मनातें। मग तुझ्या चरणातें न विसंबें। १।
कां मज शिणविसी थोडिया कारणें। काय तुझें उणें होईल देवा। २।
चातकाची तहान पुरवी जळधर। काय त्याचें सरे थोरपण। ३।
चंद्र चकोराचा पुरवी सोहोळा। काय त्याच्या कळा न्यून होती। ४।
कूर्मी अवलोकी आपुलिया बाळा। काय तिच्या डोळां दृष्टि नासे। ५।
नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा। अनाथां कोंवासा होसी तूंचि। ६।

१६६६. माथां मोरपिसां वेंठीं। श्रवणीं कुंडलें पदक कंठीं।
हातीं घेऊनि वेताटी। गोधना पाठीं लागले। १।
तुझीं पाउलें अनंता। न विसंबें गा सर्वथा।
गोविंदा माधवा अच्युता। श्रीविठ्ठला। २।
गाई गोवळीं पावला। एक म्हणती वळावळा।
विष्णुदास नामा चरणा जवळा। अखंड वळल्या देतसे। ३।

१६६७. कोण होईल आत्मज्ञानी। जो बा राहे त्याच्या ध्यानीं। १।
मज तों चरणांची आवडी। जन्मोजन्मीं मी न सोडीं। २।
होईल सिद्धीचा साधक। त्यासि देई स्वर्गसुख। ३।
कोण होईल देहातीत। त्यासी करीं संगरहित। ४।
नामा म्हणे जीवें साठीं। तुज मज जन्में पडिली गांठी। ५।

१६६८. नानेंलिया गाय उकां लागोनि। पारधी देखोनि मुरडे वेगीं। १।
तैसे तुझे चरण विसरलों देवा। संसार केशवा देखोनियां। २।
तैसी परी मज झाली जाण देवा। नामा उभा केशवा विनवितसे। ३।

१६६९. देवा माझें मन करोनि स्वाधीन। निमोलें स्वामीपण भोगिसीना। १।
फुकाचा कामारा वोळगे निरंतर। न घाली तुज भार कल्पनेचा। २।
तुज नलगे देणें मज नाहीं मागणे। असेन अनुसंधानें चरणाचेनि। ३।
नामा म्हणे केशवा तूं सर्वज्ञ जाणता। समर्थीच्या उचिता चुकों नको। ४।

१६७०. धरोनि हस्तक बैससी एकांतीं । भक्तांसी श्रीपति सर्वकाळ । १ ।
दाखवीं चरण दाखवीं चरण । दाखवीं चरण धांव नेटें । २ ।
सर्व आचरण दाविसी प्रकार । कल्पना अंधार निमित्याचा । ३ ।
नामा म्हणे होसी चतुर आपण । आमुचें निर्वाण पाहूं नको । ४ ।

१६७१. पाहुनि न दिसे लौकिका व्यवहारीं । ऐसा तूं अंतरीं लपवीं मज । १ ।
परि तुझ्या चरणीं माझें अनुसंधान । तरी प्रेम पावन देईं देवा । २ ।
मनाचिये वृत्ती अखंड तूं राहोनी । झेंपावती झणीं काम क्रोध । ३ ।
नामा म्हणे ऐसें पावसी तूं मातें । तरी मी जीवें तूतें न विसंबें । ४ ।

१६७२. तुझे पायीं माझ्या मनें दिली बुडी । इंद्रियें बापुडीं वेडावलीं । १ ।
आतां विषय सुख जाणावें कवणें । जाणोनि भोगणें कवणें स्वामी । २ ।
देह सहजस्थिती राहिलें निष्काम । हृदयीं सदा प्रेम वोसंडत । ३ ।
नामा म्हणे देवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करीं मज । ४ ।

१६७३. बुद्धिहीन अति करितों हव्यास । उठती उद्देश नानामतें । १ ।
एकापुढें एक नासोनियां जाती । सोशिली विपत्ति जन्म मरण । २ ।
वासनेचे संगें बुडालों मी वांयां । चुकवूं नको पायांसवें भेटी । ३ ।
नामा म्हणे ऐसे गेले बहुतेक । वैकुंठनायका तारीं मज । ४ ।

१६७४. वांयां नाडानाडी केली माझ्या मनें । राहिलों लपोन तुझे पायीं । १ ।
नको नको मज कल्पनेचा संग । आलासे उद्वेग नारायणा । २ ।
कामक्रोध लोभ पाठीं लागों येती । झणीं त्यांचे हातीं देसी देवा । ३ ।
नामा म्हणे होसी अनाथांचा कैवारी । ब्रीदें चराचरीं वर्णिताती । ४ ।

१६७५. माझी कोण गती सांगा पंढरीनाथा । तारिसी अनाथा कीं बुडविसी । १ ।
मनापासोनियां सांग मज प्रती । पुसें काकुळती जीवींचिया । २ ।
न बोलसी कारे धरिला अबोला । कोणासी विठ्ठला शरण जाऊं । ३ ।

कोणासी सांकडें घालावें हें सांगा। नको करूं रागा दीनावरी। ४ ।
बाळकासी जैसी एकलीच माय। तैसे तुझे पाय आम्हांलागीं। ५ ।
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा। कृपाळुवा कांता रखुमाईच्या। ६ ।

१६७६. अठ्ठावीस युगें उभा विटेवरी। मुद्रा अगोचरी लावूनियां। १ ।
ध्यान विसर्जन केशवा करिसी। नेणवे कवणासी ब्रह्मादिकां। २ ।
पाहतां तुजकडे माझें मीपण उडे। भेदाचें सांकडें हारपलें। ३ ।
तुजपाशीं असतां मुकिजे जीवित्वा। टकले तत्वतां नेणों किती। ४ ।
नामा म्हणे स्वामी कृपादृष्टी पाहें। मन पायीं राहे ऐसें कीजे। ५ ।

१६७७. तुझिया पाया प्राण हे माझे। चरण कमळ तुझें विसंबेना। १ ।
संसाराच्या गोष्टी कीट झाल्या पोटीं। रामकृष्ण कंठीं माळ घाली। २ ।
दुरोनियां देखें गरुडाचें वारिके। गोपाळासारिखे चतुर्भुज। ३ ।
नामा म्हणे विठो जन्मजन्मांतरीं। ऋणि करुनि करीं घेई मज। ४ ।

१६७८. किती तुला देवा येऊं काकुलती। काय तें संचितीं लिहिलें असे। १ ।
केली कां हो सांडी माझी हृषीकेशी। आम्ही कोणापाशी तोंड वासूं। २ ।
ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं। तूंचि एक धनी त्रैलोक्याचा। ३ ।
समूळ घेतला पृथ्वीचा भार। माझाचि जोजार काय तुला। ४ ।
नको पाहूं अंत पांडुरंगे आई। नामा विठोपायीं मिठी घाली। ५ ।

१६७९. गाणीं मी गाइलों भाटीं वाखाणिलों। जन्मोनियां झालों दास तुझा। १ ।
आतां माझी लाज राखें नारायणा। झणीं केविलवाणा दिसोदेशीं। २ ।
माये दुऱ्हाविलों मोहें मोकलिलों। मोय पैं चुकलों संसाराची। ३ ।
आप्तवर्गी सांडिलो गोत्रजां तुटलों। येवोनि विनटलो तुझे पायीं। ४ ।
षड्वर्गी सांडिलों प्रवृत्ती दंडिलों। मीपणा मुकलों मायबापा। ५ ।
नामा म्हणे तुझ्या चरणाची आवडी। लागली न सोडी चित्त माझें। ६ ।

१६८०. नको गा मोकलूं दीना पंढरीनाथा । तुजविण आतां कोण धांवे । १ ।
अपराधाच्या कोटी पाहूं नको कांहीं । येगे विठाबाई झडकरी । २ ।
माझ्या दोषासाठीं पाठमोरा होसी । पावन श्रीदासी लागे बोल । ३ ।
नामा म्हणे जननी तूंचि चराचर । तारिले अपार जड जीव । ४ ।

१६८१. पाहूं द्यारे मज विठोबाचें मुख । लागलीसे भूक डोळा माझ्या । १ ।
कस्तुरी कुंकुम भरोनियां ताटीं । अंगीं बरवी उटी गोपाळाच्या । २ ।
जाईजुई पुष्पें गुंफोनियां माळा । घालूं घननिळा आवडीनें । ३ ।
नामा म्हणे विठो पंढरीचे राणे । डोळियां पारणे होत असे । ४ ।

१६८२. तुझा विष्णुदास म्हणताती जगीं । नाहीं माझे अंगीं प्रेम भाव । १ ।
तेणें थोर लाज वाटे पंढरीराया । ये माझ्या हृदया एक वेळां । २ ।
द्वैताद्वैतभाव आहे माझे ठायीं । अनुभव नाहीं स्वरूपाचा । ३ ।
देखावेखीं बैसें संतांचे संगतीं । नाहीं माझे चित्तीं ध्यान तुझें । ४ ।
नामा म्हणे माझा उजळ करीं माथा । भेटी देउनि संतां निरवीं मज । ५ ।

१६८३. बहु जन्मांतरीं तुझी झाली भेटी । बहु मी हिंपुटी झालों थोर । १ ।
बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं । बहुत केले सुखी शरणागत । २ ।
बहुतां आसक्त बहुतां ओळंगणा । बहुत विटंबना झाली माझी । ३ ।
बहु फेरे पाहिले बहु दुःख साहिलें । बहु चित्तें वाहिलें दुर्भरचि । ४ ।
बहुत काळ गेले बहु अन्याय केले । बहु नाहीं जोडिलें नाम तुझें । ५ ।
ऐसा मी अपराधी पात्रें कृपानिधी । बहु संतां सन्निधीं ठेवीं नामा । ६ ।

१६८४. तुज गीतीं गातां न येसी पांडुरंगा । प्रेमेंचि दडूं गा पायांपाशीं । १ ।
वांकडें तिकडें जैसें आलें तैसें । गावया उल्हास उगवला । २ ।
त्याचि भरें तोंडा आलें तें बोलतों । नाम मुखीं घेतों अखंडित । ३ ।
तुझा म्हणवितों सांभाळावें देवा । नामया केशवा सर्वकाळ । ४ ।

१६८५. अनाथाच्या कांहीं तंव माझी जोडी । पतितपावन प्रौढी तुझी देवा । १ ।
माझिया निर्दैवें ऐसेंचि घडलें । तूं तंव आपुलें न खंडिसी । २ ।
सहस्र अपराध घाली माझे पोटीं । तारीं जगजेठी म्हणे नामा । ३ ।

१६८६. अनंत जन्मींचें चुकवीं सांकडें । काय मी बापुडें विनवूं कैसें । १ ।
सगुण गुणाची बोलिलीसे मूर्ति । राहो माझें चित्तीं निरंतर । २ ।
माझा मीच झालों सकळ व्यापारी । संसारा बाहेरी कोण काढी । ३ ।
नामा म्हणे नको गोववूं आशा । पावन परेशा केशिराजा । ४ ।

१६८७. जेथें जेथें मन जाईल हो माझें । तेथें तेथें तुझें रूप असे । १ ।
ऐशी मज संवई लावीं निरंतरी । जन्मोजन्मांतरीं केशिराजा । २ ।
आपणास काम जरूर कायसा । आतां पंढरीशा आटोपावें । ३ ।
नामा म्हणे नको पाहों माझी लाज । संसाराचें बीज मूळ खुडीं । ४ ।

१६८८. अग्निमाजि पडे बाळू । माता धांवे कनवाळू । १ ।
तैसा धांवें माझिया काजा । अंकिला मी दास तुझा । २ ।
सर्वेंचि झेंपावे पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणी । ३ ।
भुकेलें वत्स रावे । धेनु हुंबरत धांवे । ४ ।
वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतीत हरणी । ५ ।
नामा म्हणे मेघा जैसा । विनविता चातक तैसा । ६ ।

१६८९. धेनु विये वनीं निमे कैंची सुईणी । तरी तें वत्स स्तनीं लावी कवण । १ ।
भुंजगाचीं पिलीं उपजतांची वेगळीं । त्यांसी डंखूं शिकविलें हो कोणीं । २ ।
सहज लक्षण ज्याचिये ठायीं । तो आपुलिये सोई धांवतसे । ३ ।
उपजतांची फुलें मोगऱ्याच्या माथां । त्यासी परिमळता कोणें लावियेली । ४ ।
कडू दुध्याच्या आळ्यासी साखर दूध घातलें । ते अधिकची कडुवाळें कवणें केलें । ५ ।
गाळिला तोडिला खंड विखंडी । ऊंस न संडी सोय गोडीसी । ६ ।
नामा म्हणे तैसें आहे गा श्रीहरी । सोईचे व्यापारीं घेईन तूतें । ७ ।

१६९०. माता पिता बंधु कुळगुरु दैवत। सखा सर्व गोत केशिराजा। १ ।
जन्मोनि पोसणा तुझा मी अंकिला। आणिकाचा पांगिला न करीं देवा । २ ।
विष्णुदास नामा विनवितो केशवा। इर्णी घालिसी देवा संसारासी। ३ ।

१६९१. काय आम्हांपाशीं आहे धन वित्त। दान तें उचित देऊं काय। १ ।
देतां घेतां आम्हां पुरे पुरे झालें। संगतीं त्यागिलें भिवोनियां। २ ।
काय वाणूं गुण भिकारपणाचे। होसी पंढरीची नामनौका। ३ ।
नामा म्हणे पुढें दाखवीं मारग। आम्ही तुज मागें येऊं सुखें। ४ ।

१६९२. माझे गुणदोष आणशील मना। सर्व नारायणा अपराधी। १ ।
सेवाहीन दीन पातकाची रासी। आतां विचारिसी काय ऐसें। २ ।
अंगुष्ठ धरूनि मस्तकापर्यंत। अखंड दुष्कृत आचरलों। ३ ।
स्वप्नीं मज तुझी घडली नाहीं भक्ति। पुससी विरक्ति कोठोनियां। ४ ।
तूंचि माझा गुरु तूंचि माझा स्वामी। सकळ अंतर्यामीं वससी तूं। ५ ।
नामा म्हणे माझें चुकवीं जन्ममरण। नको करूं शीण पांडुरंगा। ६ ।

१६९३. काय करूं आतां देवा विश्वंभरा। मजलागीं थारा नाहीं कोठें। १ ।
उबगति सोयरीं धायरीं समस्त। काय करूं अंत पहासी माझा। २ ।
तूंचि मातापिता गुरुबंधु होसी। जाऊं मी कोणासी शरण आतां। ३ ।
पायीं थारा मागे नाम्याची विनंती। चित्त द्या श्रीपति आतां वेगें। ४ ।

१६९४. नव्हे माझें कांहीं नेणों तुजविण। होसी नारायणा साहाकारी। १ ।
खांबसुत्रीं दावी अनेक पुतळे। नकळेचि खेळे खेळकरी। २ ।
दैत्यवृत्रासुर आपटी आकाशीं। आनंदें खेळविसी सुरवरां। ३ ।
नामा म्हणे तुझी नकळे करणी। जन्मोजन्मीं चरणी ठेवी मज। ४ ।

१६९५. हत्तीच्या चरणावरी बैसे माशी। नमन तयासी करावया। १ ।
तैसें कायसें मी केवढें बापुडें। लागें कोणीकडे देवराया। २ ।
नामा म्हणे तैसें मी एक दुबळें। चरणावेगळें करूं नको। ३ ।

१६९६. तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । नेलें माझें मन षड्वर्गीं । १ ।
धांवगा विठ्ठला सोडवीं आपुला दास । थोर कासावीस केलें बापा । २ ।
कर्म कुळाचार क्रोध हा अनिवार । मदें निरंतर भ्रांत केलें । ३ ।
मत्सरें तुजसि दुराविलें देवा । लोभें केला गोंवा गर्भवासीं । ४ ।
दंभ रसातळीं जातसे घेऊनि । विश्वचक्षु होऊनि पाहसी कैसा । ५ ।
नामा म्हणे मज तुझाचि भरंवसा । अनाथा कुंवासा होसी देवा । ६ ।

१६९७. माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । १ ।
वारा जाय भलत्या ठाया । तैसी माझी रागछाया । २ ।
गातां येईल तेणेंची गावे । येरी हरी हरी म्हणावें । ३ ।
तान मान नेणें देवा । नामा विनवितो केशवा । ४ ।

१६९८. काया मनें वाचा नेणों भक्तिभाव । करिसी उपाव केशिराजा । १ ।
थोरपणासाठीं मन घे हव्यासु । मी तों कासाविसु होय देवा । २ ।
सर्वाभूतांमाजी समत्वे दिससी । नामा म्हणे ऐसी दावीं लीला । ३ ।

१६९९. नेणें भक्ति कांहीं करूं कैसी सेवा । हें तों मज देवा समजेना । १ ।
करूं कैसा जप करूं कैसें ध्यान । नाहीं माझें मन स्थिर देवा । २ ।
कामक्रोध यांची मोठी हे जाचणी । झालों वेड्यावाणी समजेना । ३ ।
नामा म्हणे माझे सांवळे विठाई । येऊनियां राहीं हृदयामाजी । ४ ।

१७००. तुज दिले आतां यत्न करी याचा । जीवभाव वाचा काया मनें । १ ।
भागलों दातारा शीण जाला भारी । आतां मज तारीं अनाथासी । २ ।
नेणतां सोसिली तयांची आटणी । नव्हती हीं कोणी कांहीं माझीं । ३ ।
वर्म नेणें दिशा हिंडली मोकाट । इंद्रिय सुसाट सर्व पृथ्वी । ४ ।
येरझार फेरा शिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगिकारीं । ५ ।
नामा म्हणे मन इंद्रियाचे सोई । धांवे यासी कायी करूं आतां । ६ ।

१७०१. तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें । बहुजन्मीं वियोगें शिणलें होतें । १ ।
आहाळलें पोळलें तापत्रयीं वहिलें । तृष्णे विभांडिलें नानापरी । २ ।
काम क्रोध लोभ दंभ मदमत्सर । इहीं निरंतर जाजावलों । ३ ।
बुडतिया अवचटें लाभे ती सांगडी । ते जीवें न सोडी तैसें जालें । ४ ।
नामा म्हणे तूं केशव कृपेचा सागर । झणीं माझा अव्हेर करसी देवा । ५ ।

१७०२. कावा कर पैं फुटूं नेदी । टाळ दिंडी वाहिन खांदीं । १ ।
तूं बा माझा तूं बा माझा । तूं बा माझा केशिराजा । २ ।
आळवणीचा तूं बा वाचे । तेणें छंदें पैं बा नाचें । ३ ।
तूं बा माझा मी दास तुझा । विनवितो नामा केशिराजा । ४ ।

१७०३. निरंजनीं वनीं पाषाण पैं व्हावें । परी जन्मा न यावें मागत्याच्या । १ ।
राजाचें लेंकरूं पांघरे वाकळ । तेव्हां ते सकळ लाज कोणा । २ ।
पोसवेना तरी दवडुनि देईं देवा । नामा तुज केशवा विनवितसे । ३ ।

१७०४. आसनीं शयनीं आठवीं अनुदिनीं । नित्य समाधानीं रूप तुझें । १ ।
काम धाम कांहीं नलगे माझ्या चित्तीं । न देखें विश्रांति तुजवीण । २ ।
तापत्रय ओणवा लागला चहूंकडे । न देखें उघडें तुजवीण । ३ ।
तुजवीण तें जिवलग दुजें कोण होईल । तें माझे निवारील उद्वेग हे । ४ ।
कृपेचा सागरू त्रिभुवनीं उदारू । न करीं अव्हेरू अनाथाचा । ५ ।
नामा म्हणे केशवा आस माझी पुरवीं । पाउलें दाखवीं एक वेळां । ६ ।

१७०५. देवा निढळावरी हात दोनी । पाहें चक्रपाणि वाट तुझी । १ ।
धांव गा धांव सख्या पांडुरंगा । जीवींचे जिवलगा मायबापा । २ ।
तुजविण ओस दिसती दाही दिशा । धांव जगदीशा मजसाठीं । ३ ।
नामा म्हणे काय बैसलों निवांत । धांवतो अनंत भक्तांसाठीं । ४ ।

१७०६. भागलासि देवा धांव धांवोनिया । दाखविसी पाया पांडुरंगा । १ ।
गजेंद्र गणिके तुम्हा श्रमविलें । मी काय उगलें परदेशी । २ ।

सोळा सहस्र आणि गोपी त्या उद्धरी । माझी कींव चित्तीं कां बा नये। ३ ।
नामा म्हणे आम्हां पुरे तुझा संग । वारंवार मग वारी कोण। ४ ।

१७०७. केशव चरणीं मनें दिली बुडी। इंद्रियें बापुडीं धांवती पाठीं। १ ।
संसार समग्र नको सुखलेश। भातुकें सरीसें पाठविसी। २ ।
जन्म जन्मांतरीं जाणावें कवणें। नेणोनि भोगणें कोणें स्वामी । ३ ।
नामा म्हणे भक्तवत्सला केशवा । आम्हांसाठीं धांवा घालीं हरी। ४ ।

१७०८. तुझें नाम म्हणतां सुलभ अनंता। दुर्लभ म्हणतां अंतकाळीं । १ ।
तैसें तुवां मज केशवा करावें। हृदयीं भेदावें नाम तुझें। २ ।
मुके पशु पक्षी वृक्ष आणि पाषाण। तयां नारायणा गति कैसी । ३ ।
नामा म्हणे कैसें केशवा सांगणें। अज्ञानी तें नेणें कवणें परी । ४ ।

१७०९. आइलिया कोंवसा अनाथा कैवारी। ब्रीद चराचरीं वर्णिताती । १ ।
येईं बा श्रीहरी तूं आमुचा कैवारी। सुदर्शन करीं वेगीं येईं। २ ।
द्रौपदीच्या आकांतीं पावलासी लोकरी। तैसा झडकरीं शीघ्र येईं। ३ ।
गजेंद्राकारणें कळवळा अगाध। जगीं तुझें ब्रीद तैसा येईं । ४ ।
सुदामा ब्राह्मण अनाथ दुर्बळ। तेथें तूं केवळ अवतरलासी । ५ ।
ध्रुवासी स्थापिलें उपमन्यु कारणें। क्षीरसागर देणें तैसा येईं। ६ ।
अंबऋषीसाठीं सोशी गर्भवास। दुर्वासा कासावीस तैसा येईं। ७ ।
विदुरासी भक्तपण उद्धवासी जवळी। अर्जुना सर्वकाळीं तैसा येईं। ८ ।
गोपाळा यशोदा नंदासी खेळसी। गायी रानीं चारिसी तैसा येईं। ९ ।
नामा म्हणे मागेन सदा अभयकर। प्रेमाचा उद्धार तैसा येईं ।१०।

१७१०. वेणु वाहोनी सांवळा । गाई चारिसी गोपाळा। १ ।
कां बा न येसि धांवत । विठ्ठल माझें कुळदैवत। २ ।
अंगीं चंदनाची उटी। पदक मिरवलें कंठीं। ३ ।
गळां माळ वैजयंती। सुदर्शन घेऊन हातीं। ४ ।

कासे पीतांबर शेला। विटेवरलिया विठ्ठला। ५ ।
नामा म्हणे पीडिलों भुके। देईं प्रेमाचें भातुकें। ६ ।

१७११. पुलक धर्म रोमांच नाहीं जंव उठले। सजळ नाहीं झाले नयन जंव। १ ।
हरिभक्तिचें सुख कळलें जे म्हणती। लटिकें बोलिजेति उभयलोकीं। २ ।
ऐसा भक्तिप्रेमा देईं जी देवा। सर्व भावें सेवा घडे तुझी। ३ ।
श्रवणीं ऐकतां नाम वाचे बोले। नाहीं सुखावलें मन त्याचें। ४ ।
श्रीहरिचें नाम म्हणवितां न म्हणे। सहज उच्चारणें कैचे त्यासी। ५ ।
दर्दुराचे परी जिव्हा चटचटी। नाम सांडोनी गोष्टी राज्याची करी। ६ ।
देवाच्या मूर्ति संत महंत देखोनी। न बचे लोटांगणीं भावें त्यासी। ७ ।
न लावी त्यांचें रज टकमका पाहात। बुजवण जैसें सेत राखे तैसें। ८ ।
ऐसे कैक प्राणी आहेत मूढमती। हित सांगतां चित्तीं दुःख वाटे। ९ ।
नामा म्हणे केशवा मी तुझें दीन। नेणें तुज वांचोन आन दुजें। १०।

१७१२. पितयाचें भाग्य पुत्रासि पैं नये। विरळा एखादा होय नांव राखा। १ ।
मी तंव अज्ञान झालों तुझे पोटीं। तुझेनि आम्हां तुटी संसाराची। २ ।
होणार तें झालें न चुके कांहीं केलें। विठ्ठलें दुराविलें जीणें मरणें। ३ ।
माझिये अदृष्टीं ऐसेंचि लिहिलें। जें मज निर्मियलें चतुराननें। ४ ।
या विठोबाचे पाय हृदयीं धरावे। तेणें हें तरावें भवदुःख। ५ ।
नेणें पूजाविधि नेणें क्रिया सिद्धी। ऐसा मी अपराधी तारी देवा। ६ ।
अनुपम्य सुख देखिलिया चरणीं। घातली लोळणीं माझ्या चित्तें। ७ ।
बहुत देव माझ्या पाहियेले जीवें। केलें सर्वभावें कुटुंबदास्य। ८ ।
इहीं माझें चित्त केलें तडातोडी। नाहीं सुख घडी देखिलें कांहीं। ९ ।
मग या पांडुरंगें माझी राखियेली लाज। हा माझा पूर्वज प्राणसखा। १०।
अंतरींचें गुज सांगितलें मज। दिलें प्रेमबीज नामनिधि। ११।
सुख दुःखाची निवारिली बाधा। शरीरसंबंधा वेगळें केलें। १२।

आपुलें म्हणोनि कृपेनें न्याहाळिलें । आवडी सांभाळिलें मायबापें । १३ ।
ऐसा मजलागीं स्नेहाळु न विसंबे जीव । त्यां काय याचें व्हावें उतराई । १४ ।
नामा म्हणे मज अनाथालागुनी । न विसंबे निर्वाणीं पंढरीराव । १५ ।

१७१३. भीत नाहीं भीत नाहीं । अखंडहि सावध । १ ।
उघड समाधि उघड समाधि । अंतर बुद्धि निर्मळ । २ ।
गोंविसी कासया गोंविसी कासया । पंढरीराया सांभाळीं । ३ ।
नामा म्हणे जगज्जीवना । नारायणा सांभाळीं । ४ ।

१७१४. करुणा बहुत तुझ्या चरणापाशीं । धांवोनि हृषिकेशी आलों सर्व । १ ।
वाळुवंटीं उभे पताकांचे भार । पाहोनि शंकर वेडावला । २ ।
सूर्य चंद्रादिक घालिती लोटांगण । करी प्रदक्षिणा स्वयें गंगा । ३ ।
नामा म्हणे ऐसें सांगतां बहुत । वेदशास्त्र ग्रंथ ठकावले । ४ ।

१७१५. अगम्य सामर्थ्य नयेचि गणना । तारूनि पाषाणा केलें सम । १ ।
तारिसी वानर अवघेची सेना । तोडिसी बंधना पांडुरंगा । २ ।
काय वनचर जाणती प्रत्यक्ष । परिक्षिती मोक्ष दिस सातां । ३ ।
कृतत्रेतद्वापारांचे आदि अंतीं । नामाचि ते ख्याति म्हणे नामा । ४ ।

१७१६. अलक्ष्या अच्युता सख्या भक्तराया । तूंचि देवराया पांडुरंगा । १ ।
परात्परतरा पार नेणे ब्रह्मा । तूंचि निजधामा स्वयें देसी । २ ।
विश्वामित्रासाठीं विलंब न करीं । बळिचिया द्वारीं भृत्य होसी । ३ ।
नामा म्हणे तुझी माव नेणे कोणी । धांवें चक्रपाणि त्वरें नेटें । ४ ।

१७१७. मजसाठीं काय लाजनोसी देवा । तृणा आणि जीवा साच होसी । १ ।
ते काय पवाडे गमाविली ब्रीदें । ब्रह्मादिकें वृंदें ध्याती कैसीं । २ ।
जाणतां नेणतां सर्वांसी उद्धार । भवसिंधु पार पाववीसी । ३ ।
नामा म्हणे तुझे उपकार ऐसे । दावीं जगदीशा हेळामात्रें । ४ ।

१७१८. हात पाय सर्व मिळोनियां मेळा । चला पाहूं डोळां म्हणताती । १ ।
देखणें तें नव्हे देखतील कैसें । देखण्याची असे सर्व डोळा । २ ।
पंचभूत अंश अंशांत मिळाली । निर्गुणाची खोली देव जाणे । ३ ।
नामा म्हणे तेव्हां तुज पाहों आला । पाहोनि तो ठेला सर्वांभूतीं । ४ ।

१७१९. अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे । १ ।
सांग पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासि नये तुझें । २ ।
कीर्तनीं बैसतां निद्रें नागविलें । मन माझें भुललें विषयसुखा । ३ ।
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति । नये माझ्या चित्तीं नामा म्हणे । ४ ।

१७२०. तुझिया कीर्तना कोण जाय आतां । सख्या भगवंता कृपा करीं । १ ।
भीष्म पहुडला शरांचे पंजरीं । तया प्रश्न करी युधिष्ठिर । २ ।
महाभयेश्वरी विघ्नें निवारिता । सकळां देखतां दांत पाडी । ३ ।
नामा म्हणे तुझी भक्ति अघटित । पवाडे अनंत दाविना कां । ४ ।

१७२१. गुण दोष माझे पाहों नका आतां । तारिसी अनंता मज आतां । १ ।
अगाध महीमा काय वानूं हरी । गोकुळा भीतरी गाई राखी । २ ।
अंबऋषीसाठीं जन्म सोशियले । महत्त्वाचे केले हूड स्वयें । ३ ।
नामा म्हणे तुझे नामाचेंचि बळ । प्रसादें केवळ लाधलों मी । ४ ।

१७२२. भक्ताची अपेक्षा धरोनि अंतरीं । राहे भीमातीरीं पंढरीये । १ ।
अष्टावीस युगें गेलीं विचारितां । निगम सर्वथा नव्हे देखा । २ ।
कटीं कर उभा शिणलें शरीर । धरोनि निर्धार भक्तिभावो । ३ ।
नामा म्हणे आतां नको खटपट । आमुचे बोभाट नको पाहूं । ४ ।

१७२३. कलियुगीं जन मूर्ख शून्यवृत्ति । तारिसी श्रीपति नाम घेतां । १ ।
परमपावना पवित्रा निर्मळा । भक्ताचा सांभाळ करीं देवा । २ ।
देवा तूं दयाळ जिवलग मूर्ति । पुराणें गर्जती वेदशास्त्रें । ३ ।
नामा म्हणे आतां नको भागाभाग । सखा पांडुरंग स्वामी माझा । ४ ।

१७२४. आम्ही कांहीं नेणों तुझा अंत पार । होसी निरंतर निवारीता । १ ।
बहु अपराधी जाण यातिहिन । पतित पावन पांडुरंगा । २ ।
नामा म्हणे ऐसा पातकी पामर । करिसी उद्धार साच ब्रीद । ३ ।

१७२५. घालुनि आसन साधिला पवन । घेनलें जीवन अंतरिक्षीं । १ ।
परहस्तें तृप्ति नव्हे जी दातारा । कृपा करुणा करा केशिराजा । २ ।
जीवाचें जीवन सर्वांचें कारण । धांव मजलागुन केशिराजा । ३ ।
अनाथाचा नाथ हें ब्रीद साचार । झणीं माझा अव्हेर करिसी देवा । ४ ।
विष्णुदास नामा अंकियेला तुझा । निववी केशिराजा प्रेमसुखें । ५ ।

१७२६. विश्वंभर नाम तुझें कमळापती । जगीं श्रुति स्मृति वाखाणिती । १ ।
गौळियाचे घरीचें दहीं लोणी चोरुनी । खातां चक्रपाणि लाजसीना । २ ।
आतां दीनानाथा तुझें ब्रीद साचें । तरी भूषण आमुचें जतन करीं । ३ ।
येर ठेवा ठेवी कायसी आम्हा । विनवितो नामा केशिराजा । ४ ।

१७२७. जगत्रजीवना अगा नारायणा । कां नये करुणा दासाची हे । १ ।
अच्युता केशवा येगा दीनानाथा । सर्वज्ञा समर्था कृपामूर्ती । २ ।
चिद्घना चिद्रूपा विरंचीच्या बापा । करावी जी कृपा सर्वांभूतीं । ३ ।
तुझें म्हणविलें उपेक्षिसी जरी । नामा म्हणे हरी ब्रीद काय । ४ ।

१७२८. पतित पावना धांवसी निर्वाणीं । ब्रीद चक्रपाणि सत्य केलें । १ ।
काय अपराध कोणाचे पाहिले । नाहीं तूं त्यागिलें नष्टखळां । २ ।
अजामेळासाठीं अहार वर्जिले । बीज तें भर्जिलें भवमूळ । ३ ।
नामा म्हणे देवा नागवण वारें । आतां उणें पुरें पाहूं नको । ४ ।

१७२९. परियेसी वासनें संकल्प स्वरूपें । विश्व त्वां आटोपें वश केलें । १ ।
ब्रह्मादिक तुझे इच्छेचें खेळणें । विषयाकारणें लोलिंगत । २ ।
परि माझ्या मना सांडी वो समर्थे । देई मज दीनातें कृपादान । ३ ।

वेदशास्त्र वक्ते व्युत्पन्न थोरले। तृणापरीस केले हळुवट । ४ ।
कृपणाचे द्वारीं होऊनि याचक । विसरले सकळिक आत्महित। ५ ।
एके अभिमानें भ्रांत झालें चित्त। भजती इंद्रियांतें दीनरूपें। ६ ।
शब्द स्पर्श रूप रसगंधे फांसा । गुंतलें दुराशा तळमळित। ७ ।
एकातें लाविला पुत्र कलत्र धंदा । नेणती ते कदा सुखगोष्टी। ८ ।
जन्ममरणांचे जुंपियले पांतीं । अकल्प भोगिती नाना योनी । ९ ।
ऐसे तुझे संगें बहु झाले हिंपुटी । म्हणोनि पाडिली तुटी संतसंगा। १०।
नामा म्हणे पुढती गांजिसील मज। येईल केशिराज सोडवणें । ११।

१७३०. सांडोनि संसार झालों मी अंकित। ऐशियाचा अंत पाहूं नको। १ ।
पातकी मी सत्य पातकी मी सत्य। पातकी मी सत्य पांडुरंगा। २ ।
माझे गुण दोष न धरिसी चित्तीं। थोरपण ख्याति दावी आम्हां। ३ ।
ऐसा अपराध आणूं नको मना। पंढरीच्या राणा नामा म्हणे। ४ ।

१७३१. देशी परदेशीं झालों तुजवीण। माझें समाधान कोण करी। १ ।
चातक चकोरापरी पाहें वास। तूं कांहो उदास पांडुरंगा। २ ।
नामा म्हणे चित्त देई माझ्या बोला। जीव तो उरला निघों पाहे । ३ ।

१७३२. मुंगीचिया गळां बांधोनियां मेरु। तेणें हा प्रकारू कळों आला। १ ।
माळियाचे पोरें लपविलें पोटीं। तेणें जगजेठी सुख मानी । २ ।
कुलालाचे हातीं तुडविलें मूल । दाखवी नवल तयासाठीं । ३ ।
मजसाठीं काय धरियेले मौना । धांव नारायणा नामा म्हणे। ४ ।

१७३३. वत्साकारणें मोहाळु गाय। अनुसरल्या पान्हाये। १ ।
तैसें तुज वांसरूं बांधलों मी असें। मज लावीं कासे आपुलिया। २ ।
मज बांधलें त्वां संसारखुंटीं। माझी माउली दूर वैकुंठीं। ३ ।
थोरू करी मना लाहो। तंव आणिकें नेती पान्हावो। ४ ।
थोरु नव्हे याचि परी। नामा विनवितसे मुरारी। ५ ।

१७३४. संसाराच्या आगी आहाळलों आंगीं। निववीं गा श्रीहरी अमृतदृष्टी। १।
अनाथ अपराधी दुर्बळ दुराचारी। कृपाळु बा हरी तारीं मज। २।
नामा म्हणे विठो कृपेचा कोंवळा। जाणसी कळवळा अनाथाचा। ३।

१७३५. चांग आंदोनियां नेइजे जैं मुळीं। चालतां पाउलीं मृत्यु जैसा। १।
तैसी परी मज झाली नारायणा। दिवसें दिवस उणा होत असे। २।
वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी। वेंचे तैसी घडी आयुष्याची। ३।
नामा म्हणे हेंही लहरीचें जळ। आटत सकळ भानुतेजें। ४।

१७३६. मज गांजिल्याचा धांवा। सावधान परिसावा। १।
विठो सुजाणाच्या राया। धाव माझ्या करुणालया। २।
मोहोपाशीं मज बांधिलें। थोर वैर त्वां साधिलें। ३।
माझें मन हें पामर। भ्रांत हिंडे दारोदार। ४।
नामा म्हणे काय करूं। तुजविण भूमिभारू। ५।

१७३७. विषयीं आसक्त झालें माझें मन। न करीं तुझें ध्यान पंढरीराया। १।
नाथिले संकल्प करीं नानाविध। तेणें थोर खेद पावतसें। २।
ऐसा मी अपराधी दुराचारी देवा। भेटसी केशवा कवणे परी। ३।
आयुष्य सरे परी न सरे कल्पना। भोगवी यातना नानाविध। ४।
जन्ममरण कष्ट भोगितां संकटीं। होतसें हिंपुटी येरझारीं। ५।
माया मोह रत भ्रांत माझें चित्त। चुकलें निजहित नारायणा। ६।
तूं अनाथा कैवारी म्हणोनि धांवा करीं। सोडवीं मुरारी म्हणे नामा। ७।

१७३८. काय गुण दोष आणितांसी मना। नको नारायणा अभक्तची। १।
शरीरसंबंधा सुचती अंतरें। काय म्यां पामरें आवरावें। २।
नामा म्हणे मज नागविसी दातारा। नको बा अंतरा पाहों अंत। ३।

१७३९. विठ्ठल विठ्ठलवरदे पुंडलीकवरदे। अनंत अभेदें रूपें तुझीं। १।
येईंगे विठ्ठले मजलागीं झडकरी। बुडतों भवसागरीं काढीं मज। २।

आक्रांता अवसरीं स्मरिलें गजेंद्रें । दीनानाथें ब्रीदें सत्य केलीं । ३ ।
स्मरली संकटीं द्रौपदी वनवासीं । धांवोनि आलासि लवलाही । ४ ।
प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं । संकटापासोनि राखियलें । ५ ।
नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें । अखंड पाहतसें वास तुझा । ६ ।

१७४०. नेत्र तान्हेले पाजीं पाणी । पंढरीचे मायबहिणी । १ ।
बाळ पालखीं करी सोर । माते आला निद्राभर । २ ।
जागी न होसी गे माय । प्राण जातो करूं काय । ३ ।
नामा म्हणे चक्रपाणी । चरणीं घातली लोळणी । ४ ।

१७४१. आतां केशिराजा हेंचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसे । १ ।
देह माझा असो भलते ठाईं । चित्त तुझे पायीं असों द्यावें । २ ।
काळाचें खंडन घडलें चिंतन । जन तनुधन विन्मुखता । ३ ।
कफवात पित्त देह आवसानीं । ठेवावें वारूनी दुरितें हो । ४ ।
नामा म्हणे तूं या काळाचा जनिता । येथेंचि ऐक्यता सकळांची । ५ ।

१७४२. तुजविण देवा नेणों मी आणिका । पंढरीनायका सोयरिया । १ ।
देईं देईं भेट न करी उदास । काय पाहातोस मागें पुढें । २ ।
अंतराचा ठेवा जाणता तूं सर्व । काय म्यां सांगावें विवंचोनि । ३ ।
नामा म्हणे किती घेईं या लौकरी । अनाथ मी द्वारीं उभा असें । ४ ।

१७४३. केलिया सुधापान होतां ये अमर । तरि तुझा पार न कळेचि । १ ।
देव देव नेणों भुलोनियां गेलें । तुज विसरले मति मंद । २ ।
मानव विषईं लुब्धोनि बुडाले । तेहि पैं गुंतले मोहफांसा । ३ ।
नामा म्हणे मी जगामाजी रंक । तुझा पार देख केविं कळे । ४ ।

१७४४. किती धांवा करूं मागें या समर्था । रखुमाईच्या कांता पांडुरंगा । १ ।
काय जालें मज मोकलिलें देवा । प्रारब्धाचा ठेवा जैसा तैसा । २ ।

मागें तारियेले भक्त ते अपार । झाली मजवर निष्ठुरता । ३ ।
नामा म्हणे किती करूं लोकचार । जाणसी अंतर आमुचें तूं । ४ ।

१७४५. फुंदत फुंदत न देखेचि कांहीं । प्रेमाचिये सोई धांवतसे । १ ।
नामें पिसें नामें पिसें । नामें पिसें प्रेमाचें । २ ।
विष्णुदास नामा प्रेमाचिये माळीं । जीवें भावें केशवीं घातली मिठी । ३ ।

१७४६. नको नको देवा संतति संपत्ति । खोटी त्याची रीति दिसताहे । १ ।
तुझे ठायीं मन राहे ऐसें करी । प्रार्थना श्रीहरी वारंवार । २ ।
प्रपंचाच्या ठायीं सुख मानिताती । नेणों त्याची गति कैसी होय । ३ ।
नामा म्हणे दीन दारीं मी ठाकलों । कासाविस जालों कामक्रोधें । ४ ।

१७४७. विठो माझें रे मन । करिताहे तळमळ ।
तुझिया वियोगें जाण ।
जाऊं पाहे माझा प्राण । न धरी जीवा मी तुझी आण रे । १ ।
धाकुनि तूं लवलाहीं । लवकरी भेट देई ।
माझें आरत तुझे पाईं रे । २ ।
तुजविण नाहीं चित्तीं । गणगोत संपत्ती ।
नामया केशवीं अति प्रीती रे । ३ ।

१७४८. जातांत जनांत वहलतें अंडीं । तरी पुसणें माझें नें सांगा तुम्ही । १ ।
प्रेम तें म्हणिजे कासया ऐसें । भोगिजे तें कैसें सांगा मज । २ ।
भक्ति ते कैची कासयाचें नांव । भावाचें वैभव कोणतें भोगी । ३ ।
नामा म्हणे हें तयासींच कळे । जें अहंभावावेगळे निरंतर । ४ ।

१७४९. जीव तूं प्राण तूं । आत्मा तूं गा विठ्ठला । १ ।
जनक तूं जननी तूं । सोयरा तूं गा विठ्ठला । २ ।
माझा गुरु तूं गुरुमंत्र तूं । सर्वस्व तूं माझें म्हणे नामा । ३ ।

१७५०. नावडे प्रपंच तापत्रय माया। येई धांवोनियां केशिराजा। १।
भवभयें फार भ्यालों जन्मांतरा। चौऱ्यांशींचा फेरा चुकवितो। २।
सत्कथा श्रवण नाम संकीर्तन। न घडे भजन मज देवा। ३।
नवविधा भक्ति कोणें केली कैसी। नामा म्हणे ऐसी दावीं सदा। ४।

१७५१. तापत्रय अग्निचीं जळतसे गेगडीं। आहाळोनि कोरडी झाली काया। १।
केव्हां करुणाघना वोळसी अंबरीं। निववीसी नरहरी कृपादृष्टीं। २।
शोकमोहाचिया झळंबलों ज्वाळीं। क्रोधाचे काजळीं पोळतसें। ३।
चिंतेचा वोणवा लागला चहूंकडां। प्राण होय व्याकुळा धांव देवा। ४।
धांव धांव करुणाघना तुजविण। नामा म्हणे प्राण जातो माझा। ५।

१७५२. भेटिलागीं माझा फुटतसे प्राण। काया वाचा मनें जीवेंभावें। १।
जया देखे तया पुसें हेंचि मात। कैं मज अनंत बोलावील। २।
संतसमागमें दसरा दिवाळी। ठेवूनि निढळीं बाहे सदा। ३।
सखे पंढरीचे येती वारकरी। आर्त निरंतरीं त्यांचे पायीं। ४।
नामा म्हणे ऐसें करी दंडवत। आमुतें पुनीत करी बापा। ५।

१७५३. भेटीची आवडी उत्कंठित चित्त। न राहे निवांत एके ठायीं। १।
जया देखे तया हेंचि पुसे मात। कां मज पंढरीनाथ बोलाविना। २।
कृपेचा सागर विठोबा लोभापर। माझा कां विसर पडिला त्यासी। ३।
माहेरीची आस दसरा दिवाळी। बाहे ठेवूनि निढळी वाट पाहे। ४।
सखे वारकरी पंढरीस जाती। निरोप त्या हातीं पाठवीन। ५।
निवुंजला नामा कंठीं धरिला प्राण। करी तुझें ध्यान रात्रंदिवस। ६।

१७५४. भेटी लागीं जीवा लागलीसे आस। पाहें रात्रंदिवस वाट तुझी। १।
पौर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन। तैसें माझें मन वाट पाहे। २।
दिवाळीच्या मुळा मोठी आस केली। पाहतां वाटुली मायबापा। ३।
नामा म्हणे आम्ही लेंकराची जाति। भेटावया खंती वाटतसे। ४।

१७५५. अजामेळ ग्त व्रामी जन्मात । अंतकाळीं तूतें पाचारीना । १ ।
आपल्या पुत्रासी म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें । २ ।
कुंटिणीनें तप काय केलें होतें । राव्या मिसें तेथें सुखी केलें । ३ ।
गांवळियाचीं पोरें वोंगळ सैबडीं । त्यांची तुज गोडी उच्छिष्टाची । ४ ।
नामा म्हणे आतां किती म्यां वोलावें । मज नुपेक्षावें ब्रीदासाठीं । ५ ।

१७५६. अच्युता केशवा मुकुंदा माधवा । देवाचिया देवा कृपासिंधु । १ ।
दाखवी पाउलें येतुली प्रार्थना । जगाच्या जीवना दीनानाथा । २ ।
त्राहे त्राहे त्राहे पतित किंकर । न करी अव्हेर म्हणवुनि । ३ ।
तुजविण कांहीं नेणें मी आणिक । उदास निशंक उभा द्वारीं । ४ ।
नामा म्हणे माझी प्रार्थना केतुली । भक्तीचिया माउली म्हणवूनि । ५ ।

१७५७. आसनीं शयनीं चिंती ऐसें देवा । सदा संग द्यावा हरिदासाचा । १ ।
प्रीती करुनी दुणी नाम तुझें द्यावें । सुख अनुभवावें विचारुनी । २ ।
ऐसे मनोरथ कोण करिल पूर्ण । तुज एकाविण पंढरीराया । ३ ।
सुखाचा सागर त्रिभुवनींचा राजा । मायबाप माझा पांडुरंगा । ४ ।
सर्वज्ञ चतुर दीनाचें माहेर । घेतलासे भार अनाथाचा । ५ ।
अनंत जन्मांचा शरणागत तुमचा । कायामनेवाचा विनटलों । ६ ।
नामा म्हणे मज निरवी संतजना । मी तुझा पोसणा दास म्हणोनी । ७ ।

१७५८. धांव धांव आतां पडिलों संकटीं । संसाराची मोठी आढी देवा । १ ।
पंढरीच्या राया सुखाच्या सागरा । नुपेक्षितां थारा देवापायीं । २ ।
कल्पनेची वेली वाढली अतुट । प्रारब्धाचा खुंट बळावला । ३ ।
मायामोह श्रम फैलावला आंगीं । ऐसिया आपंगीं नाहीं कोणी । ४ ।
नामा म्हणे व्यर्थ जातों मी वाहूनी । काढी ऐसा कोणी दुजा नाहीं । ५ ।

१७५९. निंदा आणि स्तुति तुझीच करणें । आणिकांचे कां घेणें गुणदोष । १ ।
आतां माझें चित्त असो तुझे चरणीं । अगा चक्रपाणि पांडुरंगा । २ ।

वैर अथवा सख्य करणें तुझें ठायीं। न पडो हृदयीं विसर तुझा। ३ ।
दास्यत्व करावें गोपाळांचे परी। असो तुजवरी सर्व लोभ। ४ ।
जिणें अथवा मरणें तुमचिये द्वारीं। उदास नरहरी करिसी झणी। ५ ।
नामा म्हणे थोर शिणलों पंढरीनाथा। स्वामी तुझी नेणतां प्रेमसुख। ६ ।

१७६०. नेत्र माझे रोडले आठवे माहेर। कैं भेटेन निरंतर बाईयांनो। १ ।
चतुर्भुज विठ्ठलु कैं देखेन डोळां। भक्तांचा जिव्हाळा जीव माझा। २ ।
येणें शोकें रे व्याळलों शरीरीं। आठव तो हरी मी काय सांगूं। ३ ।
चारी भुजा उचलोनि क्षेम देईल। कैं मज नेईल पंढरपुरा। ४ ।
काम चित्तीं नलगे आतां कांहीं मज। कैं भेटेल राजा पंढरीचा। ५ ।
त्यासि आठवितां हृदय वो फुटे। तो कैं मज भेटे बाप माझा। ६ ।
येणें देह न पवनी मग काय येऊनि करितो। सांगा काकुळती रखुमाईसी। ७ ।
वामांगीं रुक्मिणी कैं देखेन दोन्ही नयनीं। फेडीन पारणीं डोळियांचीं। ८ ।
जंव जंव आठवती तंव तंव उभड येती। कोणी न सांगती विठ्ठलासी। ९ ।
ऐसें श्रवणींचें सुख कैंचेंन वो देखें। येथें येऊनि बहुतेकें काय करितो। १० ।
गरुडटकें अवघे आकाशीं ओळले। येवोनि सांगितलें विष्णुलोकीं। ११ ।
मग जावोनियां नया टाया पाहे पंढरीराया। लागेन मी पायां तयाचिये। १२ ।
याचि लागोनियां आलों लवडसवडी। सांडियेली थडी मग रोग्रिलासी। १३ ।
गरुडावरी आरूढ बाप माझा झाला। मज न्यावया आला बाईयांनो। १४ ।
येणें हर्षे संतोष कोठेंच न मावे। भेटला विठ्ठल माय रुक्मिणीसहित। १५ ।
नामा जातसे माहेरा एकला पंढरपुरा। हरी दातारा संसारा वेगळें करीं। १६ ।

१७६१. माझिया मनाचें भ्रमणें जें जें ठायीं। तेथें तेथें राहीं पांडुरंगा। १ ।
भीमा चंद्रभागा वैकुंठ पंढरी। दावीं दृष्टीभरी निरंतर। २ ।
पुंडलिका समोर लक्ष निरंतरीं। तैसाची अंतरीं येऊनि राहें। ३ ।
कटीं कर विटे समचरण गोमटें। पाहातां अनि नेटकें हेंचि ध्यान। ४ ।

पुर्वी माझी आस तूं बाप माउली । करीं मज साउली पद्माकरें । ५ ।
नामा म्हणे झणीं करिसी उदास । हांती कासावीस प्राण माझा । ६ ।

१७६२. राहोनि भोंवतीं नामा वाट पाहे । श्वास न समाये दुःखें पोटीं । १ ।
म्हणती मायेनें वैर साधियलें । विपर्वी बुडालों सांगों कोणा । २ ।
भक्तां अंतरंग देतोसी तूं देवा । भेटसि केशवा पूर्ण स्थिती । ३ ।
पूर्ण पान्हा धेनु घालीत वोरसें । वत्स थोर हर्षे पान करी । ४ ।
देखोनि पैं स्वामी बळेंचि बांधिलें । तळमळीत ठेलें थोर आशा । ५ ।
कृपणें संपत्ति जोडिलिया राशी । हिरोनियां येती बळियानें । ६ ।
आळवी करूणा धांवे दाहिदिशा । तैसें हृषीकेशा झालें मज । ७ ।
क्षुधाक्रांत जेविं भोजनीं बैसले । कोणासीं न बोले मातु कांहीं । ८ ।
उठविते वेळीं नव्हतांचि तृप्ति । तैसी दुःख प्राप्ति झाली मज । ९ ।
अघोर संसार मोहोमहापुरीं । अखंड मुरारी सुखरूप । १० ।
नामा म्हणे विठो अनाथाच्या बंधु । देईं सुखसिंधु मज आतां । ११ ।

१७६३. पंढरी माहेर विठ्ठल माउली । धांवोनि हे बोली सांगावी । १ ।
संसारगांवीं लेंकी असे तुमची । चिंता कां तियेची सांडियेली । २ ।
सासुरवासिणी पाहातसे वाट । सांगावे कष्ट विठो माउलीये । ३ ।
अखेर माझा असे अविचार भावा । आशा तृष्णा जावा वहिणी कां । ४ ।
एकलिये माते खेदती बहुतें । एकांतें तुमतें आठवीन । ५ ।
चांडाळी हे सासु तृष्णा पैं पापिणी । कांहीं केल्या धणी पुरों नेदी । ६ ।
रात्रंदिवस नाहीं कामाचा शेवट । जिवित्वाचा वीट येत असे । ७ ।
सखी सांगतिणी तिसी नाहीं भेटी । अज्ञान हें पोटीं वाढतसे । ८ ।
सुखाचे डोह दुःख कां नावडे । ऐसें कैंचि घडे तुजविण । ९ ।
रखुमाई माता पांडुरंग पिता । मी त्यांची दुहिता म्हणे नामा । १० ।

१७६४. काशियें कनोजा द्वारके गुजर। कानडा विठ्ठल पंढरीये। १।
मायबापें माझीं विठ्ठलरुक्मिणी। पंढरी पाटणीं माहियेर। २।
पर्वत शिखरीं ब्रीद नारायण। सोयरा सज्जन पंढरीचे। ३।
बारसी भगवंत तेरसी तिखया। विठ्ठलु सोयरिया पांडुरंगा। ४।
विटेवरी नीट समचरणीं उभा। पुंडलीकाचे लोभा भक्तिलागीं। ५।
विष्णुदास नामा चरणीं उतावेळु। करावा सांभाळु अपत्याचा। ६।

## ** प्रेमकलह **

१७६५. बरें आम्हां कळों आलें देवपण। आतां गुज कोण राखे तुझें। १।
मारिलें कां देवा मज आजिवरी। आतां बरोबरी तुज मज। २।
जें आम्ही बोलतों आहे तुझे आंगीं। देईन प्रसंगीं शिव्या तुज। ३।
निलाजऱ्या तुज नाहीं यातिकुळ। चोरटा शिंदळ ठावा जना। ४।
नामा म्हणे मज खवळीलें भांडा। आतां धीर तोंडा न धरवे। ५।

१७६६. शरण आल्याचा न पाहसी अवगुण। कृपेचें लक्षण सहज आहे। १।
गजेंद्र गणिकेची राखिली त्वां लाज। सोडविला द्विज अजामिळ। २।
सांगणें हें काय तुम्हीं दिलें देवा। उदारा केशवा मायबापा। ३।
नामा म्हणे झणीं अव्हेरिसी मज। जगीं होईल लाज थोर तुज। ४।

१७६७. निर्गुण निराकार होतें शुन्यपणें। आम्हासी असणें तेचि ठायां। १।
आपुली करणी तुम्ही न विचारोनी। दुसरीया झणीं बोल ठेवा। २।
सुखें एकरूप होतों तुझे पोटीं। कामया हे सृष्टी वाढविली। ३।
विकाराचें मूळ दिधलें हें शरीर। तेणें कष्टी थोर झालों आम्ही। ४।
पाप पुण्य दोन्हीं लाविलीं सांगातें। म्हणऊनि सुखातें अंतरलों। ५।
यमलोकीं वास रौरव यातना। तेणें नारायणा धाक थोर। ६।
खातां जेवितां तें न लागेच अंगीं। झालों तों उद्वेगी रात्रंदिवस। ७।
ऐसे देह आम्हां कासया दिधले। काय मागितलें आम्हीं तुम्हां। ८।

सृष्टि पूर्वी पाप नव्हतें ते गा हरि। कासया श्रीहरी कष्टी केलें। ९।
वेदशास्त्रभय आम्हांसी लाविलें। तें तुम्हीं टाकिलें एकीकडे। १०।
वेदशास्त्रवचन चुकल्या अवचिता। गोसावीजी होतां दंडावया। ११।
मागां चुकलेती तें ठेवी एकीकडे। आतां तरी पुढें सांभाळावें। १२।
एकरूप तुम्ही होतेती निर्गुणीं। तेथें आमचें कोणही बोलों आलें। १३।
निर्गुण सांडूनि तुम्ही व्हावें जी सगुण। ऐसें तुम्हां कोणें बोलाविलें। १४।
आपुलिये इच्छे ब्रह्मांडें रचिलीं। काय मांगितलीं जी आम्हीं तुम्हां। १५।
लक्ष्मीचे विलास भरिले नाना वेश। हा काय उपदेश आम्हीं केला। १६।
विश्व हें निर्मुनी झालेती गोसावी। हे काय सांगावी आम्ही केली। १७।
जें तुम्हां पाहिजे तें तुम्हीं निर्मिलें। आपणासवें केलें कष्टी आम्हां। १८।
कल्प जन्मांतरीं योग यागांतरीं। जवळी श्रीहरी होतों आम्ही। १९।
तुम्ही तेथें आम्ही आम्ही तेथें तुम्ही। विचारावें स्वामी पांडुरंगा। २०।
तुम्हां आम्हां कांहीं वेगळीक नाहीं। बोलोनियां काइ दावूं आतां। २१।
आम्हांसि तुम्ही काय सोसिलें अधिक। ठकितसा लोक कैसें नव्हे। २२।
तुम्हांसी अवतार कोरडें काष्टीं। तुमच्या नामें कष्टी दैत्यें केलें। २३।
तुम्हासी मातेनें धाडियेलें वना। आमुची विटंबना बहुत जाहली। २४।
वल्कलें वेष्टोनी जालेती तापसी। वेष आम्हां देसी मर्कटाचे। २५।
जवळीच असुनि हरविली कांता। आम्ही शुद्धि करतां कष्टी जालों। २६।
तियेचे वियोगें शोक करा वनीं। वानरें होऊनि आम्हां मरण घडे। २७।
तुम्ही स्वामीपणें बैसलिये ठायीं। आम्ही शिळा डोइं वाहियेल्या। २८।
लंकेपुढें आम्हीं वेंचियेलें प्राण। तुम्ही ते दुरून बाण टाका। २९।
अयोध्येचे राज्यीं तुम्हां सिंहासन। आमचे कपाळीं हीन चुकेचिना। ३०।
वस्त्रें अलंकार तुम्हांसी ते घोडे। आम्ही ते उघडे पायीं चालों। ३१।
चाड सरलिया नाहीं आठवण। कांहो लक्ष्मण दवडिला। ३२।
लोक म्हणो तरी पाठीं सहोदर। जालेति निष्ठुर देवराया। ३३।

तुम्हां एकलेनि न करवे गमन। सर्व अवघेजण आलों आम्ही ।३४।
कंसाभेणें तुम्हीं राखियेल्या गाई। तेथें आम्ही काई नव्हतों देवा।३५।
भोगा स्वामीपण राखितां गोधनें। टकोनियां खाणें आमच्या रोट्या।३६।
सर्पाचेपोटीं आम्ही घावरलोंसे विखें। तुम्ही आपुले सुखें वेगळेची।३७।
खेळतां यमुनेडोहीं टाकियेली उडी। आम्ही थडी थडी रुदन करूं।३८।
गोवर्धन गिरी आमुचिये शिरीं। तुम्ही नानापरि वेणू वाहा।३९।
आम्हां चोरून नेलें वर्षभरी। तुम्ही आपुले घरीं सुखी असा।४०।
असो आतां चाड नाहीं येणेंवीण। आमुचें निर्वाण पाहूं नका।४१।
आमुचे दिवस काय वांयां गेले। स्वामीया उगले राहा तुम्ही।४२।
कल्पाचे शेवटीं तुम्हां आम्हां भेटी। तेथें पैं ह्या गोष्टी कळों येती।४३।
नामा म्हणे आम्ही पाईक फुकाचे। धारक नामाचे दास तुझे।४४।

१७६८. नाहीं भीड चाड बोलसी आगळें। तोंडाचेनि बळें अरे नामया।१।
आपुलिया चाडें करीतसा सेवा। उभारू कां लावा आम्हांलागीं।२।
माझ्या ठायीं काय उणें मज होतें। मज देउनी सरतें केलें तुम्हीं।३।
निर्गुण निराकारीं होतों निजानंदें। त्यासि तुम्हीं भेद केला देखा।४।
संकल्प वासना नाना भजन मतें। शुद्ध स्वरूपातें भेद झाला।५।
वैकुंठ निजधाम सर्व सुखरासी। तें सांडोनि तुम्हांपासीं येणें झालें।६।
शेषाच्या आरूवरी निद्रा क्षीरसागरीं। सांडोनि वेषधारी झालों आम्ही।७।
दाहीं अवतारीं युगयुगांतरीं। अनुष्ठान थोरी केलें नामया।८।
अवतारीं कष्ट झाले थोर थोर। मारिले असुर तुम्हांलागीं।९।
नाना योनी दुःखें भोगा अनंत जन्में। निरसलीं नामें माझ्या एका।१०।
विषय भोगितां स्वरव वास। मन केलें उदास वैराग्येंसी।११।
प्रपंच प्रज्वाळ अग्नीचें कल्लोळ। सुखरूप सीतळ आत्मज्ञानें।१२।
माया हे दुस्तर नकळे इचा पार। ते नदी उतार केली तुम्हां।१३।

कामक्रोधादिक षड्वैरी विकार । महा थोर थोर वश्य केले। १४।
परदारा परधन परनिंदा परपीडा। दिधलिया झाडा दया धर्मा। १५।
अहंकार अविवेक निरसली भ्रांती। सुखरूप शांती दिधली तुम्हा। १६।
अविश्वास अलोट मेरुहुनी घनवट। देउनी भावार्थ पीठ केलें। १७।
देऊनियां ज्ञान निरसिलें अज्ञान। येणें समाधान झालें तुम्हां। १८।
अधर्म अन्याय अनाचारा मूळ। देउनी स्वधर्म तारीयेले। १९।
ऐसें सर्वांपरी म्यां केलें गोमटें। परी शब्द उफराटे न संडीसी। २०।
रात्रंदिवस तुज लागला छंद। आम्हांसी विनोद करों पाहसी। २१।
अवविद्या परीस तूं झालासी धीट। बोलसी वोखट अमर्याद। २२।
भक्तीचिया भीडा म्यां बहु साहिलें। त्वां नाहीं पाहिलें मागेंपुढें। २३।
जें आम्हीं पेरिलें तेंचि फळ आलें। उफराटें झालें तुझिया कृपें। २४।
पहिलीच चुकी पडियेली थोरी। तुझे अधिकारी झालों आम्ही। २५।
खांदीं बैसलें तें नुतरे खालतें। तैसें हें आमुतें बोढवलें। २६।
मलगी खेळवितां चुंबितां वदन। तें देतां टाकुनि मिठी घाली। २७।
तुझा त्याग करतां कोपतील संत। हांसती समर्थ पिसून लोक। २८।
सृष्ट्यादिक व्यापार राहिला परता। तुजसीं बोलतां न पुरे वेळ। २९।
कांहीं न मागसी देतांही न घेसी। अखंड जीवेंसी जडोनि ठेलासी। ३०।
वाढवितां भक्ति तुज नाहीं तृप्ती। काय करिसी अंतीं न कळे मज। ३१।
मागें भक्त आम्हीं बहुत देखिले। उठोनियां गेले क्षणामाजी। ३२।
अवतार अवतारीं नव्हेसी परता। संबंध तुटतां न दिसे तुझा। ३३।
नामा म्हणे देवा होईं सावधान। परीयेसी वचन एक माझें। ३४।

१७६९. अपराधाविण बळी। घातला पाताळीं।
सवें कणव उपजली। द्वार राखिसी तयाचें। १।
गाऱ्हाणें सांगावें कवणा। अगा केशवा सुजाणा।
कोणी आणिक तुजविणा। नाहीं दुसरा आम्हातें। २।

बाळमित्र सुदामा सर्वे जेवी । धान्य जो मागे गांवोगांवीं ।
विपत्ति त्याची दूर व्हावी । म्हणून दिधली राणीव । ३ ।
तुझें नाम न तोंडीं । वसुदेव देवकी बांधोडी ।
कंसा केली धाडी । ऐसी विपत्ति दाखवुनी । ४ ।
इंद्र वर्षे शिळा धारा । पर्वत केला सामोरा ।
इंद्रा लाविला दरारा । एवढी विपत्ति दाखवुनी । ५ ।
जोहरीं सूदलें पांडवां । सर्वेचि उपजली कणवा ।
त्यासी केला त्वां रिघावा । आंगीं पाहण्या धांवसी । ६ ।
सभा पिशुनाची दाटली । द्रौपदिकाया आंसुडली ।
तिये वस्त्रें पुरविलीं । येवढी आपदा दाखवुनी । ७ ।
दैत्यें गांजिला प्रल्हादु । तुझ्या नामाचा प्रसादु ।
ऐसा करूनि विनोदु । तया दैत्या वधियेला । ८ ।
विभीषण हाणितला लाथां । लंका दिधली त्या उचिता ।
कृपा करें रघुनाथा । समर्थ केला तये वेळीं । ९ ।
गजेंद्र पानेडी । धरिला यमदूत सुसरीं ।
वैकुंठीहूनि घालिसी उडी । येवढी आपदा दाखवुनी । १० ।
आम्हां डिंगराचें बोलणें । अनाथनाथा परीसणें ।
विष्णुदास नामा म्हणे । शाहणें व्हावें यापरतें । ११ ।

१७७०. पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।
पतितपावन नव्हेसी म्हणुनी जातों माघारा । १ ।
घ्यावें तेव्हां द्यावें ऐसा असशी उदार । काय धरूनि देवा तुझें कृपणाचें द्वार । २ ।
सांडीं ब्रीद देवा आतां नव्हेसि अभिमानी । पतितपावन नाम तुझें ठेवियलें कोणीं । ३ ।
डोंगट घेऊनी हातीं दंवडी पिटीन तिहीं लोकीं । पतितपावन देवा पर्गे तूं मोठा यातकी । ४ ।
नामा म्हणे देवा तुझें न लगे मज कांहीं । प्रेम असोंदे चित्तीं म्हणूनि लागतसें पायीं । ५ ।

१७७१. जाणमीं नें करीं कृपाळुवा हरी। लाज सर्वांपरी आहे तुज। १।
अरुप साविडें मी कांहीं नेणें वेडें। जन्मोनि सांकडें केलें तुज। २।
बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं। बहुत केले सुखी शरणागत। ३।
नाहीं तुझी सेवा केली मनोभावें। लोभ दंभ गर्व भ्रांति सदा। ४।
नामा म्हणे मज होताती विपत्ति। सोडवीं श्रीपति येथोनियां। ५।

१७७२. कामादिक वैरी लाविले पाठिसीं। निश्चिंत हृषिकेशी बैसावया। १।
तुज आम्ही कष्टी करितसों फार। म्हणोनि करकर टाळूं पहासी। २।
परि देवा आम्ही न सोडूं तुम्हांसी। आपुले मनासीं विचारावें। ३।
नामयासी सलगी आधिच कां द्यावी। मग कां करावें उपेक्षित। ४।

१७७३. मागें तुझी कास धरियेली ज्यांनीं। वायां नाहीं कोणी गेलीं देवा। १।
मजवरी ऐसी निर्दया कासया। दर्शन द्यावया उशीर कां। २।
जीव पायावरी ठिधला रे बळी। रूपेंचि न्याहाळी बांधुनियां। ३।
नामा म्हणे अंत पाहासी कासया। सर्व जाणतिया केशिराजा। ४।

१७७४. साचपणें ब्रीदा मांडयीन तुझ्या। आतां केशिराजा पण हाचि। १।
लबाड तूं देवा लबाड तूं देवा। लबाड तूं देवा ठावा आम्हा। २।
काय मूर्खपणें सांगसील गोष्टी। थोरपणें मोठा पुरे आतां। ३।
नामा म्हणे काय खवळिसी आम्हा। लाज नाहीं तुम्हा कोणेविशीं। ४।

१७७५. काय केलें मागें कोणाचें तूं बा। शेवटीं वानरें संग करी तें। १।
संगें करूनियां हिंडे रानोरान। दशरथा खूण चुकविसी। २।
काय काय तरी सांगों तुज गुण। भिल्लिणीची आण सत्य मानी। ३।
सत्य मानी वाळी वशिष्टासहीत। नामा म्हणे मात ही पुरातन। ४।

१७७६. पंढरीनिवासा सख्या पांडुरंगा। करी अंगसंगा भक्ताचिया। १।
भक्त कैवारिया होसी नारायणा। बोलतां वचन काय लाज। २।

मागें बहुतांचें फेडियलें ऋण। आम्हांसाठीं कोण आली धाड। ३ ।
वारंवार तुज लाज नाहीं देवा। बोल रे केशवा म्हणे नामा। ४ ।

१७७७. त्याचिये चाड भोग्याचें आनंद । येरवीं त्याचें नांव कोण घेतें। १ ।
सीतज्वरामुळें खावी नंद पुडी । येर कडु कुडी कोण सेवी । २ ।
सद्बुद्धिकारणें संतांचे गौरव। येरवीं त्यांचें नांव कोण पुसे। ३ ।
रोगामुळें पाहे वैद्याचें कारण। येरवीं कधीं कोण पुसे तया। ४ ।
तैसा नामा जगीं अगत्या अगत्य। असत्यासी सत्य न म्हणे कधीं। ५ ।

१७७८. उल्मिा प्रपंच परि हा लटिका। तेणें तुज व्यापका झांकियेलें । १ ।
तैंसियाच्या मज घालोनियां खेवा। स्वामिद्रोहि देवा करिसी कैसा । २ ।
मेरूचिया गळां बांधोनि मशक । पाहसी कवतुक अनाथनाथा। ३ ।
नामा म्हणे देवा कळली तुझी माव। माझा मी उपाव करीन आतां । ४ ।

१७७९. कोठें मी रे तुझा धरूं गेलों संग। लावियलें जग माझे पाठीं । १ ।
सर सर परता अगुणा गोपाळा। नको लावूं चाळा खोटा येथें। २ ।
रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति । न देखें भोंवतीं मी हीं माझीं। ३ ।
नामा म्हणे तुम्ही जीवींच बैसलां। बोलाचिया बोला दावोनियां। ४ ।

१७८०. कळला कंटाळा आला नारायणा। रुक्मिणीरमणा भावें तुज। १ ।
लक्ष्मीचे प्रीती वेधलेसे मन । दीनांचें वचन नायकसी । २ ।
दीनांचा दयाळ मागील बोभाट । म्हणोनि हृदयस्फोट केला देवा । ३ ।
आपलें म्हणोनि मज उपेक्षावें । ऐसें न करावें नामयासी । ४ ।

१७८१. कांहींच मी नव्हें ऐसें जरी केलें। तरि कां जन्मविलें पांडुरंगा। १ ।
काय ब्रह्मज्ञान सांगशील मातें । खातया न खाते न देखेचि। २ ।
यातिहीन शिंपी अधिकारी कैंचा। हा धर्म तयाचा सांग त्यासी । ३ ।
चतुर्थ आश्रमी यति दिगंबर । अशक्त संसार सोसवेना । ४ ।

तुझी मैत्रा सुरवर नेणती प्रेमगोडी । झाली देशधडी वांयांवीण । ५ ।
नामा म्हणे हरि सरखा चिंतामणि । मूर्खा समजावणी न करावी । ६ ।

१७८२. आम्हांपासीं काय मागसी तूं देवा । नाहीं भक्तिभाव भांडवल । १ ।
भांडवल गांठीं देखोनि साचार । सुदाम्याची फार पाठ घेसी । २ ।
घेसी सोडुनियां पोहे मुठीभर । हिडसावल्या कर नामा म्हणे । ३ ।

१७८३. साधुनी समाधि तुज म्यां चिंतावें । मग माझ्या यावें हृदयांत । १ ।
तंव पांडुरंगा संतामाजीं उणें । तुजलागीं निर्वाणे करीं देवा । २ ।
तुजसी संबंध लौकिका वेगळा । पाळसी गोपाळा लळे माझे । ३ ।
उपजतां बाळ हितार्थी लागोनी । प्रसन्न जननी होई आधीं । ४ ।
भिडेस्तव पान्हा फुटोनियां थानीं । येते त्या पाहुनी दिले काय । ५ ।
उदित सूर्यास लागे विनवावा । यावें तुवां गांवा प्रकाशित । ६ ।
मग ते तयानें निवारावें तमा । हें तो मेघश्यामा नाहीं श्रुत । ७ ।
पृथ्वी भूतीं काय करावा आदरु । मग त्याचा भारू चालवावा । ८ ।
जीवना जीवन प्रार्थुनी आणावें । तेणें काय निववावें संतत्वासी । ९ ।
सर्वज्ञ उदार होसी चक्रवर्ती । कार्याकारणांतीं नांद तुझी । १० ।
नामा म्हणे माझें चित्त कृष्णाकार । करूनि निर्धार प्रेम देईं । ११ ।

१७८४. उदाराचा राणा म्हणविसी आपणा । सांग त्वां कवणा काय दिलें । १ ।
उचिता उचित देसी पंढरीनाथा । न बोलों सर्वथा वर्में तुझीं । २ ।
वर्में तुझी कांहीं बोलेन मी आतां । क्षमा पंढरीनाथा करीं बापा । ३ ।
न घेतां न देसी आपुलेंही कोणा । प्रौढी नारायणा न बोलावी । ४ ।
बाळमित्र सुदामा विपत्तीं पिडला । भेटावया आला तुजलागीं । ५ ।
तीन मुष्टि पोह्यासाठीं मन केलें हळुवट । मग तया उत्कृष्ट राज्य दिलें । ६ ।
छळावया पांडव दुर्वास पातला । द्रौपदीनें केला धांवा तुझा । ७ ।
येवढिया आकांतीं घेऊनि भाजीपान । मग दिलें अन्न ऋषिलागीं । ८ ।

बिभीषणा दिधली सुवर्णांची नगरी। हे कीर्ति तुझी हरी वाखाणिती। ९ ।
वैरियाचें घर भेदें त्वां घेतलें। त्याचें त्यासी दिधलें नवल काय।१०।
ध्रुव आणि प्रल्हाद अंबऋषि नारद। हरिश्चंद्र रुक्मांगद आदि करुनी।११।
त्याचें सेवाऋण घेऊनि अपार। मग त्या देशी वर अनिर्वाच्य।१२।
एकाचि शरीरसंपत्ति आणि वित्त। एकाचें तें चित्त हिरोनि घेसी।१३।
मग तया देशी आपुलें तूं पद। जगदानी हें ब्रीद मिरविसी।१४।
माझें सर्वस्व तूं घेई तुझें नको कांहीं। मनोरथाची नाहीं चाड मज ।१५।
नामा म्हणे केशवा जन्मजन्मांतरीं। करीन मी हरी सेवा ऋण।१६।

१७८५. उदार कृपाळ सांगशील जना। तरी कां रावणा मारियेलें। १ ।
नित्यानित्य पूजा शिरकमळी करी। तेणें तुझें हरी काय केलें। २ ।
किती बडिवार सांगसील वांयां। ठावा पंढरीराया आहेसी आम्हां। ३ ।
कर्णा ऐसा वीर झुंजार उदार। त्यासी त्वां जर्जर केलें बाणीं। ४ ।
पाडिले भूमीसी नयेचि करुणा। त्याचे नारायणा पाडिले दांत। ५ ।
श्रीयाळ बापुडें सात्विक निर्वाणी। खादलें कापोनी त्याचें पोर। ६ ।
ऐसा कठिण कोण होईल दुसरा। कांडियेलें शिरा उखळामाजीं। ७ ।
शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग। कापिलें त्याचें अंग ठायीं ठायीं। ८ ।
जाचोनियां प्राण घेतला तयाचा। काय सांगशी वाचा बडिवार। ९ ।
हरिश्चंद्राचें राज्य घेउनिया सर्व। विकिला त्याचा जीव डोंबा घरीं।१०।
बहुतचि श्रम दिधले तयासि। परी तो सत्वासी ढळेचिना।११।
पाडिला विघड नळा दमयंती। ऐसी कृपामूर्ती बुद्धि तुझी।१२।
आणिक तुझी कीर्ति सांगावी ती किती। केली ते फजिती माउशीची।१३।
मारियेला मामा सखा पुरुषोत्तमा। नामा म्हणे सीमा फार केली।१४।

१७८६. पतित अनेक पावन तूं एक। झालासी सुश्लोक कवणाचेनी। १ ।
पतित मी भला कीं पावन तूं भला। सांग बा विठ्ठला मायबापा। २ ।

परिसाचें महिमान कैसेंनी वाढतें। निर्माण नसतें लोह जरी। ३ ।
कल्पतरूची कीर्ति कैसेनी वाढते। जरी कल्पना नसती याचकाची। ४ ।
प्रजेसी पोशिले शोभती राजेश्वर। तैसा हा विचार तुम्हां आम्हां। ५ ।
नामा म्हणे स्वामी आहे तें आमुचे। तुज देवा कैचें क्रियाकर्म। ६ ।

१७८७. सर्व जीव तूं झालासी आपण। आम्हीं कां पतित तूं कैसा पावन। १ ।
मन इंद्रियें तूंचि झालासी चाळिता। आमुच्या ठायीं कोणें ठेविली सत्ता। २ ।
सुवर्णाच्या पोटीं झाला अलंकार। एकी भला वाणिती साचार। ३ ।
गंगासिंधु मिळणी झाली सहस्रमुख। अंाव तो उदक अन्य नाहीं। ४ ।
बीजाचिया पोटीं वटाचा विस्तार। सर्व तो आकार तुझाची असे। ५ ।
नामा म्हणे सर्व तुझेंचि करणें। उणें खवळून येऊं नको देणें। ६ ।

१७८८. विषयाचें आळुके जरी नव्हतों दीन। दीनानाथ कोण म्हणतें तुज। १ ।
सुष्ट दुष्ट तरी आमुचें आचरण। तें तुज भूषण झालें देवा। २ ।
पतितपावन ब्रीद कैसेंनी जोडते। जरी आम्ही नव्हतों कर्मजड। ३ ।
नामा म्हणे ऐसें आहे गा हें देवा। विचारीं केशवा मायबापा। ४ ।

१७८९. निर्विकल्प नाम अनंत कल्पना। होसि नारायणा अव्यक्तेसी। १ ।
लाज ते लाविली निर्गुणपणासी। श्रुति पुराणासी साम्य दावी। २ ।
चातुर्यसागरा नंदाचा खिल्लारी। गायी निरंतरी चारविसी। ३ ।
सगुण संबंध पडिलासे गाठीं। कोण्या भक्तासाठीं काय धंदा। ४ ।
तुझें देवपण मिरविसी निकें। नामा म्हणे सुख तुझें पायीं। ५ ।

१७९०. जन्ममरणाच्या खुंटती लहरी। यांयां कां येरझारी सीणतोसी। १ ।
सांगेन तें करीं मन मुळीं आंवरीं। एकांतीं क्षणभरी चल जाऊं। २ ।
आकारलें तितुकें आहे नाशिवंत। देव आणि भक्त कैंचे तेथें। ३ ।
नामा म्हणे केशवा असो तुझें गुज। तुजवांचोनि मज नकळे कांहीं। ४ ।

१७९१. निर्गुण नामाचा अनंत कल्पना । धरूनि नारायणा व्यक्ति येसी । १ ।
लाज लावियेली त्या निर्गुणपणा । श्रुतीच्या वचना वाखाणीता । २ ।
तैसे न हो आम्ही करणीचे खिलाट । नामाचे निकट दास तुझे । ३ ।
चतुर शिरोमणी नंदाचा खिल्लारी । हे अघटीत मुरारी नाम जरी । ४ ।
तुमचे तुम्हा देवा सांगतां तें निके । समर्थासी रंके बोलिजे केवीं । ५ ।
देवा मुकुटमणी हे बोलती पुराणें । आणि बळीचें राखणें द्वार काय । ६ ।
अर्जुना सारथी रथ वागविसी । उच्छिष्ट काढिसी धर्मा घरीं । ७ ।
विश्वंभर नाम तुझें कमळापति । जगीं श्रुति स्मृति वाखाणिती । ८ ।
गौळियांचे घरीं दहीं लोणी चोरुनि । खातां चक्रपाणि लाजसी ना । ९ ।
आतां दीनानाथा ब्रिद तुझें साचें । तरी भूषण आमुचें जतन करीं । १० ।
येर देवा ठेवी कायसी आम्हा आतां । नामा विनविता केशिराजा । ११ ।

१७९२. काय तुज देवा आलें धारेपण । दाविसी कृपण उणें पुरे । १ ।
पुरे आतां सांगों नको बा श्रीहरी । गोकुळाभीतरीं खेळ मांडी । २ ।
हलाहल शांत करी तत्क्षण । अमृत जीवन नाम तुझें । ३ ।
तुझें नाम सर्व सदां गोपाळासी । नामा म्हणे यासी काय झालें । ४ ।

१७९३. निर्गुणपणाच्या येसी अभिमाना । तुज नारायणा शोधीं नामीं । १ ।
काय तुझी भीड धरावी स्यां आतां । कृपाळु अनंता म्हणे ना मी । २ ।
पुंडलीकासाठीं उभा राहिलासी । ठकडा तूं होसी मजलागीं । ३ ।
नामा म्हणे नको मज चाळवण । लवकरी चरण कां न दावा । ४ ।

१७९४. कल्पतरुतळीं बैसलिया । कल्पिलें फळ न पविजे । १ ।
कामधेनु जरी दुभती । तरी उपवासी कां मरावें । २ ।
उगे असा उगे असा । होणार तें होय जाणार तें जाय । ३ ।
नामा म्हणे केशवा काय तुझी भीड । संतां महंतांदेखतां सांगेन तुझी खोड । ४ ।

१७९५. मुळींच मी जाणें तुझा ठेंगपणा । काय नारायणा बोलसील । १ ।
पुरे पुरे आतां तुमचे आचार । मजशीं वेव्हार घालूं नको । २ ।
लालुचाईसाठीं मागे भाजी पाना । लाज नारायणा तुज नाहीं । ३ ।
नामा म्हणे काय सांगों तुझी कीर्ति । वाउगी फजिती करूं तुज । ४ ।

१७९६. तुझा दास मी तों राहिलों होतोंनां । बोल चक्रपाणि पुरे आतां । १ ।
जावो प्राण आतां न सोडीं मी संग । नव्हती वाउगे बोल माझे । २ ।
श्रुति स्मृति वेद काव्यें हीं पुराणें । ती तुज भूषणें सुखें मानूं । ३ ।
काय हानि झाली सांगा मजपाशीं । उद्धारा जगासी नामा म्हणे । ४ ।

१७९७. आठवितां मनीं तुझीं ब्रीदावळी । येऊनि जवळी उभा ठाके । १ ।
लाज धरोनियां होतोसि माघारा । तुजची दातारा दिसे शोभा । २ ।
नामरूपासाठीं वेसी नाना सोंगें । भक्त जीवलगे अंतकाळीं । ३ ।
नामा म्हणे मज नको हा संसार । देई निरंतर संग मज । ४ ।

१७९८. पतितपावन ब्रीद मिरवीत आतां । तरीच पंढरीनाथा दास तुझा । १ ।
माझे गुण दोष न धरावे मनीं । तारिले मजहूनि वेद्या कोण । २ ।
पितीया पतन स्वामीची करणी । गणिका विमानीं कीर्ति कोण । ३ ।
अजामेळा अधिकार जावया वैकुंठा । माझिया अदृष्टा काय झालें । ४ ।
शिशुपाळें शिव्या दिधल्या सभेआंत । त्याहूनि पतित थोर झालों । ५ ।
नामा म्हणे पुढती न बोलें मी वर्म । अंगिकारोनि प्रेम देई मज । ६ ।

१७९९. कटीं कर उभा ऐसा । पहा कैसा वरद्येण्या । १ ।
माझा हिशेब करीं रे केशवा । चौऱ्यांशी लक्ष जन्म केली तुझी सेवा । २ ।
माझें ठेवणें देई गा देवा । नाहीं तर धरीन मी तुझ्या सेवा । ३ ।
नामा म्हणे मज खवळिसी वांयां । पिसाळलों तरी झोंबेन तुझ्या पायां । ४ ।

१८००. तुज विकोनी घातली चोर । मज समोर बोलतोसी । १ ।
उच्छिष्ट शिदोरी वेऊनिया करीं । भक्तांचा भिकारी तूंचि एक । २ ।

चोर आणि शिंदळ चाळविले गोवळे । अनंत मर्दिले दुष्टकाळ । ३ ।
नामा म्हणे केशवा सांगेन वर्म । ऐकतां न गहे संतांचें कर्म । ४ ।

१८०१. नामयानें बंद घेतलें । विठ्ठलासी जीत धरिलें । १ ।
नामा आला रे म्हणती । भेणें कळिकाळ कांपती । २ ।
भाव भक्ति करोनी कडी । विठ्ठल पायीं जडली बेडी । ३ ।
देह करोनी बंदिखाना । विठ्ठल सांठविलें निधाना । ४ ।
सोहं शब्दें मार केला । विठ्ठल काकुळती आला । ५ ।
नामा म्हणे विठ्ठलातें । जीव गेल्या न सोडीं तूतें । ६ ।

१८०२. मायबापाची मोडूनियां आस । धरिली तुझी कास पांडुरंगा । १ ।
झणीं पांडुरंगा उपेक्षिसी मातें । तरी हांसती तूं तें संतजन । २ ।
नामा म्हणे तुझीं पाउलें समान । तेथें माझें मन स्थिरावलें । ३ ।

१८०३. अपल्याचें हित कीजे त्या जनकें । जरी वेडें मुकें झालें देवा । १ ।
तैसें मी पोसणें तुझें जिवलग । अंतरींचें सांग गुज कांहीं । २ ।
राखीन मी नांव तुझें सर्वभावें । चित्त वित्त जीव देईन पायीं । ३ ।
जरी देवा हीन म्हणसील मज । नामा म्हणे लाज येईल कोणा । ४ ।

१८०४. अनाथ अनाथ म्हणती मातें । अनाथनाथ म्हणती तूतें । १ ।
आपुलें ब्रीद साच करीं । भेट मज एक वेळ मुरारी । २ ।
पतित पतित म्हणती मातें । पतितपावन म्हणती तूतें । ३ ।
दीन दीन म्हणती मातें । दीनानाथ म्हणती तूतें । ४ ।
आर्त आर्त म्हणती मातें । आर्तपरायण म्हणती तूतें । ५ ।
नामा म्हणे ऐकें सुजाणा । नाडकसी तरी लाज कवणा । ६ ।

१८०५. मयुरध्वज राजा महापापी जाण । उभा नारायण जोडी हात । १ ।
कर्वत आणिसी सकळां देखतां । कांतिसी तत्वनां मांस त्याचें । २ ।

कपोतणी मागें पारध्याचा वेष। दावी हृषिकेश रूप त्यासी। ३ ।
नामा म्हणे तुझें करणें उचित। कां मज प्रचित नये देवा। ४ ।

१८०६. मरणें पेरणें जन्म उगवणें। मायेची ते खूण सांगितली। १ ।
संग तुझा पुरे संग तुझा पुरे। संग तुझा पुरे नारायणा। २ ।
तूं तरी न मरे मी तरी न पुरे। भक्ति हे संचरे ह्याचि लाभु। ३ ।
नामा म्हणे माझ्या ठायींचा मी नेणें। संसार भोगणें तुझी लाज। ४ ।

१८०७. संतोषाकारणें सज्जन जीवासी। माहाकारी होसी नारायणा। १ ।
समान करिसी सर्वांभूतीं जाण। पतितपावन ब्रीद तुझें। २ ।
भक्ति भाव ज्यांचा भाग्यें आगळिया। होसी देवराया सर्वविध। ३ ।
समर्थपणासी कोणी विचारावें। नामा म्हणे भावें कारण हा। ४ ।

१८०८. माया पुरातनु तूंचि वो जननी। नाम संजीवनी विठ्ठल वो। १ ।
तेंचि हें बोळलें पूर्ण प्रेम आम्हां। लोलंगति ब्रह्मा पंढरीये। २ ।
धांव पाव वेगीं येईं सांभाळीं तूं। नाम हा संकेतु पांडुरंगे। ३ ।
क्षुधा तृषा आशा तुजलागीं चिंतिती। जीवन हे मागुती नाम तुझें। ४ ।
अनंत अच्युत नाम हेंचि नित्य। तेणें कृतकृत्य प्राण माझा। ५ ।
नामा म्हणे देवा तूं जीवन आमुचें। आतां मज कैचें क्रियाकर्म। ६ ।

१८०९. मायेचा कळवळा मायाची जाणे। तैसें मी तान्हें माउलिये। १ ।
विठ्ठल श्रीरंग डोळस प्रसन्न। नित्य अमृतघन बोळला सदा। २ ।
जननी जनक तूंचि वो मुकुंद। नाम हें गोविंद शुद्धरसु। ३ ।
येईं वो केशवे नित्य नामरूपें। मी तुज आलापें आळवीत। ४ ।
माधवा श्रीधरा वेगीं येईं त्वरें। मज वो नावरे प्रेम वेधु। ५ ।
नामा म्हणे तूं जीवन आमुचें। नित्य केशवाचें प्रेम मज। ६ ।

१८१०. माझें मज न कळे। माझें मज न कळे प्रेमसुख। १ ।
न करीं तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान। माझी आहे खूण वेगळीच। २ ।

न करीं तुझी स्तुति न वाखाणीं कीर्ति। धरिली ते युक्ति वेगळीच। ३।
न करीं काया क्लेश इंद्रियां निरोधु। मज आहे बोधु वेगळाची। ४।
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प। येसी आपैंआप गिवसीत। ५।

१८११. विष पाजावया पुतना ते आली। ते तुवां तारिली काय म्हणुनि। १।
पुंसा म्हणोनि वेश्या बोभाइली। ती तुवां तारिली काय म्हणुनि। २।
पिंगळेची आख्या पुराणीं ऐकिली। ते तुवां तारिली काय म्हणुनि। ३।
गौतमाचें शापें अहल्या शिळा झाली। ते तुवां तारिली काय म्हणुनि। ४।
नामा म्हणे केशवा अकळ तुझी करणी। विसंबसी झणीं तूंचि मज। ५।

१८१२. तुवां चाळविलें अनंत सेवकां। तोचि चाळा मज दाविसी तूं निका। १।
आदि अंतीं तुझ्या जाणितल्या खुणा। आतां काय करिसी पंढरीच्या राण्या। २।
भला रे भला झालासि शाहणा। भेष पळविले शास्त्रपुराणां। ३।
नामा म्हणे केशवा मज मारून दवडी। पुढती न धरावी सांव माझी फुडी। ४।

१८१३. कपटनाटका कल्लोळकरूणा। मजलागीं दीन होसी देवा। १।
रात्रंदिवस मज ठेवुनि जवळ। घालसी कवळ मुखामाजीं। २।
पेंद्या सुदाम्याचे करिसी कैवार। मजसी अंतर केलें आतां। ३।
नामा म्हणे ऐसा करितों बोभाट। देऊं नको भेट पांडुरंगा। ४।

१८१४. सकळ वैभव निजकर्म भोग। तो तुज उद्वेग दावी कांई। १।
मीतूंपण तेथें असे मग कैचें। निर्माण ठायींचे तोडी वेळे। २।
आपुला करुनी ठेवी तुझे पायीं। थोरपण कांहीं नको मज। ३।
नामा म्हणे तुझें सोलीव होपर। कायसा विचार देखों आतां। ४।

१८१५. तुझा माझा देवा का गे वैराकार। दु:खाचे डोंगर दाखविसी। १।
वळें बांधोनियां देसी काळा हातीं। ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या। २।
आम्हीं देवा तुझी केली होती आशा। बरवें हृषीकेशा कळों आलें। ३।
नामा म्हणे देवा करा माझी कींव। नाहीं तरी जीव घ्यावा माझा। ४।

१८१६. दास झाल्यावरी करिसी उदास । मनीं ते तुम्हांस आणीं देवा । १ ।
सोसिले प्रवास जन्मजन्मांतर । करिसी अव्हेर आम्हांलागीं । २ ।
भार खांद्यावरी घेऊनि हिंडवी । होसी मजविशीं पाठमोरा । ३ ।
श्रुति सावकाश गाती इतिहास । काय कासाविस होय तुम्हां । ४ ।
नामा म्हणे नको वाउगे उदीम । न सोडीं मी नाम केल्या कांहीं । ५ ।

१८१७. आम्ही शरणागत परि सर्वस्वें उदार । भक्तीचे सागर सत्वशील । १ ।
काया वाचा मनें अर्थ संपत्ति धन । दिधलें तुजलागुन पांडुरंगा । २ ।
आम्हां ऐसें वित्त तुम्हां कैचें देवा । हा बडिवार केशवा न बोलावा । ३ ।
सत्वाचा सुभटु बळि चक्रवर्ति । पहा केवढी ख्याति केली तेणें । ४ ।
त्रिभुवनींचें वैभव जोडिलें ज्या लागुनी । तें शरीर तुझ्या चरणीं समर्पिलें । ५ ।
रावणा ऐसा बंधु सांडूनि सधर । ओळंगति परिवार ब्रह्मादिकां । ६ ।
ते सांडोनि एकसरा आलासे धांवत । झाला शरणागत बिभीषण । ७ ।
हिरण्यकश्यपें तुझा वैरसंबंध । पाहें पां प्रल्हाद गांजियला । ८ ।
अजगर कुंजर करितां विषपान । परि तुझें स्मरण न संडीच । ९ ।
पति पुत्र स्नेह सांडोनि गोपिका । रासक्रीडे देखा भुललिया । १० ।
एकीं तुझें ध्यान करितां त्यागिले प्राण । सांग ऐसें निर्वाण कवणें केलें । ११ ।
ऐसे मागा पुढां झाले असंख्यात । भक्तभागवत सखे माझे । १२ ।
त्यांचेनि सरता झालासी त्रिभुवनीं । विचारीं आपुल्या मनीं पांडुरंगा । १३ ।
केलें उच्चारण बोलतां लाजिरवाणें । हांसती पिसुनें संसारींचीं । १४ ।
नामा म्हणे केशवा अहो शिरोमणी । निकुरा जासी झणी मायबापा । १५ ।

१८१८. आम्हीं शरणागतीं केलासी सरता । येऱ्हवीं अनंता कोण जाणे । १ ।
वेदशास्त्र पुराणीं उबगोनि सांडिल्यासी । तो आम्हीं धरिलासे हृदयकमळीं । २ ।
चतुरा शिरोमणी अहो केशिराजा । अंगीकार तुझा केला आम्हीं । ३ ।
सहस्र नामें झालासि संपन्न । तरी हेंही भूषण आमुचेंचि । ४ ।

येऱ्हवीं त्या नामांचा कोण जाणे सीमा। पाहें मेघःश्यामा विचारोनी। ५ ।
होतासि क्षीरसागरीं अनाथाचे परी। लक्ष्मी तेथें करी चरणसेवा। ६ ।
तेहि तंव जाण आमुची जननी। तूं तियेवांचोनि शोभसी कैसा। ७ ।
तुज नाहीं नाम रूप जाति कुळ। अनादीचें मूळ म्हणती तूज। ८ ।
आम्ही भक्त तरी तूं भक्तवत्सल। ऐसा प्रगट बोल जगामाजी। ९ ।
ऐसी आमुचेनि भोगिसी थोरीव। आमुचा जीवभाव तुझ्या पायीं। १०।
नामा म्हणे केशवा जरी होसी जाणता। तरी या बोला उचिता प्रेम देईं। ११।

१८१९. जगदानिया हें ब्रीद आहे जगीं। तें आजि मजलागीं काय झालें। १ ।
मज पाहतां विसरू पडिला नामाचा। कीं तुज आमुचा वीट आला। २ ।
सुजाणाच्या राया परिसें केशिराजा। भक्ताचिया काजा लाजों नको। ३ ।
भक्तकाज कैवारी हें ब्रीद चराचरीं। तें ठेविलें क्षीरसागरीं लक्ष्मीपाशीं। ४ ।
मज पाहतां अभिलाष धरिला मानसीं। मग तूं हृषीकेशी विसरलासी। ५ ।
दीनानाथ ऐसें नाम बहुतांसी वांटिलें। निर्गुण तें उरलें तुजपाशीं। ६ ।
म्हणोनि केशिराजा विसरलासी आम्हां। विनवितसे नामा विष्णुदास। ७ ।

१८२०. कैसा पांडुरंगा करावा विचार। सांग बा निर्धार साक्षरूपा। १ ।
काय आलें देवा कैचें थोरपण। आकारासि कोणीं आणियेलें। २ ।
आणियलें आतां आपणासरिखें। गोपिकांसि रूपें दावी नाना। ३ ।
काय जीवेंभावें सकळां संमत। सगुण अनंत म्हणे नामा। ४ ।

१८२१. आतां तुझी भीड कांस ठेवूं देवा। कलागत केशवा करूं तुझी। १ ।
अंतरींचा खोटा बाह्य दावी साच। काये त्या प्रीतीचें सुख आसे। २ ।
समर्थाच्या घरीं राहिलिया पां जाण। न मिळेचि अन्न भले काये। ३ ।
नामा म्हणे तुझें ठेवि शहाणपण। उठ उतरीन संतांमध्यें। ४ ।

१८२२. भक्त पुंडलीकें असमा उभा केला। त्याचेनि रागें मजशीं धरिला अबोला। १ ।
मी तुझें पोसणें मी तुझें पोसणें। मी तुझें पोसणें पांडुरंगा। २ ।

तुझी कृपा नाहीं रे सत्य । मी प्रत्यक्ष रूप अवलोकितों । ३ ।
नामा म्हणे केशवा तूं जाणतोसी मातें । उफराटें पाहोंनी गिळतों मी तुतें । ४ ।

१८२३. दाविसी अनंता स्वरूपें अनेक । वाउगाचि शोक बाळविसी । १ ।
आपणा मानसीं विचारूनि पाहें । सावधान होये तुझे पायीं । २ ।
तूंचि परमार्थ भक्तां अंगसंगें । तारिं पांडुरंगे बहुतांसी । ३ ।
नामा म्हणे नाम निर्वाणाचें बीज । मजसाठीं गुज सांगा वेगीं । ४ ।

१८२४. समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हांसती सकळ लाज कोणां । १ ।
देव आप्त दैन्य उरे कैचें बापा । आम्हांसि तूं कैसा विसरलासी । २ ।
ऐसा तूं अविनाश त्रिभुवनींचा राजा । नामा म्हणे माझा तूंचि स्वामी । ३ ।

१८२५. शरीराचा भाव तुज नाहीं देवा । तेथें मी केशवा काय बोलूं । १ ।
अंगदाचे अंगीं बळ देसी फार । बहु उपकार कळों आले । २ ।
तुम्हां नित्य न्याय नोव्हे साचपण । बळि तूतें दान देऊनि ठके । ३ ।
नामा म्हणे सदा काय म्यां गाऱ्हाणें । किती नारायणें देऊं आतां । ४ ।

१८२६. वानराच्या संगें स्वयें क्षेम देसी । मज हृषीकेशी न बोलावें । १ ।
रिसांपाशीं सदा स्वभावें तुम्ही खेळा । माझिया कपाळा नातुडसी । २ ।
पक्षि जटायूचें लेंकरुं तूं होसी । माझ्या कां मनासि नातुडसी । ३ ।
लावोनि चरण तारियली शिळा । कोळियाचा केला अंगिकार । ४ ।
नामा म्हणे तुम्हां सांगावें म्यां किती । राग मना चित्तीं काय वाणूं । ५ ।

१८२७. देवा आम्हीं तुम्हां दिलें आंग्वण । मानीं हें वचन सत्य माझें । १ ।
तिन अमंगळ तुम्हां झालों सहाय्य । विचारूनि पाहें खरें खोटें । २ ।
रोग व्याधि पीडा जनासि नसतां । कोण पाचारिता वैद्यालागीं । ३ ।
कल्पनेचें भूत झडपी या संसारीं । मानें पंचाक्षरी पाचारितां । ४ ।
नामा म्हणे विठो दैव येतें घरा । नको लावूं दारा पांडुरंगा । ५ ।

## आत्मप्रचिती

१८२८. चंद्रभागेतीरीं उभा राहिलासी। भक्तांचे मानसीं भाव मात्र। १।
काय पुंडलिकें केल्या तपराशी। जाणोनि मानसीं भावमात्रें। २।
भावेंविण देव सर्वथा नातुडे। नेणती बापुडे बद्धजन। ३।
नामा म्हणे माझें माहेर पंढरी। भेटती महाद्वारीं संतजन। ४।

१८२९. आत्मत्वाच्यायोगें पाहूं जातां। नाहीं निरंतर भिन्न देवता। १।
वर्णाश्रम याति कुळ गोत्र। भक्ति सदोदित नामापासीं। २।
नामा म्हणे भय मुळीं कांहीं नाहीं। अखंडित पाहीं भक्तिसार। ३।

१८३०. स्वरूपाकारणें विश्वरूप घेसी। निर्गुणा दाविसी गुणरया। १।
तत्त्वीं तत्त्वरवी उगवे मंडळीं। अवघें झाकोळी आपुल्यातें। २।
दृश्याचिये दीप्ति दृश्यासी न दिसे। समरस असे तेज त्याचें। ३।
चित्स्वरूपीं नांदे तत्स्वरूप भासे। आकारासरिसें तदाकार। ४।
करुणा वोतिलें सप्रेम सुतेज। तेथें तूं विराज ज्ञानदेवा। ५।
ज्ञान हेंचि तोय विज्ञान हे गंगा। प्रेमें प्रेमभागा स्नान करी। ६।
एकत्व आरामें शांति पूर्ण घरीं। श्रीहरि कामारी होतो तुझा। ७।
स्वस्ती श्रीनिवृत्ति गुरूत्व उचित। लक्ष्मी अवचित नामदेवा। ८।

१८३१. मीच माझा देव मीच माझा भक्त। मी माझा कृतार्थ सहज असें। १।
बंध आणि मोक्ष मायेची कल्पना। पडली होती मना कैसी भ्रांती। २।
विठ्ठलें विचारें दाखविलें सुख। होतें जें असंख्य हारपलें। ३।
नामा म्हणे सोय सांपडली निकीं। झालों एकाएकीं हरीचा दास। ४।

१८३२. मूर्खाहातीं दिलें रत्न पारखीसी। तयाच्या मोलासी घेऊं नका। १।
आम्ही तैसें झालों आम्ही तैसे झालों। आम्ही तैसे झालों जाणतेची। २।
अंगीं नाहीं बळ होड घाली राया। आम्ही गेलों वांयां तेणें न्यायें। ३।
नामा म्हणे ऐसें केलें तयापरी। आम्ही निरंतर तुम्हांसवें। ४।

१८३३. आम्हांसी चिंतन अवश्य श्रीरामा। आवडी आणिक आम्हां नाहीं दुजी। १ ।
वोळगलों हरि भूतभावा निर्धारी। दिसे चराचरीं भावरूप। २ ।
जें जें पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टी। हरिरूपीं भेटी हेंचि दिसे। ३ ।
नामा म्हणे विठ्ठल सर्वांभूतीं आहे। आणिक उपाय न लगती। ४ ।

१८३४. तीर्थासी जाऊनि काय म्यां करावें। वाउगें हिंडावें पंथें तेणें। १ ।
माझें तीर्थ क्षेत्र पंढरी पैं जाण। उघडें निधान दृष्टीपुढें। २ ।
मागें थोर थोरीं हेंचि पैं साधिलें। नामयासी दिधलें केशवानें। ३ ।

१८३५. असो आतां किती हेचि ठेवाठेवी। कृपा विठ्ठल देवीं केली मज। १ ।
अंतरींच्या सुखा नाचतसें भोजें। हेंचि निजगुज जाणवलें। २ ।
नामा म्हणे अंतरींचें निजगुज। सांगितलें मज पांडुरंगें। ३ ।

१८३६. कांसवींचीं पिलीं पोशिलीं कृपेनें। तैसा पैं आत्मज्ञानें सुखी झालों। १ ।
स्वप्नींचे संतोषें भुके जेविं उल्हासें। कीं सुखें हांसे नेणताची। २ ।
पक्षी फळालागीं अंतराळीं उडाला। न कळे कोठें गेला माग त्याचा। ३ ।
नामा म्हणे खूण अनुभवीं जाणे। ब्रह्मत्वीं पाहणें केशव चरण। ४ ।

१८३७. आम्हां जतन करावया उभा विटेवरी। तळुवटीं पंढरी ओढवली। १ ।
तिहीं लोकीं पिकला असे जगजीवन। प्राप्ति पाहून दान देत असे। २ ।
चातका चिंतनीं जलधर गगनीं। पुढार देउनी पुंडलिका। ३ ।
विष्णुदास नामा विनवी वेळोवेळां। विठ्ठलीं जीवनकळा मुरालीसे। ४ ।

१८३८. तरावया संसार जडजीव प्राणी। नाव नवखणीं नवही मुखें। १ ।
बैसा नावेवरी नाहीं भेदाभेद। श्रवणाचे छंदें नाव गेली। २ ।
अठराही आवले नावेसी लागले। साही रंगें भरले मिरवताती। ३ ।
चहूं मुखें जयाचा नकळे विचार। सेवा अगोचर सहस्रमुखा। ४ ।
तारील तारील हाचि पैं निर्धार। नामा पैलपार उतरला। ५ ।

१८३९. मन झालें उन्मन वासना तल्लीन । देखिले हरिचरण सर्वांठायीं । १ ।
गुरुशिष्य मात हरपला दृष्टांत । प्रत्यक्ष त्वरित हरि झाला । २ ।
नामा पाहे देहीं तंव उभा चहूं बाही । दिशाद्रुम दाही हरि दिसे । ३ ।

१८४०. आतां मज भय नाहीं पै कोणाचें । जन्ममरणाचें दु:ख गेलें । १ ।
बद्ध मोक्षाची फिटली काजळी । समाधि लागली समाधीसी । २ ।
नामा म्हणे सर्वही साधन । केशव चरण न विसंबें । ३ ।

१८४१. मी माझें उरलें बाळक माय पोटीं । पाहे तंव कौतुकीं तेही नाहीं । १ ।
तेथीचें तेथें दंपत्य लोपलें । कळिकाळें मंथिलें नामें थोर । २ ।
तेंचि घेऊनि ठेलों मी एथें लोपलों । ब्रह्मींच गुंतलों ब्रह्ममाळें । ३ ।
नामा म्हणे चैतन्य चैतन्या मिळालें । अरूप रूप ठेलें आपणांमाजी । ४ ।

१८४२. मज तुज निगदलें निगदलें । राहे कळिकाळा उगलें । १ ।
अरे खंडलें एके बोलें । समर्थें होतां अंगिकारिलें । २ ।
नामयानें संसारिक जिंकिलें । केशवचरणीं मन ठेविलें । ३ ।

१८४३. सहस्रनामाचे वाटगे । खांदीं घेतलें नेटगें । १ ।
देवा पाती तुझी देवा पाती तुझी । सरकत माझी भक्तिभावें । २ ।
पंढरीये गेलों हाटा । दुकान मांडिलें वाळुवंटा । ३ ।
वैष्णवांची भरली सात । गिऱ्हाईक पातले बहुत । ४ ।
विकरा होतसे नामाचा । लाभ झाला त्या विठ्ठलाचा । ५ ।
नामा देखुनि दुबळा । विठ्ठलें दिधलें भांडवला । ६ ।

१८४४. वंदावें तें काय निंदावें तें काय । सर्वांठायीं पाहें कोंदाटलें । १ ।
आहे कवणा ठायीं नाहीं कवणा ठायीं । ठायींच्या पैं ठायीं कोंदाटलें । २ ।
रविरश्मीचें तेज सर्वांठायीं असे । त्या परि अनायासें बुजतु जाये । ३ ।
भाव तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । जाणोनियां वर्म म्हणे नामा । ४ ।

१८४५. भक्ति आम्हीं केली सांडोनि उद्वेग। पावलों सत्संग सुख प्रेमें। १।
प्रेम काय करी बहु दोष वारी। वैकुंठा माझारि वस्ती देसी। २।
सुख झालें आम्हां धरूं याचा संग। पळे भवभंग श्रमूनियां। ३।
नामा म्हणे सुख बहु झालें जीवा। घडलिया सेवा विठोबाची। ४।

१८४६. अरे स्फुरती भुजा दंड वक्षस्थळ। हर्षें नेत्रकमळ विकासलें। १।
आनंदें रोमांच उभारले अंगीं। क्षेम दे गा वेगीं भक्तराया। २।
मज नानारूपें तुमचेनि संभ्रमें। केलीं जन्म कर्में असंख्यात। ३।
तुमचे आवडी असे मी विकिला। नुठसी कां वहिला आलिंगना। ४।
हृदयींचें गुज सांगतों सकळिक। तेणें मज सुख होईल जीवा। ५।
परतोनि दिठी पाहे आळुमाळ। तेणें हरी सकळ श्रम माझा। ६।
भक्तजनवत्सल भक्तांचा विसांवा। भक्ताचिया भावा भुलला कैसा। ७।
कटीं कर ठेवुनि उभा पुंडलिका द्वारीं। नामया स्वामि हरि न विसंबें। ८।

१८४७. केशिराजा आदि सकळा अनादी। तूंचि कृपानिधि नारायणा। १।
अव्यक्ता अक्षरा सर्व अविनाशा। अगा पंढरीशा पांडुरंगा। २।
तूंचि ब्रह्मचारी गोपिकांचे घरीं। सर्वस्वें उद्धरी सर्व जीवां। ३।
ळटिकें दाविसी गोकुळाभीतरीं। नामा म्हणे शिरीं भार वाही। ४।

१८४८. वाळवंटीं उभा करें कुरवाळिल। जीवींचें पुसेल जडभारी। १।
हरुषें लोळणी घालूं महाद्वारीं। येईल सामोरी केशिराज। २।
शोभतसे पायीं भक्त ब्रिदावळी। जीवासी सांभाळी दीनानाथ। ३।
माझा अभिमान धरून मानसीं। नामा म्हणे होसी भक्तां साह्य। ४।

१८४९. देव आपण नाटक। भक्तां दाखवी वैकुंठ। १।
देव आपण संसारीं। होसी भक्तांचा साहकारी। २।
देव आपण निराळा। भक्तां दावितो सोहळा। ३।
नामा म्हणे भक्तांसाठीं। हात जोडी जगजेठी। ४।